महाराणी

# बायजाबाईसाहेब शिंदे ह्यांचें चरित्र.

दत्तात्रय बळवंत पारसनीस.




प्रकाशकः—

बाबाजी सखाराम आणि कंपनी,

मुंबई.






महाराणी बायजाबाईसाहेब शिंदे.

# महाराणी

# बायजाबाईसाहेब शिंदे

# ह्यांचें चरित्र.

---

दत्तात्रय बळवंत पारसनीस.

---




प्रकाशकः—

बाबाजी सखाराम आणि कंपनी,

इसुफबिल्डिंग्ज, मुंबई.

---

"निर्णयसागर" छापखान्यांत छापिलें.

---

किंमत १२ आणे.

हें पुस्तक

महाराणी बायजाबाईसाहेब ह्यांचे प्रपौत्र

**श्रीमंत अलिजाबहादुर**

**महाराज माधवरावसाहेब शिंदे**

जी. सी. एस्. आय्.,

**संस्थान ग्वाल्हेर,**

ह्यांस

**प्रेमपूर्वक**

अर्पण केलें असे.

ग्रंथकर्ता.

"* * * * a woman of sense."—*Doulat Rao Scindia.*

---

"* * The most remarkable woman of the day."—*Dr. Hope.*

---

"She was a woman of high spirit and respectable conduct."—*Mill.*

---

"* * * * A woman of great activity and enterprise. * A woman of very great Indian celebrity."—*Mrs. Duberly.*

---

"* * * * a clever and spirited woman."—*Major Sutherland.*

---

"* This lady was not less famous, in her way, than the Begum Sumroo, the Nagpore Ranee, the late Ranee of Jhansi, the Ranee Chanda of Lahore, and the Begum of Bhopal, and she has on more than one occasion been known to lead, in person, a charge of Mahratta horse against the enemies of her country."—*The Bombay Gazette.* Date required

The sources of these quotations are not accurately stated

Names of their works / pages of those works required

# प्रस्तावना.

हिंदुस्थानच्या प्राचीन व अर्वाचीन इतिहासामध्यें ज्या राजकारणी, सद्गुणी, विदुषी, चतुर, साहसी, शूर, स्वाभिमानी, तेजस्वी, उदार, आणि धार्मिक अशा स्त्रिया होऊन गेल्या, त्यांची संख्या पुष्कळ आहे. परंतु त्यांच्या चरित्रांच्या अभावामुळें त्यांचें यश अगदीं अप्रसिद्ध व संकुचित राहिलें आहे. ह्या योगानें आमच्या राष्ट्रांतील स्त्रिया अगदीं कमी प्रतीच्या लेखण्याचा प्रघात पडला आहे. परंतु वस्तुस्थिति तशी नाहीं. आमच्या देशांत "यत्र नार्यस्तु पूज्यन्ते, रमन्ते तत्र देवता:" अशा प्रकारची पूर्वीं स्त्रियांविषयीं सन्मानबुद्धि असून, स्त्रियाही आपल्या उत्तम गुणांनीं ह्या सन्मानास पूर्णपणें पात्र होत्या. परंतु त्यांचीं उज्ज्वल चरित्रें किंवा गुणमहिमा आमच्या नेत्रांसमोर नसल्यामुळें त्यांचे सद्गुण, त्यांची बुद्धिमत्ता आणि त्यांची कर्तृत्वशक्ति ह्यांविषयीं आमच्या मनांत यत्किंचित्ही प्रकाश पडत नाहीं. त्यामुळें त्यांच्याविषयीं 'न स्त्रीस्वातंत्र्यमर्हति' असला अनुदार विचार मनांत ठाम बसून, त्यांना बंद्या गुलामाप्रमाणें वागविण्याची स्वाभाविक प्रवृत्ति पडली आहे. त्याकारणानें त्यांच्या शिक्षणाबद्दल व उन्नतीबद्दल निष्काळजीपणा उत्पन्न होऊन आमच्या संसाररथाचें एक चक्र अगदीं लुलें पडलें आहे, व समाजाची व राष्ट्राची फार हानि झाली आहे. ह्मणजे, पर्यायेंकरून, चरित्रप्रकाशनाच्या योगानें उत्तम गुणांचें प्रतिबिंब मनावर चांगल्या रीतीनें उमटून, सत्कृत्याविषयीं प्रेरणा–सद्गुण आणि सत्कीर्ति ह्यांविषयीं आसक्ति–ही उत्पन्न होऊन स्त्रीपुरुषांस जो अप्रतिम लाभ व्हावयाचा, तो आमच्या देशांत चरित्रप्रकाशनाच्या अभावामुळें अगदीं नाहींसा झाला आहे, असें ह्मटलें असतां फारसा बाध येणार नाहीं.

पौराणिक कालापासून आमच्या देशांतील प्रसिद्ध स्त्रियांच्या चरित्रांचें संशोधन केलें, तर तीं चरित्रें कोणत्याही राष्ट्रांतील तत्कालीन स्त्रियांच्या चरित्रांपेक्षां कमी मनोरम अथवा कमी सुरस आहेत असें ह्मणतां येणार नाहीं. ग्रीस देशांतील सॅफो, ॲस्पाशिया, लेस, ऱ्हीन, टिमॉक्सेना ह्या प्राचीन स्त्रियांचीं चरित्रें घेतलीं, किंवा रोमन राष्ट्रांतील लुशिया, व्हर्जिनिया, कॉर्नि-

लिया, पोर्शिया, हेलीना ह्या स्त्रियांचीं चरित्रें घेतलीं, किंवा इटालियन राष्ट्रांतील कोरिना हिचें चरित्रें घेतलें; तरी आमच्या राष्ट्रांतील अहल्या, सीता, तारा, मंडोदरी, कुंती, द्रौपदी इत्यादि स्त्रियांच्या परम पवित्र, पुण्यशील, चमत्कृतिप्रचुर आणि सुरस चरित्रांत जें स्वारस्य आणि जें अप्रतिमत्व आहे, तेंच आह्मांस परदेशीय स्त्रियांपेक्षां स्वदेशीय स्त्रिया ह्या नात्यानें अधिक कौतुकास्पद व अभिनंदनीय असें वाटणें साहजिक आहे. ह्या वंदनपात्र साध्वी स्त्रियांसंबंधानें,

**अहल्या द्रौपदी सीता तारा मंडोदरी तथा ।**
**पंचकं ना स्मरेन्नित्यं महापातकनाशनम् ॥ १ ॥**

ह्मणजे "अहल्या, द्रौपदी, सीता, तारा, मंडोदरी ह्या पांच स्त्रियांचें जो नित्य स्मरण करील त्याचें महत्पापही नाश पावेल." असा कोणी मार्मिकानें जो महिमा वर्णन केला आहे, तो अगदीं यथार्थ आहे. ह्या स्त्रियांप्रमाणेंच, याज्ञवल्क्य ऋषीची पत्नी मैत्रेयी, वाचक्नूची मुलगी गार्गी, शकुंतला, गांधारी, उत्तरा, यशोदा, राधा, रुक्मिणी, दमयंती, उखा, वगैरे पुराणप्रसिद्ध स्त्रियांचीं चरित्रें महत्त्वाचीं व बोधपर असून, तीं हिंदुस्थानांत पुराणकालींही किती थोर स्त्रिया निर्माण झाल्या होत्या, हें सिद्ध करीत आहेत.

ह्या पौराणिक कालांतून इतिहासाच्या कालांत आलें, ह्मणजे दिल्लीची राज्ञी प्रेमदेवी, कालिदासाची पत्नी विद्योत्तमा, भास्कराचार्यांची कन्या लीलावती, वराहमिहिराची बायको, आणि लक्ष्मणसेन राजाची महाराणी, ह्या विदुषी व शास्त्रपारंगत स्त्रिया दृष्टीस पडतात. ह्यानंतर हिंदुस्थानच्या वीरकाला (age of chivalry) मध्यें प्रवेश केला, तर रजपूत स्त्रियांच्या अलौकिक गुणांनीं नेत्र दिपून जातात. त्यांचें अपार शौर्य, अढळ पातिव्रत्य, अप्रतिम तेजस्विता, लोकोत्तर स्वामिभक्ति, असाधारण स्वार्थत्याग, आणि अपूर्व रणोत्साह पाहून अंतःकरण आनंदानें व आश्चर्यानें थक्क होऊन जातें; व अशीं स्त्रीरत्नें ज्या राष्ट्रांत निर्माण झालीं, तें राष्ट्र धन्य होय असें वाटतें. राणी संयोगिता, राजकन्या कूर्मदेवी, राणी पद्मिनी, गुर्जरदेशस्थ राज्ञी कमलदेवी व देवलदेवी, साध्वी मिराबाई, ग्वाल्हेरची राणी मृगनयना, ताराबाई, रूपमती, गढमंडलाची राणी दुर्गावती, जोधपुरची राजकन्या जोधाबाई, ह्यांचीं चरित्रें इतकीं

वीररसपरिप्लुत व रमणीय आहेत कीं, त्यांच्या योगानें अंतःकरण तल्लीन झाल्यावांचून राहत नाहीं.

ह्या रजपूत स्त्रियांनंतर मराठ्यांच्या स्त्रियांकडे वळलें, तर त्यांचींही चरित्रें तशींच मनोहर व रसभरित आहेत असें गर्वानें ह्मणतां येतें. ह्या सर्व महाराष्ट्र स्त्रियांमध्यें इंदूरच्या महाराणी अहल्याबाई ह्यांचें चरित्र अत्यंत पवित्र, अत्यंत रसाळ, आणि अत्यंत सोज्वल आहे. त्या चरित्राची बरोबरी सर्व राष्ट्रांतील व सर्व देशांतील एकाही स्त्रीचरित्रानें करवणार नाहीं. टॉरेन्स नामक इंग्रज ग्रंथकारानें अहल्याबाईची तुलना, रशियाची राणी क्याथराईन, इंग्लंडची राणी इलिझाबेथ, आणि डेन्मार्कची राणी मार्गारेट ह्यांच्याशीं करून, देवी अहल्याबाई त्यांच्याहीपेक्षां अनेक सद्गुणांनीं श्रेष्ठ होती, असें प्रांजलपणें कबूल केलें आहे. दुसऱ्या एका इंग्रज ग्रंथकारानें ही साध्वी रूपानें सुंदर नव्हती, तरी वर्डस्वर्थ कवीनें वर्णिल्याप्रमाणें:—

"A perfect woman, nobly plann'd
To warn, to comfort, and command;
And yet a spirit still and bright
With something of an angel-light."

"सर्व जनांस सन्मार्ग दाखविण्याकरितां, त्यांना सुख देण्याकरितां, आणि त्यांच्यावर अधिकार चालविण्याकरितां निर्माण झालेली ही सर्वगुणसंपन्न अशी स्त्री परमेश्वराची एक अपूर्व कृति होती. तिची कांति तेजस्वी असून सुशांत अशी होती; किंबहुना ती एक तेजोमयी देवताच होती." असें ध्वनित करून, निरभिमानतया असें कबूल केलें आहे कीं, ही लोकोत्तर स्त्री आपली अपूर्व धर्मशीलता, उदात्त सुशीलता, निस्सीम कर्तव्यदक्षता, विलक्षण कार्यक्षमता, अद्भुत तेजस्विता आणि प्रशंसनीय उद्यमशीलता इत्यादि सद्गुणांच्या योगानें हिंदुस्थानांतील पुण्यश्लोक व महाप्रतापी अशा कोणत्याही नृपवर्यांच्या मालिकेंत, अथवा कोणत्याही राष्ट्रांतील स्त्रीजातीच्या अत्यंत तेजस्वी अशा रत्नावलींत, विराजमान होण्यासारखी आहे.

---

1 "This wonderful woman, for her piety, her elevation of character, her profound sense of duty, her great ability, and

अशी महासाध्वी–केवळ अवतारी–स्त्री मराठी राज्यांत निर्माण झाली असून, तिचें सविस्तर व साधार चरित्र उपलब्ध नसावें ही अत्यंत दुर्दैवाची गोष्ट होय ! अहल्याबाईप्रमाणेंच मराठ्यांच्या इतिहासांत, जिजाबाई, येसूबाई, दीपाबाई, ताराबाई ह्या भोंसले घराण्यांतील व राधाबाई, काशीबाई व गोपिकाबाई ह्या पेशवे घराण्यांतील स्त्रिया चरित्रलेखनयोग्य आहेत. त्यांच्या तोडीच्या उमाबाई दाभाडे, मैनाबाई पवार, बायजाबाई शिंदे, आणि रखमाबाई चासकर ह्या प्रख्यात स्त्रिया होऊन गेल्या; परंतु त्यांचीं सुंदर व विस्तृत चरित्रें प्रसिद्ध नसल्यामुळें इतिहासग्रंथांत व जुन्या बखरींत फक्त त्यांचा नामनिर्देश मात्र दृष्टीस पडतो.

ह्यांशिवाय वाराणशीबाई पेशवे व जिऊबाई फडनवीस ह्या स्त्रियांच्या संबंधानें युरोपियन लोकांनीं क्वचित् क्वचित् उल्लेख केलेला दृष्टीस पडतो. मेजर–जनरल सर आर्थर वेलस्ली ह्या प्रसिद्ध इंग्रजी सेनापतीनें नाना फडनविसांची बायको जिऊबाई हिची भेट घेऊन, ता. १८ मे इ. स. १८०४ रोजीं, पुण्याचे रेसिडेंट कर्नल क्लोज ह्यांस असें कळविलें कीं, "ही बाई फार सुस्वरूप व सौंदर्यवती असून, हिच्या संबंधानें तहामध्यें कांहीं तजवीज व्हावी अशी हिची योग्यता आहे." शेवटचे बाजीराव पेशवे व प्रतिनिधि ह्यांच्या स्त्रियांसंबंधानें ग्रांटडफसाहेबांनीं एके

---

her amazing energy and activity will bear favourable comparison either with the greatest administrators of her country, or with the brightest ornaments of her sex in any land."

१ अहल्याबाईसारख्या लोकोत्तर स्त्रीचें चरित्र सांगोपांग व कागदपत्रांच्या अस्सल माहितीवरून लिहिण्याचा आमचा फार दिवसांचा हेतु होता. परंतु ही माहिती उपलब्ध नसल्यामुळें तो हेतु आजपर्यंत सिद्धीस नेतां आला नाहीं. तथापि कळविण्यास आनंद वाटतो कीं, ह्या उदार व साध्वी स्त्रीच्या चरित्राची बरीच माहिती उपलब्ध झाली असून हें चरित्र लवकरच प्रसिद्ध करण्याचा आमचा मानस आहे.

2. "She is very fair and handsome, and well-deserving to be the object of a treaty."

ठिकाणीं फार प्रशंसा केली आहे. ग्रांटडफसाहेबांस शेवटच्या पेशव्यांची स्त्री वाराणशीबाई हिला वाईहून ब्रह्मावर्तास श्रीमंतांकडे पाठविण्याचा प्रसंग आला, त्या वेळीं ह्या बाईनें फारच चांगलें वर्तन केलें, असें त्यांनीं लिहिलें आहे. एवढेंच नव्हे, तर "हिंदुस्थानांतील उच्च वर्गांतील लोकांशीं वागतांना त्यांच्या मानमरातबांत किंवा शिष्टाचारांत जोंपर्यंत अंतर पडूं दिलें नाहीं, तोंपर्यंत अगदीं श्रेष्ठ दर्जाच्या व विद्याचारसंपन्न अशा युरोपियन लोकांमध्यें जें सौजन्य व जी विनयशीलता आढळून येते, ती त्यांच्या ठिकाणीं दृष्टीस पडते, हें पाहून फार विस्मय वाटतो." असें मोठ्या कौतुकानें लिहिलें आहे[1]. असो.

पेशवाईअखेरपर्यंत मराठ्यांच्या स्त्रियांमध्यें अलौकिक गुण होते, असेंच केवळ मानण्याचें कारण नाहीं. अद्यापि देखील ब्रिटिश सरकारच्या कृपेनें अवशेष राहिलेल्या मराठे संस्थानांत राजकारस्थानपटु, धर्मनिष्ठ, ईश्वरभक्तिपरायण, परोपकाररत, आणि विद्याभिलाषी अशा स्त्रिया क्वचित् क्वचित् चमकत असतात. फलटण संस्थानांतील सगुणाबाई निंबाळकर, औंध संस्थानांतील आईसाहेब पंतप्रतिनिधि, डफळापूर येथील बाईसाहेब डफळे, आणि

आर्या.

सत्संगफल मिळालें सुगमपथा लाविलें मला पतिनें ।
आस्वादिलें यथेष्ट द्विरदमुखकथासुधेसि मन्मतिनें ॥ १ ॥

---

1. "The most *ladylike* Brahmin ladies I ever had occasion to converse with were the wives of the last Peishwa and of the Pratineedhee. The celebrated Waranussee Bye I was obliged to send from Waee, and she behaved *so* well when I told her how disagreeable it was for me to be obliged to tell her that the Sirkar required that she should proceed to join Shreemunt. But so long as one is not obliged to depart from the terms of personal respect, it is surprising how the better classes in India manifest a refinement and polish only known among Europeans of the highest rank and in an advanced state of culture."

अशा प्रेमळ व रसाळ वाणीनें पतिकृपेचा महिमा वर्णन करून ईशस्तवनांत कालक्षेप करणाऱ्या कविराज कै० बापूसाहेब कुरुंदवाडकर ह्यांच्या पत्नी, ह्या स्त्रियाही कमी योग्यतेच्या नाहींत. परंतु त्यांचीं चरित्रें अथवा गुणवर्णनें प्रसिद्ध नसल्यामुळें निर्जन अरण्यांतील जातिकुसुमाप्रमाणें त्यांचा कीर्तिसौरभि कालरूपी वायू भक्षण करीत आहे.

ह्या सर्व स्त्रियांचीं चरित्रें जसजशीं प्रसिद्ध होतील, त्याप्रमाणें आपल्या राष्ट्रांतील स्त्रियांचे उत्तम गुण व त्यांची योग्यता अधिक प्रकाशित होऊन भावी पिढीस त्याचा फार फायदा होईल. परंतु हें काम इतिहासग्रंथ व चरित्रें ह्यांवांचून होणें दुरापास्त आहे. ह्याकरितां प्रत्येकानें यथामति व यथाशक्ति इकडे लक्ष्य देणें अवश्य आहे.

हाच हेतु मनांत धरून झांशीच्या राणीचें चरित्र महाराष्ट्र भाषेंत स्वतंत्र माहिती गोळा करून इ० स० १८९४ सालीं प्रसिद्ध करण्यांत आलें. त्याचा अनेक रसिक व सहृदय वाचकांनीं मोठ्या प्रेमभावानें स्वीकार केला, हें कळविण्यास फार संतोष वाटतो. ह्या पुस्तकास जरी महाराष्ट्रांत चांगला लोकाश्रय मिळाला नाहीं, तरी त्याचीं गुजराथी, बंगाली वगैरे परभाषांतून जीं भाषांतरें प्रसिद्ध झालीं आहेत, तींच त्याच्या लोकप्रियतेची साक्ष होत. अशा प्रकारें प्रथम प्रयत्नास प्रोत्साहन मिळाल्यामुळें इतिहासप्रसिद्ध व कर्तृत्वशाली स्त्रियांची हळूहळू चरित्रमाला गुंफण्याचा आमचा दृढ संकल्प झाला आहे. त्या मालेचें "महाराणी बायजाबाईसाहेब शिंदे ह्यांचें चरित्र" हें द्वितीय पुष्प होय.

बायजाबाईसाहेब शिंदे ह्यांचें नांव जुन्या लोकांच्या मुखांतून मात्र आजपर्यंत ऐकूं येत होतें; परंतु त्यांचें सुसंगत व साधार असें एकही चरित्र प्रसिद्ध नव्हतें. तें प्रसिद्ध करण्याच्या उद्देशानें अनेक इंग्रजी ग्रंथ व जुने लेख ह्यांतून माहिती मिळविण्याचा प्रयत्न केला आहे. अर्थात् हा अगदीं पहिला प्रयत्न असल्यामुळें हें चरित्र सांगोपांग व परिपूर्ण तयार करण्याइतकी विपुल माहिती मिळण्याचा संभव नाहीं. ह्मणून जेवढी माहिती उपलब्ध झाली, तेवढी ह्या चरित्रामध्यें दाखल करून हें ऐतिहासिक चरित्र महाराष्ट्र वाचकांस सादर केलें आहे. बायजाबाईसाहेब शिंदे ह्या गेल्या शतकांतील राजकारणी व कर्तृत्वशाली

स्त्रियांपैकीं एक सुप्रसिद्ध स्त्री असून त्यांचें चरित्र वाचनीय व विचारयोग्य असें आहे. त्याच्या योगानें महाराष्ट्र स्त्रियांच्या अंगीं राज्यकारभार चालविण्याची किती धमक असे, व त्या मर्दुमकीच्या कामांतही कशा निपुण असत, हें चांगलें कळून येतें. मराठ्यांच्या स्त्रिया ह्मणजे गोषामध्यें असणारे बंदीवान, अशी जी प्रचलित समजूत आहे, ती सर्वथा चुकीची आहे, हें ह्या चरित्रावरून दिसून येतें. मराठ्यांच्या स्त्रिया शौर्यपराक्रमाच्या गुणांत परिपूर्ण असून, घोड्यावर बसणें, भाला फेंकणें वगैरे शौर्यविद्या त्यांस चांगली अवगत असे, व गोषाचा प्रतिबंध त्यांना त्या कामीं फारसा होत नसे, असें इतिहासावरून सिद्ध होतें. पेशवाईच्या अखेर अखेर देखील मराठे स्त्रियांना पुष्कळ स्वातंत्र्य होतें, व त्या घोड्यावर बसण्यांत चांगल्या तरबेज होत्या, अशी साधार माहिती मिळते. मि० एल्फिन्स्टन ह्यांनीं "पेशव्यांची बायको भररस्त्यांतून देवदर्शनाकरितां पायीं जात असे, आणि घोड्यावर अथवा उघड्या पालखींत बसून सर्व लवाजम्यासह फिरत असे." असें लिहिलें आहे; आणि स्कॉटवेरिंगसाहेबांनीं बाजीरावसाहेब पेशव्यांची बायको लोकांच्या गर्दींतून घोडा भरधांव फेंकीत जातांना प्रत्यक्ष पाहिल्याचा उल्लेख केला आहे. हीच मर्दानी विद्या बायजाबाईसाहेबांसही अवगत होती व यशवंतराव होळकराची मुलगी भीमाबाई हिलाही येत होती. पहिलीनें सर आर्थर वेलस्लीसाहेबांस आपली अश्वारोहणविद्या व्यक्त करून आश्चर्यचकित केलें, व दुसरीनें महिदपुरच्या लढाईनंतर सर जॉन मालकम ह्यांस आपलें अलौकिक शौर्य व्यक्त करून तोंडांत बोट घालावयास लाविलें.[1] ह्या गोष्टी सांप्रतच्या स्थितींत विचार करण्यासारख्या नाहींत असें कोण ह्मणेल ?

---

1. "After the battle of Mahidpore, the Bheema Bai, Holkar's daughter, with a small body of retainers, for a long time kept the country in a flame. One day Sir John Malcolm was moving with a large force, when the lady was seen on horseback on a neighbouring eminence, attended by only one follower. The order was given to surround the hillock so as to ensure her capture. The slave escaped before the re-

सर जॉन मालकम ह्यांनीं मराठ्यांच्या स्त्रिया संबंधानें जें वर्णन लिहिलें आहे, तें बायजाबाईसाहेबांच्या वेळच्या स्थितीचे अगदीं हुबेहूब प्रतिबिंब असून फार वाचनीय व मनोरंजक आहे. ते लिहितात:–"ब्राह्मण व मराठे संस्थानिक व जहागीरदार ह्यांच्या स्त्रियांचें दरबारामध्यें बहुतकरून फार वजन असतें; व त्यांचा अधिकार व्यक्तिविशेषांवरच चालत नसून त्यांचा राजकारणामध्यें चांगला प्रवेश असतो. मोठ्या दर्जाच्या पुरुषांशीं त्यांचें लग्न झालें, ह्मणजे त्यांस बहुतकरून स्वतंत्र तनखा व जातसरंजाम मिळत असतो, व त्यांना वाटेल तितकें स्वातंत्र्य असतें. त्या आपल्या तोंडावर क्वचित् बुरखा घेतात. त्या नेहमीं जन्मोत्सवाप्रीत्यर्थ मेजवान्या देत असतात, आणि सण-वारानिमित्य सदोदित उत्सव करीत असतात. शिंदे, होळकर आणि पवार ह्यांच्या घराण्यांतील स्त्रियांच्या हातीं किती सत्ता असते तें वर्णन केलेंच आहे. त्यांचें गुप्त खलबतामध्यें अतोनात वर्चस्व चालत आलेंच आहे, परंतु अलीकडे रूढीच्या प्रभावामुळें राज्यकारभारामध्यें देखील त्यांचें फार माहात्म्य वाढलें आहे. पुष्कळ वेळां तर सर्व राजकारणांचें स्वामित्वच प्रसिद्धपणें त्यांच्या हातीं असल्याचें दिसून येतें. त्यांना लिहिणें, हिशेब ठेवणें वगैरेचें ज्ञान बहुतकरून प्राप्त झालेलें असतें. घोड्यावर बसण्याची कला हा त्यांच्या शिक्षणाचा एक नेहमींचा भाग असून, त्यानें त्यांच्या अंगीं स्थितिपरत्वें प्राप्त होणारें राजकीय कर्तव्य उत्तम रीतीनें बजावण्याची पात्रता उत्पन्न होते. यशवंतराव होळकराची मुलगी भीमाबाई हिची व माझी एक वेळ मुलाखत झाली होती. त्या वेळीं तिनें होळकराच्या घराण्याचा व राज्याचा नाश होण्याचा प्रसंग आला असतांना, मोठ्या वक्तृत्वपूर्ण वाणीनें राजकन्येच्या कर्तव्यांचें सुरेख वर्णन केलें, आणि असें सांगितलें कीं, "आमच्यासारख्या निपुत्रिक व विगतपति अबलांनीं

---

quisite cordon could be formed, but the Bheema Bai made no attempt to fly. When, however, it was thought that her apprehension was certain, she suddenly made a dash towards the small party near the General, and owing to the speed of her mare, made her way fast then, and darted off scot-free."

–*Reminiscences of an Indian Official.* Page 89.

अशा आणीबाणीच्या प्रसंगीं आपल्या थोर घराण्याचा लौकिक व राज्य हीं रक्षण करण्याकरितां रणामध्यें सैन्याचें आधिपत्यही स्वतः स्वीकारिलें पाहिजे." भीमाबाई घोड्यावर फार डौलदार रीतीनें बसत असे, आणि तिची भाला फेंकण्याची चतुराई इतर लोकांस क्वचितच साधत असे. खानदानीच्या घराण्यांतील मराठे स्त्रिया बहुधा रेखल्याप्रमाणें सुंदर नसतात; परंतु त्यांचा चेहरा गंभीर असून त्यांच्या मुद्रेवर तेजस्विता आणि हुषारी चांगली प्रगट होते. बहुतकरून सर्व मराठे स्त्रियांनीं, ज्या ज्या वेळीं प्रसंग प्राप्त झाला, त्या त्या वेळीं आपली कार्यक्षमता आणि धैर्यशीलता उत्तम प्रकारें व्यक्त केली आहे. एवढेंच नव्हे, तर त्यांपैकीं कांहींनीं आपला बुद्धिप्रभावहीं लोकविश्रुत केला आंहे." ह्या वर्णनावरून मराठे स्त्रियांविषयीं एकंदरींत Ex ag.

---

1 "The females both of the Brahmin and Shudra Mahrattas have, generally speaking, when their husbands are Princes or Chiefs, great influence, and mix, not only by their power over individuals, but sometimes, as has been shown, personally in affairs of the State. If married to men of rank, they have usually a distinct provision and estate of their own; enjoy as much liberty as they can desire; seldom, if ever, wear a veil; and give feasts and entertainments on births and marriages, and on particular anniversaries. The power which the Mahratta ladies of the families of Scindia, Holkar, and the Puwar enjoy, has been described. They have always had great influence in their secret councils; and usage has latterly given them a considerable and increased share in the Government; and in some cases they have been the acknowledged heads. They are usually instructed in reading, working Arithmetic. The management of the horse always constitutes part of their education, which is directed to qualify them for the duties to which their condition makes them liable to be called. ( In a long conference I had with Bheemabai, the daughter of Jeswuntrao Holkar, she expatiated with much

फार अनुकूल ग्रह उत्पन्न होऊन त्यांतील बायजाबाई किंवा भीमाबाई ह्यांच्या-सारख्या सुप्रसिद्ध व लोकोत्तर स्त्रियांचीं चरित्रें महाराष्ट्र भाषेंत प्रसिद्ध करणें अत्यंत अवश्य आहे असें वाटल्यावांचून राहत नाहीं.

बायजाबाईच्या चरित्राचीं साधनें फारशीं उपलब्ध न झाल्यामुळें त्यांचें चरित्र अतिशय संक्षिप्त व त्रोटक असें झालें आहे. परंतु त्या योगानें त्यांच्या राजकारणचातुर्याची व इतर अनेक गुणांची कल्पना करण्यास हरकत नाहीं. राजकारण व इतिहास ह्यांचा परस्पर संनिकट संबंध असल्यामुळें खऱ्या इतिहासाच्या अभावीं बायजाबाईचीं राजकारस्थानें आजपर्यंत निव्वळ गप्पा बनून राहिलीं आहेत. त्यांस इतिहासाची खरी मदत मिळेल, त्या वेळीं तींच राजकारणें अधिक गंभीर व विचारार्ह अशीं भासतील. बायजाबाईंच्या वेळच्या कित्येक राजकारणांचा उलगडा करण्यास त्यावेळचा खरा इतिहास अवश्य प्रसिद्ध झाला पाहिजे. त्यावांचून पुष्कळ गोष्टींचा खुलासा होणें शक्यच नाहीं. अशा गोष्टी जरी एकीकडे ठेविल्या, तरी बायजाबाईंच्या कारकीर्दींत नेटिव्ह संस्थानांच्या वारसासंबंधानें गव्हरनरजनरल लॉर्ड आह्मर्स्ट ह्यांनीं जो उदारपणा दाखविला, तो फार लक्ष्यांत घेण्यासारखा आहे.[१] त्या वेळीं एतद्देशीय संस्थानिकांस

eloquence on the duties inculcated as those of a Mahratta Princess, when the interest of her family and nation were at stake. It was, she said, an obligation for such in extreme cases (where she had neither husband nor son) to lead her troops in person to battle. Bheemabai rode with grace, and a few excelled her in the management of the spear.) The Mahratta ladies of rank may be generally described as deficient in regular beauty, but with soft features and expression that marks quickness and intelligence. They have almost all, when called forth, shown energy and courage, and some of them great talent."

१ लॉर्ड आह्मर्स्ट ह्यांनीं ग्वाल्हेर संस्थानच्या वारसाबद्दल त्या वेळीं जें लिहिलें आहे तें वाचण्यासारखें आहे:—

"Nothing could be farther from the wish and intention of the British Government than to exercise, now and hereafter, any intervention in the internal administration of his

सार्वभौम ब्रिटिश सरकार फार स्वतंत्र रीतीनें वागवीत असून, त्यांच्या अंतर्व्यवस्थेंत हात घालण्यास तें किती नाखूष असे; व त्यांच्या गादीवर त्यांस (संस्थानिकांस) योग्य वाटेल तो मनुष्य बसविण्यास त्यांची किती मुभा असे, हें चांगलें शिकण्यासारखें आहे. ह्या उदार राजनीतीचें उत्तम उदाहरण ग्वाल्हेर संस्थान हेंच होय, असें ह्मणण्यास व त्याबद्दल ब्रिटिश सरकारच्या पूर्वीच्या उदार राजनीतीचें अभिनंदन करण्यास हरकत नाहीं.

बायजाबाईसाहेबांच्या चरित्रांत आणखी एक गोष्ट फार महत्त्वाची आहे. ती ही कीं, इ. स. १८५७ च्या बंडाच्या प्रसंगीं त्यांनीं ब्रिटिश सरकारचा पक्ष स्वीकारून त्यास अप्रतिम साहाय्य केलें. बायजाबाईसाहेब ह्यांस ब्रिटिश सरकारावर रुष्ट होण्यासारखें कारण असून त्यांनीं उदार मनानें त्यांस मदत केली, ही फार प्रशंसनीय गोष्ट आहे. ह्या उदाहरणावरून बंडाचे वेळीं हिंदुस्थानांतील स्त्रियांनीं देखील इंग्रज सरकारास किती उत्तम मदत केली हें चांगलें दिसून येतें. बायजाबाईसाहेबांप्रमाणें इतर उदाहरणें अनेक आहेत. ब्रह्मावर्त येथील पेशव्यांच्या बायकांनीं युरोपियन स्त्रियांस बंडाचे वेळीं चांगली मदत केली, असा उल्लेख जस्टिन म्याकर्थी ह्यांनीं आपल्या ग्रंथांत केला आहे. होळकराची राणी ताईसाहेब व नागपूरची राणी बांकाबाई ह्यांनींही त्या वेळीं असेंच उत्कृष्ट साहाय्य केलें. ह्यावरून आमच्या राजस्त्रियांनादेखील देशकालप्रसंग ओळखण्याचें शहाणपण असून त्यांच्या ठिकाणीं ब्रिटिश सरकाराविषयीं प्रेमादरभाव वसत

---

(Scindia's) country—that it did not pretend to any right to control or regulate the succession to the state of Gwalior—that its sole motive in offering advice on the subject was the interest which it took in the maintenance of the general tranquillity"—that Scindiah, as the absolute and despotic ruler of the country, must be considered to possess the undoubted right of determining the succession,"—and that it was prepared to recognize any selection that might be "made by the general voice, or by a majority of the chiefs and principal persons of the country, according to the usage, whether the letter of the written law was adhered to or not."

आहे हें चांगलें सिद्ध होतें. तात्पर्य, महाराष्ट्र स्त्रियांच्या चरित्रांवरून अनेक प्रकारचा बोध होण्यासारखा आहे, ह्यांत शंका नाहीं.

वायजाबाईंच्या चरित्रामध्यें माहितीच्या कमतरतेमुळें अनेक दोष घडण्याचा संभव आहे. ह्याकरितां त्याबद्दल प्रांजलपणें माफी मागून, आणखी माहिती कोणाजवळ असल्यास ती त्यांनीं आमच्याकडे अवश्य पाठवावी, अशी प्रार्थना आहे. तिचा द्वितीय आवृत्तीच्या वेळीं उपयोग करण्यांत येईल.

शेवटीं, आणखी एका गोष्टीचा उल्लेख करणें येथें अवश्य आहे. पूर्वीं प्रसिद्ध केलेलें झांशीच्या राणीचें चरित्र सर्वांच्या आदरास पात्र झालें आहे, हें वर निर्दिष्ट केलेंच आहे. तथापि त्या चरित्राच्या लेखनशैलीसंबंधानें एका विद्वान् टीकाकारांनीं असा आक्षेप घेतला आहे कीं, तें कल्पनेच्या साहाय्यानें फुगवून लिहिलें आहे. परंतु हा आक्षेप अगदीं वृथा आहे. ह्या टीकेचा अर्थ, केवळ मनःकल्पित गोष्टीची भर घालून ग्रंथविस्तार केला, असा असेल तर तें ह्मणणें यथार्थ नाहीं. कारण, त्या ग्रंथांत प्रमाणावांचून कोणतीही गोष्ट लिहिलेली नाहीं. परंतु इतिहास किंवा चरित्रवर्णनांत कल्पनाशक्तीची मुळींच मदत न घेतां, नुसती शुष्क हकीकत दाखल करावी, आणि त्यांत, शब्दसौष्ठव, भाषालंकार अथवा वर्णनचमत्कार वगैरे कांहीं नसावें, असा उद्देश असेल, तर तो आह्मांस मान्य नाहीं.

इतिहास ह्मणजे मेकालेसाहेबांच्या व्याख्येप्रमाणें काव्य आणि तत्वज्ञान ह्यांचें मिश्रण होय. अर्थात् ह्या मिश्रणाचें साहाय्य घेतल्यावांचून कोणतेंही ऐतिहासिक चरित्र हृदयंगम आणि सुरस वठणार नाहीं. ह्याप्रमाणें पाहिलें असतां, चरित्रग्रंथामध्यें वर्णनात्मक व कल्पनाप्रचुर लेखनशैली कां ठेवूं नये हें समजत नाहीं. अस्सल माहितीच्या आधारें, सत्यास न सोडितां, वाटेल त्या तऱ्हेनें चरित्रग्रंथास रमणीयत्व प्राप्त होईल अशी भाषाशैली ठेवणें हें प्रत्येक ग्रंथकाराचें अवश्य कर्तव्य आहे. चरित्र व काव्य ह्यामध्यें किती निकट संबंध आहे, तें आंग्ल भाषेंतील प्रख्यात ग्रंथकार कार्लाइल ह्यानें एके ठिकाणीं सांगितलेंच आहे. तो ह्मणतोः—

" There is no heroic poem in the world but is at bottom a biography, the life of a man; and there is no life of a man, faithfully recorded, but is a heroic poem of its sort, rhymed or unrhymed."

ह्या उक्तीचें रहस्य ज्या मार्मिक वाचकांच्या लक्ष्यांत येईल, त्यांच्याकडून चरित्रग्रंथांतील कल्पनाप्राचुर्य व भाषासौंदर्य काढून तो रसहीन व रंजनशून्य करावा, अशी अप्रयोजक सूचना कधींही येणार नाहीं.

अखेर, हा चरित्रग्रंथ वाचून पाहण्याचे कामीं मराठी भाषेचे भोक्ते व माझे सन्मान्य मित्र रा. सा. विष्णु कृष्ण भाटवडेकर बी. ए. एल्. एल्. बी. ह्यांनीं जें कृपासाहाय्य केलें, त्याबद्दल त्यांचे फार फार आभार मानून ही प्रस्तावना संपवितों.

ता. १ मार्च १९०२. } दत्तात्रय बळवंत पारसनीस.

# विषयानुक्रम.







## बायजाबाईसाहेबांचा शिक्का.

॥ श्रीनाथ ॥

॥ श्री ज्योतिस्वरूपचरणीं तत्पर ॥

॥ दौलतरावशिंदे–गृहिणी बायजाबाई निरंतर ॥



# महाराणी बायजाबाईसाहेब शिंदे ह्यांचें चरित्र.

## भाग १ ला.

### शिंदे घराण्याचा अल्प वृत्तांत.



शिंदे ह्यांचें घराणें महाराष्ट्राच्या इतिहासांत फार प्रसिद्ध आहे. हें घराणें फार पुरातन असून, ह्यांतील कित्येक पुरुष, भोंसले, शिर्के, घोरपडे, जाधव, घाटगे वगैरे जुन्या मराठे सरदारांप्रमाणें मुसलमानी अमदानींत स्वपराक्रमानें उदय पावले असावेत, असें मानण्यास जागा सांपडते. 'रविराव' हें, 'रुस्तुमराव' 'झुंझारराव' ह्यांसारखें बहुमानदर्शक पद शिंद्यांच्या एका घराण्याकडे होतें, असा उल्लेख ग्रांटडफ साहेबांच्या इतिहासांत दृष्टीस पडतो. ब्राह्मणी राज्यामध्यें शिंदे नांवाचे पुरुष मोठमोठे लष्करी अधिकार उपभोगीत होते, अशीही माहिती मिळते. मुसलमानी अमदानींतील मराठे सरदारांचा इतिहास अगदीं अंधकारांत असल्यामुळें त्याविषयीं अधिक खुलासा करितां येत नाहीं. तथापि महाराष्ट्रराज्यसंस्थापक छत्रपति शिवाजी महाराज ह्यांच्या कारकीर्दीपासून शिंदे घराण्यांतील पुरुषांचा नामनिर्देश जुन्या बखरी व जुने कागदपत्र ह्यांत यथास्थित सांपडतो; व त्यावरून हें घराणें मराठेशाहीच्या अगदीं प्रारंभापासून अस्तित्वांत आहे, असें निःसंशय ह्मणतां

येतें. शिवाजी महाराजांचे पदरीं नेमाजी शिंदे ह्या नांवाचे एक प्रबल व पराक्रमी सुभेदार होते; व त्यांनीं महाराष्ट्रराज्यस्थापनेचे कामीं चांगली मदत केली होती. नेमाजी शिंदे ह्या पुरुषांचें नांव थोरले

१ नेमाजी शिंदे ह्यांच्या नांवाचा उल्लेख, कृष्णाजी अनंत सभासदविरचित "शिवछत्रपतीचें चरित्र"-पृष्ठ ८१ ह्यामध्यें, शिलेदार व मुलुखाचे सुभेदार ह्यांच्या यादीमध्यें आलेला आहे, व इतर ग्रंथांतरींही आहे. तथापि ह्या पुरुषाची माहिती फारशी उपलब्ध नसल्यामुळें शिंद्यांचें घराणें मराठी राज्याच्या प्रारंभापासून अस्तित्वांत आहे, असें पुष्कळ लोकांस माहीत नाहीं. परंतु त्याबद्दल आह्मांस मुळींच संशय नाहीं. थोरले बाजीराव ह्यांनीं जिवाऊ शिंदे ह्यांस लिहिलेलें एक फार जुनें पत्र उपलब्ध झालें आहे. त्यामध्यें नेमाजी शिंदे ह्यांच्या मराठी राज्यांतील पुरातन सेवेचा यथास्थित उल्लेख असून, महिपतराव शिंदे ह्यांनीं तशीच सेवा करावी व नक्ष करावा ह्मणून लिहिलें आहे. हें पत्र फार वाचनीय व महत्त्वाचें असल्यामुळें येथें दिल्यावांचून राहवत नाहीं.

"गंगाजलनिर्मल जिवाऊ शिंदी यांसी—

प्रीतिपूर्वक बाजीराव बल्लाळ प्रधान आशीर्वाद उपरी येथील कुशल जाणोन स्वकीय कुशल लिहीत जाणें. विशेष. तुह्मांकडून राजश्री त्रिंबक गोपाळ आले. त्यांनीं कितेक अर्थ निवेदन केला. त्याजवरून सविस्तर कळों आलें. व राजश्री महिपतराव शिंदे यांचेविसीं कितेक विदित केलें. ऐशास मशारनिल्हे पुरातन राज्यांतील सेवक; व पूर्वीं राजश्री नेमाजी शिंदे यांणीं या राज्यांत कोणे रीतीनें सेवा केली आहे व कितेक कामकाजें केलीं, त्यांचे जागां मशारनिल्हे आहेत. त्यांणीं सर्वप्रकारें जातीनें अंगेजणी करून, तोलदार फौज धरून, दुष्टास नतीजा देऊन, आपला नक्ष करावा. हा समय हाच आहे. येविसींचा कितेक अर्थ राजश्री त्रिंबक गोपाळ यांस सांगितला आहे. हे तुह्मांस सांगतील. तीं वचनें आमचींच जाणून, तुह्मीं मशारनिल्हेस उत्तेजन देऊन, सांगितल्याप्रमाणें कार्यभाग केलियानें हें घर तुमचेंच आहे. आह्मी सर्वस्वें तुमचे असों. यास संदेह नाहीं. जाणिजे. छ० ६ जिल्हेज."

ह्या पत्रावरून जिवाऊ शिंदे ही बाई फार वजनदार व राजकारस्थानी असावी असें दिसतें.

शाहू महाराजांचे कारकीर्दींतील अव्वल राजकारणप्रसंगांत वेळोवेळीं दृष्टीस पडतें. त्यावरून हा महाराष्ट्रवीर समरभूमीवर बरींच वर्षें चमकत असावा असें वाटतें. थोरले राजाराम महाराज ह्यांचे कारकीर्दींत जे लोकोत्तर स्वदेशभक्त निर्माण झाले, व ज्यांनीं जीवादारभ्य श्रमसाहस करून स्वराज्य रक्षण केलें, त्या परम वंदनीय वीरमंडलामध्यें नरसोजी व जिवाजी पाटील शिंदे तोरगलकर पागनीस ह्या दोघांचीं नावें अंतर्भूत आहेत. ह्यावरून शिंदे घराणें हें पूर्वींपासून विख्यात आहे, असें ह्मणण्यास हरकत नाहीं.

शिंदे घराण्याच्या थोरपणाबद्दल आणखी एक दाखला सांपडतो. औरंगजेब बादशाहानें, आपल्या पदरचे सरदार कण्हेरखेडकर शिंदे ह्यांच्या कन्येशीं शाहू महाराजांचें लग्न इ. स. १७०६ सालीं लावून दिलें, ही गोष्ट इतिहासांत प्रसिद्धच आहे. ह्या मुलीचें नांव सावित्रीबाई असें होतें. ही इ. स. १७१० मध्यें वारली. अर्थात् छत्रपति शाहू महाराज ह्यांच्या क्षत्रियकुलावतंस व सर्वश्रेष्ठ महाराष्ट्रकुलाशीं ज्या घराण्याचा शरीरसंबंध जडला होता, तें घराणें हीन ज्ञातीचें असेल हें संभवनीय दिसत नाहीं. क्याप्टन क्ल्यून्स ह्यांचेंही असेंच मत आहे.

प्रकृत चरित्रनायिका श्रीमती महाराणी बायजाबाईसाहेब ज्या शिंदे घराण्यांत प्रसिद्ध झाल्या, त्या घराण्याचा मूळ पुरुष राणोजी शिंदे हा होय. ह्याची माहिती देतांना, मध्य हिंदुस्थानचे इतिहासकार सर जॉन मालकम ह्यांनीं असें लिहिलें आहे कीं, शिंदे ह्यांचें घराणें मूळचें शूद्र जातीचें असून त्यांचा मूळ पुरुष राणोजी हा होय. हा मूळचा कण्हेरखेडचा पाटील होता. तो प्रथमतः बाळाजी विश्वनाथ पेशवे ह्यांच्या पदरीं नौकरीस राहिला. त्या वेळीं त्याजकडे खिजमतगाराचें ह्मणजे हुजऱ्याचें काम होतें. पुढें तो बाजीराव बल्लाळ पेशवे ह्यांचे कार-

कीर्दींत हुजऱ्याच्या जागेवरून पागेचा शिलेदार बनला. ह्या संबंधानें अशी आख्यायिका प्रसिद्ध आहे कीं, बाजीराव साहेब एके वेळीं शाहू महाराजांस भेटण्याकरितां राजवाड्यांत गेले. त्या वेळीं त्यांचा हुजऱ्या राणोजी हा, नेहमींप्रमाणें त्यांच्या चर्मपादुका हातीं घेऊन, दाराशीं बसला. तितक्यांत त्यांस आकस्मिक निद्रा लागली. बाजीराव साहेब छत्रपतींची भेट घेऊन दाराबाहेर आले; तों, त्यांचा स्वामिनिष्ठ सेवक त्यांच्या चर्मपादुका उराशीं घट्ट धरून बसलेला त्यांच्या नजरेस पडला. अर्थात् हुजऱ्याची स्वामिभक्ति पाहून त्यांस आश्चर्य वाटलें व फार संतोष झाला. नंतर त्यांनीं लवकरच त्यास आपल्या पागेमध्यें शिलेदाराची जागा दिली. येणेंप्रमाणें राणोजीचा भाग्योदय झाला. ही मालकम साहेबांनीं दिलेली आख्यायिका खरी आहे. ह्याबद्दल ग्वाल्हेरचे रेसिडेंट क्याप्टन स्टुअर्ट यांनीं चौकशी-अंतीं खात्री करून घेतलेली आहे. ह्या आख्यायिकेच्या पुष्टिकरणार्थ त्यांनीं आणखी असें लिहिलें आहे कीं, "राणोजीनें ह्या पेशव्यांच्या जुन्या चर्मपादुका आपल्या भाग्योदयाचें मूळकारण आहेत असें समजून, त्या नीट जतन करून ठेविल्या होत्या; व त्याविषयीं तो फार पूज्यभाव बाळगीत असे." राणोजीची ही स्वामिनिष्ठा पाहून कोणाचें हृदय आनंदानें उचंबळणार नाहीं बरें? असो. राणोजीच्या उदयासंबंधानें सर जॉन मालकम् ह्यांनीं जी दंतकथा दिली आहे, तिच्यावरून राणोजी प्रथमतः हलक्या दर्जाचा नोकर होता असें दिसून येतें. तथापि त्यामुळें शिंद्यांचें घराणें कमी योग्यतेचें होतें, असें मात्र मानितां येत नाहीं.

राणोजीचा चरित्रवृत्तांत फार मनोरंजक व वीररसपरिप्लुत असा आहे. तो समग्र दाखल करण्याचें हें स्थळ नाहीं. तथापि त्याच्या व त्याच्या वंशजांच्या कारकीर्दींचें अत्यल्प सिंहावलोकन ह्या भागांत सादर करणें अवश्य आहे.

अठराव्या शतकाच्या प्रारंभीं, मराठी राज्याच्या अभ्युदयार्थ जे पराक्रमपटु व शौर्यशाली वीरपुरुष अवतीर्ण झाले, त्यांमध्यें राणोजी शिंदे व मल्हारजी होळकर हे दोघे प्रमुख होत. इ. स. १७२५ सालापासून ह्या उभय वीरांच्या मर्दुमकीस प्रारंभ झाला, व छत्रपति शाहू महाराज व पेशवे ह्यांच्याकडून त्यांच्या रणशौर्याचें अभिनंदन होऊन, त्यांस जहागिरी व सरंजाम बक्षीस मिळूं लागले. राणोजी शिंदे ह्यास छ ५ मोहरम सीत अशरीन ह्या तारखेस सरदारी व पालखीचा सरंजाम मिळाला, व तेव्हांपासून त्याचा उत्कर्ष होत चालला. ह्यानें बाजीराव पेशवे ह्यांच्या निरनिराळ्या मोहिमांमध्यें पराक्रमाचीं अलौकिक कामें करून मराठी राज्यास उत्कृष्ट मदत केली; व दिल्लीपर्यंत मराठ्यांचा झेंडा फडकवून, पुष्कळ प्रांत व चौथ सरदेशमुखींचे हक्क मराठ्यांस प्राप्त करून दिले. दिल्लीकडील इ. स. १७३६ सालच्या स्वारीमध्यें राणोजीनें ८००० मुसलमान स्वारांशीं टक्कर देऊन व त्यांची वाताहत करून जो विजय मिळविला, तो फार प्रशंसनीय होता. ह्यानें निजामावरील मोहिमांमध्यें व वसईच्या स्वारीच्या वेळीं आपलें शौर्यतेज चांगलें प्रकाशित केलें. हा रणशूर सरदार इ. स. १७४७ चे सुमारास सुजालपूर येथें मृत्यु पावला. मरणसमयीं ह्याजकडे एकंदर ६५ लक्षांचा प्रांत होता. जो पुरुष प्रारंभीं एक लहानसा हुजऱ्या होता, तो पुढें स्वतःच्या कर्तृत्वानें व मर्दुमकीनें इतका ऐश्वर्यसंपन्न बनला; हें लक्ष्यांत घेतलें, ह्मणजे स्वतःच्या कर्तृत्वानें मनुष्यास आपला कसा अभ्युदय करून घेतां येतो, हें चांगलें शिकण्यासारखें आहे. असो. राणोजीची छत्री उत्तर हिंदुस्थानांत सुजालपूर ह्या गांवीं असून तेथें राणेगंज ह्या नांवाची पेठ वसली आहे. सुजालपूर हा गांव पेशव्यांकडून छ १ रजब समान आर्बैन ह्या तारखेस राणोजीच्या छत्री-

१ ता० २९ जून इ. स. १७४७ रोज सोमवार.

करितां इनाम देण्यांत आला असून, अद्यापि तो छत्रीच्या उत्सवाकडे चालत आहे. राणोजीस मैनाबाई नामक लग्नाच्या बायकोपासून जयाजी ऊर्फ जयाप्पा, दत्ताजी, व जोतिबा ऊर्फ जोत्याजी असे तीन पुत्र, व चिमाबाई नामक राखेपासून महादजी व तुकोजी असे दोन पुत्र, मिळून एकंदर पांच पुत्र होते. हे एकापेक्षां एक पराक्रमी व कर्तृत्ववान् निपजून, त्यांनीं आपल्या देशभूमीची अप्रतिम सेवा बजाविली; व इतिहासांत आपली कीर्ति अजरामर करून ठेविली.

राणोजी मृत्यु पावल्यानंतर त्याची जहागीर व सरदारीचीं वस्त्रें जयाजीस मिळालीं. हा जयाजी मराठ्यांच्या इतिहासांत जयाप्पा ह्या नांवानें फार प्रसिद्ध आहे. ह्यानें आपल्या वडिलांप्रमाणें शौर्याचीं अनेक कामें करून, मराठ्यांची सत्ता उत्तरेकडे वृद्धिंगत केली. ह्या पुरुषाच्या पराक्रमकथा फार आल्हाददायक असून, त्यांत मराठ्यांचें शौर्य, मराठ्यांचा अभिमान, मराठ्यांची कर्तृत्वशक्ति आणि मराठ्यांचें ओज इत्यादि प्रशंसनीय गुण ओतप्रोत भरले आहेत. ह्यानें ज्या वेळीं रोहिल्यांचा पराभव करून अयोध्येचा नबाब सफदरजंग ह्यास वजिरी प्राप्त करून दिली, व मराठ्यांच्या यशोवैभवाचा झेंडा रोहिलखंडांत नेऊन उभारला; त्या वेळीं बाळाजी बाजीराव पेशवे ह्यांनीं त्याचा जो गौरव केला आहे, तो केवळ अपूर्व आहे. “शाबास तुमच्या हिंमतीची व दिलेरी रुस्तुमीची; व शाबास लोकांची! आमच्या दक्षिणच्या फौजांनीं गंगायमुनापार होऊन, रोहिले पठाणांशीं युद्ध करून, आपण फत्ते पावावें, हें कर्म लहान सामान्य न झालें. तुह्मीं एकनिष्ठ, कृतकर्मे सेवक, या दौलतीचे स्तंभ आहां!! जें चित्तावर धरितां, तें घडून येतें!!” इत्यादि पेशव्यांचीं गौरववचनें वाचून, कोणा सहृदय वीराच्या नेत्रांतून आनंदाश्रू येणार नाहींत बरें? जयाप्पा शिंदे ह्यांनीं लढवय्या रोहिले लोकांशीं घनघोर युद्धें केलीं, व महापराक्रमी रणझुंजार रजपूत वीरांना

देखील 'दे माय धरणी ठाय' करून सोडिलें. मारवाडावरील मराठ्यांच्या स्वारीवर, राजस्थानांतील भाटांनीं जीं कवित्तें रचलीं आहेत, त्यांत, जयाप्पा शिंद्याच्या रणपटुत्वाचें विस्मरण रजपूत लोकांस कधींही होणार नाहीं, असें ध्वनित केलें आहे. असो.

जयाप्पा शिंदे ह्यांचा नागोरच्या वेढ्यामध्यें जोधपुरचा राजा बिजेसिंग ह्यानें अत्यंत कपटानें मारेकऱ्यांकडून वध करविला. मृत्युसमयीं जयाप्पाचे बंधु दत्ताजी शिंदे हे जवळ होते. ते प्रियबंधूचा शस्त्रविदीर्ण व अचेतन देह अवलोकन करून शोक करूं लागले. त्या वेळीं हा लोकोत्तर वीरपुरुष आपल्या बंधूस हिंमत देऊन बोलता झाला कीं, "वैरी युद्धास आला आणि तूं रांडेसारखा रडतोस! हें क्षात्रधर्मास उचित नाहीं. आतां मजला कांहीं होत नाहीं. तुह्मीं शत्रुपराभव करावा." अहाहा! इतकें अलौकिक क्षात्रतेज ज्याच्या अंगीं चमकत होतें, तो योद्धा मृत्यूची काय पर्वा करणार आहे? मोरोपंतांनीं ह्मटलेंच आहेः—

**मरण रुचे वीराला, न रुचे परि कधीं अपयशें मळणें ।**

---

१ टॉड साहेबांच्या राजस्थानच्या इतिहासांत पुढील पद्य दिलें आहे:—

याद घणा दीन आवेशी, हाप्पा वाला हेल ।
भागा तीनो भूपति, माल खजाना मेल ॥ १ ॥

ह्याचा तात्पर्यार्थ असा कीं, "आप्पाच्या रणप्रसंगाची आठवण लोकांस पुष्कळ दिवस राहील. रणांत पाठ न दाखविणारे मारवाड, बिकानीर, व रूपनगर येथील तीन भूपति देखील रणांगणांमध्यें आपलें सर्व सामानसुमान व जडजवाहीर टाकून पळून गेले!"

२ जयाप्पा शिंदे नागोरच्या वेढ्यामध्यें मारले गेले, त्या वेळीं श्री० रघुनाथराव पेशवे ह्यांनीं जयाप्पाचे चिरंजीव जनकोजी शिंदे ह्यांस जें समाधानपत्र पाठविलें, त्याचें उत्तर आह्मांस उपलब्ध झालें आहे. तें फार हृदयद्रावक असून त्यांतही जनकोजीचें क्षात्रतेज चमकत आहे. ह्मणून तें येथें सादर करितों:—

जयाप्पा शिंदे आपला पुरुषार्थ गाजवून इहलोक सोडून गेल्यानंतर त्यांचे बंधु दत्ताजी शिंदे व पुत्र जनकोजी शिंदे ह्यांनीं अनेक युद्धांमध्यें आपल्या पराक्रमाची सीमा करून दाखविली. गिलचे व दुराणी ह्यांचा व मराठ्यांचा जो घनघोर रणसंग्राम झाला, त्यांत तर ह्या वीरपुरुषांनीं भारतीय योद्ध्यांप्रमाणें आपलें रणवीर्य व्यक्त केलें. दत्ताजी शिंदे व जनकोजी शिंदे ह्यांच्या सोनपतपानपतच्या मोहिमेमधील शौर्यकथा

---

"श्रीमंत राजश्री दादासाहेब स्वामींचे सेवेसीः–

विनंति सेवक जनकोजी शिंदे कृतानेक दंडवत विज्ञापना. सेवकाचें वर्तमान तागायत छ २ मोहरम मु॥ नागोर स्वामींचे आशीर्वादें यथास्थित असे. विशेषः–आज्ञापत्र पाठविलें तें पावलें. तेथें आज्ञा, "जयाजी शिंदे...... निधन पावले, हें वृत्त ऐकून अंतःकरण परम विक्षेपातें पावलें. दुःखाचा कल्पांत झाला. विवेकेंकरून झाल्या श्रमाचें परिमार्जन करणें. ईश्वरतंत्रास उपाय नाहीं. या गोष्टीचा खेद करीन म्हटल्यास साध्य नाहीं. तरी तुह्मीं सर्वांचें समाधान करून, बहुत सावधपणें राहून, राजश्री दत्तबाचे आज्ञेंत राहत जाणें. तुह्मी आह्मांस लेकाप्रमाणें आहांत. सर्वही कुशल ईश्वर करील" ह्मणोन आज्ञा. ऐसियास तीर्थरूप कैलासवासी जाले, या दुःखास पारच नाहीं. परंतु शत्रु संनिध असतां दुःखार्णवीं पडलिया परिणाम नाहीं. स्वामीसेवेसी अंतर पडतें. याजकरितां आज्ञेप्रमाणें दुःखपरिहार करून स्वामीसेवेसी तत्पर असों. आमचे छत्र तरी स्वामीच आहेत. स्वामींची आज्ञा व तीर्थरूप राजश्री पाटीलबावांची आज्ञा वितरिक्त वावगी वर्तणूक होणेंच नाहीं. तीर्थरूप कैलासवासींचे हातून सेवा घेतली, त्याप्रमाणें अभिमानपुरस्सर आह्मां लेकरांपासून सेवा घेऊन अधिकोत्तर ऊर्जित करणार स्वामी समर्थ आहेत. आह्मी स्वामींचे आज्ञाधारक सेवक आहोंत. आज्ञेप्रमाणें सेवा करावी हेंच उचित आहे. कैलासवासी तीर्थरूपांचा संकल्प सिद्धीस पाववणार व शत्रूचें यथास्थित पारपत्य करणार स्वामी धणी समर्थ आहेत. येथील वृत्त आलाहिदा पुरवणीपत्रीं लिहिलें आहे. त्यावरून विदित होईल. सेवेसी श्रुत होय हे विज्ञप्ति."

केवळ अपूर्व आहेत. त्या वेळीं प्रत्यक्ष वीररसानें त्यांच्या अंगीं मूर्तिमंत संचार केला होता कीं काय, असा भास होतो. दत्ताजी शिंदे रणांत घायाळ होऊन पडले, त्या वेळीं रोहिल्यांचा सरदार कुतुबशाह ह्यानें दुष्टबुद्धीनें त्यांस विचारिलें कीं, "पटेल, हमारे साथ तुम् और लढेंगे ?" त्या वेळीं ह्या मर्द पुरुषानें उत्तर दिलें कीं " निशा अकताल्ला! बचेंगे तो और बी लढेंगे". अर्थात् अशा महारथी योद्ध्याचा रणोत्साह पाहून प्रत्यक्ष रणदेवतेस देखील कौतुक वाटेल, मग इतरांची ती गोष्ट काय ? दत्ताजी शिंदे यांचा कुतुबशाहानें शिरच्छेद करून त्यांचें शीर अहमदशाह आबदाल्लीकडे नजर पाठविलें. तें शीर परत मिळविण्यास मराठ्यांस, अयोध्येचा नबाब सुजाउद्दौला ह्यास मध्यस्ती घालावें लागलें; व त्याकरितां तीन लक्ष रुपये बादशाहास खंडणी द्यावी लागली!! नुसत्या गतासु कलेवराच्या शिरास जर तीन लक्ष रुपये किंमत द्यावी लागली, तर प्रत्यक्ष त्या वीराची किंमत काय असेल ? अर्थात् असा अमूल्य मोहरा हरपल्यामुळें महाराष्ट्राचें अत्यंत नुकसान झालें ह्यांत शंका नाहीं.

दत्ताजी शिंदे ह्यांचा अंत झाल्यानंतर मराठ्यांचें व गिलच्यांचें शेवटचें तुमुल युद्ध झालें. त्यांत जनकोजी शिंदे ह्यांनीं भारतीय युद्धांतील धृष्टद्युम्नाप्रमाणें पराक्रम गाजविला. त्यांस तोफेचा गोळा व भाल्याची जखम लागून ते रणांगणीं पडले; व शत्रूंनीं त्यांचा विद्ध देह पाडाव केला. त्यांस जिवंत सोडविण्याकरितां सुजाउद्दौल्याचा वकील पंडित काशीराज ह्यानें फार खटपट केली. परंतु ती निष्फल होऊन अखेर त्यांचा पाषाणहृदयी व कपटपटु नजीबखान रोहिल्यानें निर्दयपणानें वध केला.

ह्याप्रमाणें राणोजी शिंद्याचे वीरपुत्र एकामागून एक धारातीर्थीं पतन पावले. राणोजीस जयाजी व दत्ताजी ह्यांशिवाय जोतिबा ह्या

नांवाचा तिसरा पुत्र होता. तोही बुंदेलखंडांतील वोढसेप्रांतीं बरवासागर[1] गांवीं स्वामिकार्यावर लढत असतां मृत्यु पावला. ह्याप्रमाणें राणोजीच्या औरस संततीपैकीं तिन्हीं पुत्रांचा निकाल लागला. त्याशिवाय त्यास तुकोजी व महादजी असे दोन राखेच्या पोटचे पुत्र होते. ते दोन्ही पानिपतच्या युद्धामध्यें हजर होते. त्यांपैकीं तुकोजी त्याच युद्धांत मृत्यु पावला. बाकी फक्त महादजी राहिला. तो मोठ्या शर्थीनें जीव बचावून परत आला. त्यानें पुढें आपल्या तरवारबहादुरीनें पानिपतच्या युद्धांत गत झालेली मराठ्यांची अब्रू परत मिळविली; व आपल्या शौर्याचा कीर्तिध्वज सर्व हिंदुस्थानभर फडकत ठेविला.

महादजी ऊर्फ पाटीलबावा ह्यांचें चरित्र फार महत्त्वाचें आहे. पानिपतच्या मोहिमेनंतर मराठ्यांचीं जेवढीं ह्मणून महत्त्वाचीं राजकारणें झालीं, त्या सर्वांमधें पाटीलबावा ह्यांचें नांव प्रमुखत्वेंकरून चमकत आहे. किंबहुना, अठराव्या शतकाच्या उत्तरार्धांत मराठ्यांचा तेजोरवि जो पुनः प्रकाशित झाला, तो केवळ ह्या लोकोत्तर पुरुषाच्या परिश्रमाचेंच फल होय असें ह्मटल्यास फारशी हरकत येणार नाहीं. पुणेंदरबारचीं कारस्थानें ज्याप्रमाणें नाना फडणविसांनीं चालविलीं, त्याप्रमाणें पाटीलबावांनीं उत्तर हिंदुस्थानांतील सर्व मनसबे युक्तिप्रयुक्तीनें सिद्धीस नेले. त्यांचें लष्करी धोरण शिवाजी महाराजांच्या तोडीचें असून, पाश्चिमात्य राष्ट्रांची सुधारलेली सैन्यरचना व युद्धपद्धति ह्यांचें महत्त्व त्यांच्या लक्ष्यांत चांगलें आल्यामुळें, त्यांनीं, डी बॉयन, पेरन वगैरे युद्धकलाकुशल फ्रेंच लोक आपल्या पदरीं ठेवून, मराठी सैन्याची सुधा-

---

१ बरवासागर हा गांव पेशव्यांनीं जोतिवाच्या शौर्याबद्दल शिंद्यांस छ २६ मोहरम सल्लास खमसैन (ता० ३ दिसेंबर इ. स. १७५२) रोजीं इनाम दिला होता. त्यावरून जोतिबाचा मृत्यु त्याच्या अगोदर थोडे दिवस झाला असावा हें उघड आहे.

रणा उत्तम प्रकारची केली होती. त्यामुळें त्यांचें सैन्य व तोफखाना पाश्चिमात्य पद्धतीवर ताण करण्यासारखा होऊन, त्यांच्याशीं टक्कर देणें परराष्ट्रीयांस देखील अशक्य झालें होतें. मग एतद्देशीय प्रतिपक्षी संस्थानिकांस त्यांच्यावर नक्ष करणें दुष्कर व्हावें ह्यांत नवल नाहीं. त्यांनीं लढवय्ये रजपूत पादाक्रांत केले; प्रमत्त रोहिले नेस्तनाबूत केले; दिल्लीचा शाहआलम बादशाह आपल्या मुठींत ठेविला; हैदर व टिपू ह्यांच्यावर पगडा बसविला; इंग्रजांस आपली कर्तबगारी दाखविली; व अखेर सर्वांवर छाप बसवून, दिल्लीच्या सार्वभौम बादशाहापासून आपल्या धन्याकरितां वकिल-मुतालकीचीं[1] बहुमानाचीं वस्त्रें पटकावून

१ महादजी शिंदे ह्यांनीं दिल्लीच्या बादशाहाकडून वकिलमुतालकीचीं वस्त्रें पुण्यास आणलीं. त्या वेळीं जो समारंभ झाला त्याचें वर्णन आणि त्या संबंधानें तत्कालीन मुत्सद्यांचे अभिनंदनपर उद्गार वाचण्यासारखे आहेत. ते एकत्र नमूद असलेलें परशरामभाऊ पटवर्धन ह्यांचें एक पत्र उपलब्ध झालें आहे, तेंच येथें सादर करितों. हें पत्र इतिहासदृष्ट्या मनोरंजक व वाचनीय असून, ह्यावरून पाटीलबावाविषयींचें समकालीन मुत्सद्यांचें मतही व्यक्त होण्यासारखें आहे.

"राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री नाना स्वामींचे सेवेसी:–

पो परशराम रामचंद्र कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति उपरी येथील कुशल ताा छ जिल्काद जाणोन स्वकीय कुशल लिहीत असलें पाहिजे विशेष. आपण पत्र पाठविलें तें पावलें. राजश्री महादजी शिंदे पाटीलबावा यांच्या भेटी जाहल्या. नंतर दुसरे दिवशीं सरकार वाड्यांत येऊन त्यांणीं, पादशाहाकडून वकिलमुतलक व अमीरल-उमराव व बक्षीगिरीचा बहुमान घेऊन आलों आहें; श्रीमंतांनीं घ्यावा; याप्रमाणें विनंति केली. त्याजवरून सातारियास महाराजांस विनंति लेहून, तेथील आज्ञापत्र आणवून, सदर्हू बहुमान घ्यावयाचा निश्चय करून आषाढ शुद्ध त्रितीयेस फर्मान बाडी केली. श्रीमंतांनीं वकिलमुतलक व अमीरल-उमरावची खिलत च्यारकुबचा व जिगा व सरपेंच व परीदा कलगीमय लटक, व माळा मरवारी व कलमदान व ढालतरवार व मोरचेल

व नालकी व झालदार पालखी व शिक्केकटार व माहीमरातीब व तमनतोग हत्ती व घोडा आदिकरून पादशाहाकडून आलें होतें, तें बहुत आदरेंकरून घेतलें. श्रीमंतांनीं नजर एकशेंएक मोहरा पादशाहास ठेविली. पाटीलबावांनीं एकावन्न मोहरा डेऱ्यांतच श्रीमंतांस नजर करून आदब बजाविली. तेथें तोफा वगैरेंच्या सलाम्या होऊन, श्रीमंत वाड्यांत आल्यावर सर्वत्रांनीं नजरा करून आदब बजाविली. समारंभ चांगला जाहला. ह्मणोन विस्तारें लिहिलें. ह्याजवरून बहुत संतोष जाहला. श्रीमंतांचा प्रताप थोर. तालें शिकंदर. पाटीलबावा यांणीं गुलामकादर याचें पारिपत्य करून पादशाहाची मर्जी खुश केली. त्यांणीं श्रीमंतास बहुमान पाठविला. समारंभ बहुत चांगला जाहला. ह्या मोठ्याच गोष्टी आहेत. मुख्य गोष्ट श्रीमंतांचा प्रभाव. त्या योगेंकरून पाटीलबावांनीं त्या प्रांतीं नक्ष केला. त्याप्रमाणेंच हुजूरही पादशाहाची मर्यादा रक्षून बहुमान घेतले. त्याचप्रमाणें समारंभ जाले. व श्रीमंत वाडियांत आल्यावर दोहों पदांचीं पादशाहाकडील मुतालकीचीं वस्त्रें श्रीमंतांनीं पाटीलबावांस खासगीचा पोशाख व जेगा, सरपेच कंठी व ढालतरवार, व नालकी व हत्ती घोडा याप्रमाणें दिल्हें. त्याची नजर पाटीलबावांनीं श्रीमंतांस पन्नास मोहरा करून आदब बजाविली. हे पाटीलबावांची सरफराजी चांगली जाहली. उत्तम आहे. हीं पदें भलत्यास प्राप्त व्हावयाचीं नाहींत. रा० पाटीलबावा यांणीं त्या देशांत बहुत कष्ट मेहेनत करून शत्रू पादाक्रांत केले. पादशाहीचा बंदोबस्त करून पादशाहांस बहुत खुश केलें. त्याचे येथें कोणी सरदार राहिला नाहीं. बाहेरील सरदार येऊन बंदोबस्त केला. तेव्हां सहजच देणें प्राप्त जाहलें. आपण दुरंदेशी चित्तांत आणून, महाराजांची आज्ञा आणवून, बहुत (बहुमान?) घेतले ही मोठी थोर गोष्ट केली. आजपावेतों कोठेंही व्यंग पडलें नाहीं. पुढें दिवसेंदिवस श्रीमंतही थोर जाहले; आणि आपली निष्ठा श्रीमंतांचे ठायीं. तेथें विस्तार काय ल्याहावा? तसेंच पाटीलबावांनीं तिकडे मेहेनत करून पदें वगैरे मिळविलीं, तीं सर्व एकनिष्ठपणें श्रीमंतांस प्रविष्ट केली; हें त्यांचे निष्ठेस योग्य. दुसऱ्याकडून व्हावयाचें नाहीं. पाटिलांप्रमाणें निष्ठा कोणाचीही पाहिली नाहीं. कोठवर वर्णना ल्याहावी? श्रीमंतांचा प्रताप थोर. मोठीं कामें सहजांत घडतात. बहुत काय लिहिणें, कृपा करावी हे विनंति."

आपला शौर्यवैभवाचा कळस करून सोडला. थोरले माधवराव पेशवे ह्यांनीं, जयाप्पाचे पुत्र जनकोजी शिंदे ह्यांजकडे जी सरदारी व जो सरंजाम होता, तो त्यांच्या पश्चात् पाटीलबावांस छ० २९ जमादिलावल सुहुर सन आर्बा सितैन[1] ह्या सालीं दिला. त्या दिवसापासून छ० ३० रजब आर्बा तिसैन[2] पर्यंत, महादजी शिंदे ह्यांनीं शुक्लेंदूप्रमाणें आपल्या भाग्यचंद्राची वृद्धि केली[3]; व त्याच्या प्रकाशानें मराठ्यांचा शौर्यमहिमा

---

१ ता० ५ दिसेंबर इ. स. १७६३ रोज सोमवार.

२ ता० ३ मार्च इ. स. १७९४ रोज सोमवार.

३ महादजी शिंदे ह्यांनीं उत्तर हिंदुस्थानांतल्या स्वाऱ्यांमध्यें क्रोडो रुपयांचा प्रांत जिंकून घेतला; त्याचप्रमाणें संपत्तिहि पुष्कळ मिळविली. ह्या संपत्तीची एक यादी पुढें लिहिल्याप्रमाणें आहे. ती पाहिली असतां शिंद्यांचें वैभव केवळ पराक्रमाच्या जोरावर कसें वाढलें ह्याची कल्पना करितां येईल:—

याद पाटील यांणीं हिंदुस्थानांतून घेतले वितपशील:—

| | नगदजिन्नस व जवाहीर वगैरे. | तोफा. |
|---|---|---|
| राणा गोहदकर याची जप्ती | ३२००००० | ० |
| मामलत मिर्जा शफीखां | ३३००००० | ० |
| जप्ती अफरासियावखां | ४०००००० | ५७० |
| शुजाऊतदीलखां व वजीर अफरासियाव खानाचे सासरे व जहांगीरखां त्याचा भाऊ | ४००००० | ० |
| राजे नारायणदास अफरासियाव खानाचा दिवान | ३००००० | ० |
| महमदबेगखां हमदानी याची जप्ती | ६००००० | ८० |
| रणजीतसिंग जाट याची मामलत | १२००००० | ५ |
| मामलत राजे जयनगरकर दोन वेळ | ८५००००० | ० |
| मामलत पिटाला ( पतियाला ) | ६००००० | ० |

अखंड प्रज्वलित केला. ह्यांच्या कारकीर्दीचा वृत्तांत हा स्वतंत्र इतिहासाचा भाग असल्यामुळें तो येथें दाखल करणें अप्रासंगिक आहे. तथापि, एवढें सांगणें जरूर आहे कीं, सांप्रत पाटीलबावांच्या चरित्राची जी माहिती उपलब्ध झाली आहे, त्यापेक्षांही अधिक कागदपत्र जेव्हां प्रसिद्ध होतील, तेव्हां ह्या थोर पुरुषाचें चरित्र फारच विचारार्ह व गंभीर आहे असें दृष्टीस पडेल. "नाना व महादजी" ह्या उभय मुत्सद्यांच्या गुणावगुणांचें सामान्य परीक्षण होऊन महादजीविषयीं जो लोकग्रह बनला आहे, तो बराच एकतर्फी व असत्य आहे, असेंही मानण्याचा

---

| | नगदजिन्नस व जवाहीर वगैरे. | तोफा. |
|---|---|---|
| मामलत दतिया व बधावर वगैरे | ८००००० | ० |
| मामलत रामरतन मोदी पादशाही व लालजीमल | ३००००० | ० |
| मामलत रावराजे प्रतापसिंग माचाडीवाले | ४००००० | ० |
| गुलाम कादरखां याची जप्ती | ६०००००० | ८० |
| दरोबस्त पातशाही वस्तभाव माल नगद व जिन्नस व जवाहीर वगैरे नेलें तें पाटीलबावाकडे आलें. | | |
| पाटणच्या लढाईंत इस्माईलबेगखां व राठोर यांणीं शिकस्त खाली. | ० | ८० |
| | २९६००००० | ८१५ |

पातशाह व नजफखां व गोहदवाले वगैरे यांचा मुलूक तसरुफांत आहे:—

| | |
|---|---|
| मुलूक पातशाही व नजफखां व गुलाम कादर वगैरे | २२५००००० |
| गोहदकर राणा याचा मुलूक | ४२००००० |
| मुलूक बधावर व कछवा व भांडेर वगैरे | १८००००० |
| | २८५००००० |

दोन करोड पंच्याऐशी लक्ष रुपये साल तमाम. यांत कमज्यादा तहकिकातीच्या अन्वयें शिबंदी खर्च वगैरे.

over - Fine patriotism of the author!!!!



प्रसंग येईल. मराठी राज्य रक्षण करण्याचें काम नानांनीं केलें; परंतु महादजी शिंद्यांच्या स्वार्थपरायणतेनें व महत्त्वाकांक्षेनें तें सिद्धीस गेलें नाहीं; असा जो सर्व साधारण आक्षेप आहे, तो पुष्कळ चुकीचा आहे, असें अस्सल कागदपत्र सिद्ध करतील असें अनुमान आहे. खरोखर, महादजी शिंद्यांच्या अकालिक मृत्यूनें मराठी साम्राज्याचा मोठाच घात झाला, व परकीय सत्तेस प्रवेश करण्यास अनायासें संधि मिळाली ह्यांत शंका नाहीं. पाटीलबावा आणखी कांहीं दिवस जगले असते व पुणेंदरबारांतील मत्सर थोडासा नाहींसा झाला असता, तर सर्व हिंदुस्थान संयुक्त होऊन मराठ्यांचें अबाढ्य व अजिंक्य साम्राज्य पुष्कळ काल टिकलें असतें ह्यांत संशय नाहीं. परंतु ईश्वरी इच्छा निराळीच असल्यामुळें पाटीलबावांच्या मृत्यूनें मराठी राज्याचा नाश लवकर घडवून आणिला, असेंच ह्मटलें पाहिजे. + not

१ कर्नल म्यालेसन ह्यांनीं महादजी शिंदे ह्यांच्या मृत्यूबद्दल लिहितांना जे उद्गार काढिले आहेत, ते वाचण्यासारखे आहेत. ते लिहितात:—

"By the death of Madhaji Sindhia the Mahrattas lost their ablest warrior and their most farseeing statesman. In his life he had had two main objects : the one to found a kingdom, the other to prepare for the contest for empire with the English. In both, it may be said, he succeeded. The kingdom he founded still lives, and if the army which he formed on the European model was annihilated eight years after his demise by Lake and Wellesley, it had in the interval felt the loss of his guiding hand, as on the field it missed his inspiring presence. Had he lived, Sindhia would not have had to meet Lake and Wellesley alone; Madhaji would have brought under one standard—though in different parts of India–the horsemen and French contingent of Tippu, the powerful artillery of the Nizam, the whole force of the Rajputs, and every

महादजी शिंदे ह्यांस औरस पुत्र एकही नसून एक बाळाबाई नामक कन्या होती. त्यांचा सख्खा भाऊ तुकोजी हा पानिपतचे लढाईंत मृत्यु पावला. त्याचे केदारजी, रवळोजी व आनंदराव असे तीन पुत्र होते. त्यांपैकीं आनंदरावावर पाटीलबावांची फार प्रीति होती. तेव्हां नाना फडनवीस व तुकोजी होळकर ह्यांनीं, पाटीलबावांच्या वडील बायकोच्या मांडीवर त्यास दत्तक दिलें; व त्याचें दौलतराव असें नामाभिधान ठेवून, त्यास पेशव्यांकडून सरदारीचीं वस्त्रें देवविलीं. त्यामुळें दौलतराव हे महादजी शिंद्यांच्या सर्व संपत्तीचे व जहागिरीचे अधिपति बनले. श्रीमंत सवाई माधवराव पेशव्यांनीं ह्यांस, छ० १० सव्वाल आर्बा तिसैन रोजीं, वकिलमुतालकीची व अमिरुल-उमराईची नायबगिरी सांगून नवीन शिक्के करून दिले. ह्यांच्या मराठी शिक्क्यामध्यें

"ज्योतिस्वरुप चरणीं तत्पर ।
महादजीसुत दौलतराव शिंदे निरंतर"॥

अशीं अक्षरें होतीं.

हेच महाराज दौलतराव शिंदे हे आमच्या चरित्रनायिका श्रीमती महाराणी बायजाबाईसाहेब ह्यांचे भ्रतार होत. ह्यांचें वय दत्तविधानसमयीं अवघें १४ वर्षांचें होतें. ह्यांची कारकीर्द व विवाहवृत्तांत निराळ्या भागांत सादर करणें अवश्य आहे.

---

spear which Mahratta influence could have collected from Poona, from Indur, from Baroda, and from Nagpur. The final result might not have been altered, but it would still have hung longer in the balance, and at least the great problem of a contest between an united India and the English would have been fairly fought out. As it was his death settled it. Thenceforth a sinister result became a question only of time."

—*The Native States of India* 145.

१ ता० १० मे इ. स. १७९४ रोज शनिवार.



# भाग २ रा.

## बायजाबाई शिंदे ह्यांचा कुलवृत्तांत.



बायजाबाई शिंदे ह्यांच्या वडिलांचें नांव सखारामराव घाटगे सर्जेराव हें होतें. महाराष्ट्राच्या इतिहासांत ह्या पुरुषाचें नांव फार प्रसिद्ध आहे. सखारामराव घाटगे हे कोल्हापूर प्रांतांतील कागल गांवचे देशमुख होत. कागलची देशमुखी फार जुनी असून, ती प्रथम, विजापुरचा पहिला बादशाह युसफ आदिलशाह ह्याचे कारकीर्दींत घाटग्यांच्या घराण्यास बक्षीस मिळाली; व औरंगजेब बादशाहानें विजापूर प्रांत काबीज केल्यानंतर, पुनः ती घाटग्यांस वंशपरंपरेनें इनाम करून दिली, अशी माहिती मिळते. घाटग्यांचें घराणें फार प्राचीन असून, त्यांचा मूळ पुरुष कामराज घाटगे हा ब्राह्मणी राज्यामध्यें उदय पावला. त्याच्या वंशजांची एक शाखा मलवडीस राहिली. ती 'झुंजारराव' घाटगे ह्या किताबानें प्रसिद्ध आहे. दुसरी कागल येथें राहिली. ती कागलकर 'सर्जेराव' घाटगे ह्या नांवानें प्रसिद्ध आहे. कागलकरांस 'सर्जेराव' हा किताब विजापुरच्या बादशाहाकडून मिळाला, अशी माहिती उपलब्ध आहे. मि० ग्राहाम ह्यांनीं, घाटग्यांचे मूळपुरुष व कागलचे

---

१ "Representative men of the Bombay Presidency" ह्या पुस्तकामध्यें कागलचे वरिष्ठ शाखेचे जहागीरदार श्रीमंत पिराजीराव बापूसाहेब ह्यांच्या घराण्याचा अल्पसा सचित्र वृत्तांत दिला आहे. त्यांत "सर्जेराव" हें पद विजापुरच्या बादशाहाकडून मिळालें असा स्पष्ट उल्लेख आहे:—

"The title of Sarjerao was conferred by an Emperor of Bija-

देशमुख भानजी घाटगे ह्यांस, शिवाजी महाराजांचे वडील शहाजीराजे भोंसले ह्यांनीं 'सर्जेराव' हा किताब दिला, असा उल्लेख केला आहे. भानजी घाटगे हे फार पराक्रमी व रणशूर पुरुष होते. ह्यांनीं, शहाजीराजे भोंसले ह्यांच्या नौकरींत असतांना, निजामशाही सरदार दुधा सर्जेराव रजपूत ह्याच्या सैन्याशीं मोठ्या मर्दुमकीनें युद्ध करून, त्याचा पराभव केला; व त्याचा खासा घोडा व सर्जा पाडाव करून आणिला. त्यावरून शहाजीराजे ह्यांनीं सुप्रसन्न होऊन त्यांस 'सर्जेराव' असें बहुमानाचें पद अर्पण केलें. ही माहिती जरी ग्राह्य मानिली, तरी शहाजीराजे ज्या अर्थीं विजापुरच्या बादशाहाच्या पदरीं नौकरीस होते, त्या अर्थीं विजापुरच्या बादशाहाकडूनच हें पद प्राप्त झालें असावें असें मानणें अधिक सयुक्तिक दिसतें. असो.

---

pur on one of the chief's ancestors who in fair fight defeated and slew Dudha Sarjérao, a Rajput leader sent by Aurangzib to over-throw the Bijapur dynasty. Bhanji, the Chief of Kagal's ancester as before stated, slew this adversary and wrested the Sarja, head-ornament or crest, from his turban and carried it to the King, who was so pleased with the exploit that he presented the crest to Bhanji, and gave him the title of Sarjerao."—Page 52.

१ मेजर ग्राहाम ह्यांच्या "Statistical Report on the Principality of Kolhapur" नामक उत्कृष्ट माहितीनें भरलेल्या ग्रंथामध्यें जो उल्लेख आहे, तो येणेंप्रमाणें:—

"Bhanjee Ghatgay, Deshmuk of Kagal, who was in the service of Shahajee, the father of Shivajee, the founder of the Maratha empire, having encountered the forces of the Nizam Shahee Government, defeated Doodha Surjérao Rajput, and seized his horse and Surja ( the crest of the horse ), Shahajee accordingly conferred on him the title of Surjérao."—Page 302.

भानजी घाटगे ह्यांचे संबंधाची विश्वसनीय माहिती उपलब्ध नाहीं. भानजीचे वंशज पिराजीराव घाटगे ह्यांच्यापासून ह्या घराण्याची संगतवार वंशावळी मिळते. पिराजीराव ह्यांस विजापुरचा बादशाह दुसरा इब्राहिम आदिलशाह (इ० स० १५८०–१६२६) ह्याच्या सुलतान महमद नामक वजिराकडून कागल परगणा व त्यांतील ६७॥ गांव इनाम मिळाल्याचा उल्लेख सांपडतो. त्यावरून पिराजीराव हे विजापुरच्या बादशाहीमध्यें प्रख्यात पुरुष होते असें मानण्यास हरकत नाहीं. त्यांच्या पश्चात् आबाजीराव, विठोजीराव, महादाजीराव, विठोजीराव आणि दुसरे पिराजीराव ह्या पुरुषांनीं कागल जहागिरीचा उपभोग घेतला. दुसरे पिराजीराव ह्यांस राणोजीराव, विठोजीराव, आबाजीराव, तुळजाजीराव व यशवंतराव असे पांच पुत्र होते. त्यांपैकीं तुळजाजीराव ह्यांस जयसिंगराव व रामचंद्रराव असे दोन मुलगे होते. त्यांपैकीं जयसिंगराव ह्यांचे पुत्र सखारामराव हे पेशवाईच्या अखेरीस उदयास आले. मराठी राज्यामध्यें कागलकर घाटग्यांनीं काय काय पराक्रम गाजविले, ह्याबद्दलची माहिती अद्यापि उपलब्ध झाली नाहीं. तथापि हें जुनें व थोर घराणें कोल्हापूर प्रांतीं बरेंच प्रसिद्ध असावें असें दिसतें. इ. स. १७९२ सालीं ह्या घराण्यांतील यशवंतराव नामक एका पुरुषास कोल्हापुरचे छत्रपति शिवाजी महाराज ह्यांची कन्या आऊबाईसाहेब ही दिली होती. त्या वेळीं ह्या घराण्याकडे कागलची जहागीर चालत नसून, ती कोल्हापुरच्या छत्रपतींच्या ताब्यांत होती; व त्यांनीं फक्त सहा गांव यशवंतराव ह्यांस लग्नाप्रीत्यर्थ इनाम दिले होते. तथापि तेवढ्या उत्पन्नावर घाटग्यांच्या घराण्याचा चांगला परामर्ष होईनासा झाला. त्यामुळें यशवंतराव व त्यांचे चुलत बंधु सखारामराव ह्यांच्यामध्यें तंटा उत्पन्न झाला. त्या वेळीं सखारामराव हे ईर्षेस पेटून, कागलाहून निघून परशुरामभाऊ पटवर्धन ह्यांचे पदरीं नौकरीस जाऊन राहिले.

परशुरामभाऊ पटवर्धन हे त्या वेळीं दक्षिण महाराष्ट्रामध्यें पेशव्यांचे बलाढ्य सरदार ह्मणून प्रसिद्ध होते; व त्यांच्या पदरीं सैन्याचा जमावही पोक्त होता. त्यामुळें सखारामराव घाटग्यासारख्या मर्द शिपायास त्यांच्या पथकामध्यें शिलेदारीचें काम स्वीकारून आपली कर्तृत्वशक्ति दाखविण्यास चांगली संधि मिळाली. परशुरामभाऊ पटवर्धन हे स्वतः युद्धकलानिपुण व पराक्रमपटु असल्यामुळें 'गुणी गुणं वेत्ति' ह्या न्यायानें सखारामराव घाटगे ह्यांच्या शिपाईगिरीची त्यांनीं तेव्हांच परीक्षा पाहिली; व त्यांच्या अंगीं हिंमत, धाडस, शौर्य इत्यादि वीरपुरुषाचे गुण चांगले वसत आहेत, असें त्यांच्या लक्ष्यांत आलें. तेव्हांपासून त्यांची सखारामरावावर हळू हळू मेहेरबानी जडत चालली. परशुरामभाऊंसारख्या प्रबल व वजनदार सरदाराचा चांगला आश्रय मिळाल्यामुळें सखारामराव घाटगे ह्यांस आपला भाग्योदय करून घेण्याचा अनायासें योग प्राप्त झाला.

सखारामराव ह्यांचें परशुरामभाऊ पटवर्धनांबरोबर पुण्यास वारंवार जाणें येणें होऊं लागलें. त्या योगानें पुणें दरबारचे प्रख्यात मुत्सद्दी नाना फडनवीस ह्यांचा व त्यांचा चांगला परिचय झाला. सखारामराव घाटगे हे हुशार, धीट व कारस्थानी गृहस्थ असल्यामुळें नाना फडनविसांची त्यांच्यावर मर्जी बसली; व त्यांनीं परशुरामभाऊंकडून त्यांना मागून घेऊन, खुद्द पेशव्यांचे लष्करांत त्यांस खास पथकाची शिलेदारी दिली. अशा रीतीनें सखारामराव ह्यांचा पुणें दरबारांत प्रवेश झाला.

सखारामराव घाटगे पुण्यास आल्यानंतर लवकरच सवाई माधवराव पेशवे हे मृत्यु पावले; व पुणें दरबारांत गोंधळ होऊन, पेशवाईच्या गादीविषयीं तंटेबखेडे सुरू झाले. त्या प्रसंगीं महादजी शिंदे ह्यांचे दत्तक पुत्र दौलतराव शिंदे, नाना फडनवीस आणि परशुरामभाऊ पटवर्धन ह्यांचीं अनेक कारस्थानें होऊन, अखेर बाजीराव पेशवे ह्यांस पेशवाईची गादी मिळाली. ह्या सर्व राजकारणांत सखारामराव घाटगे हे अंशतः सूत्रचालक होते, असें ह्मणण्यास हरकत नाहीं.

सवाई माधवराव ह्यांच्या मृत्यूनंतर, पेशव्यांच्या गादीवर कोणास बसवावें ह्याबद्दल वादविवाद चालू असतां, दौलतराव शिंदे ह्यांचे दिवाण बाळोबातात्या व परशुराम भाऊ पटवर्धन ह्या दोघांचें व नाना फडनविसांचें वैमनस्य येऊन, नानांस पुण्यांतून पळून जाण्याचा प्रसंग आला. त्या वेळीं सखारामराव घाटगे हे आपल्या पथकानिशीं दौलतराव शिंदे ह्यांच्या नौकरीस जाऊन राहिले. तेथें रायाजी पाटलांचा व त्यांचा चांगला स्नेहसंबंध जडल्यामुळें त्यांची दौलतराव शिंदे ह्यांच्या दरबारांत चांगली चाहा झाली. अशा रीतीनें शिंद्यांच्या दरबारांत प्रवेश होतांच, सखारामराव ह्यांनीं, आपल्या गोड व मोहक वाणीनें, आपल्या उत्सवप्रिय व तरुण यजमानांचें मन तेव्हांच वेधून टाकिलें. अर्थात्, दौलतराव शिंदे ह्यांची सखारामराव घाटग्यांवर पूर्ण मेहेरबानी जडल्यामुळें, त्यांस पुणेंदरबारांत आपलें वर्चस्व स्थापन करण्यास विलंब लागला नाहीं. सखारामराव हे इतिहासांत ‘सर्जेराव घाटगे’ ह्या नांवानें प्रसिद्ध आहेत. हे सर्जेराव घाटगे आमच्या चरित्रनायिका बायजाबाई ह्यांचे जनक होत.

बायजाबाईंच्या मातुल घराण्याची थोडीशी हकीकत येथें सादर केली पाहिजे. बायजाबाईंचे वडील ज्याप्रमाणें पुरातन, घरंदाज, पराक्रमी व अस्सल मराठे घराण्यांतील होते; त्याप्रमाणें त्यांच्या मातुश्री ह्याही जुन्या व इतिहासप्रसिद्ध घराण्यांतील होत्या. हें घराणें अस्सल मराठ्यांपैकीं असून, ह्यांतील पुरुषांनीं महाराष्ट्राज्यरक्षणाचे कामीं पराकाष्ठेचें साहाय्य करून, आपली स्वामिनिष्ठा व स्वदेशभक्ति व्यक्त केली आहे. औरंगजेब बादशाहानें दक्षिणेंत येऊन सर्व महाराष्ट्रप्रांत काबीज केला; व छत्रपति शिवाजी महाराजांनीं संस्थापित केलेलें मराठी राज्य व महाराष्ट्रधर्म ह्यांचा समूळ विध्वंस होण्याचा बिकट प्रसंग प्राप्त झाला; त्या वेळीं, कर्नाटकप्रांतीं, राजाराम महाराजांस अप्रतिम साहाय्य

करून, ज्यांनीं आपल्या अलौकिक शौर्याची, अचाट साहसाची, अतर्क्य देशभक्तीची, आणि अपूर्व स्वार्थत्यागाची सीमा करून दाखविली; आणि यवनांचा पराभव करून महाराष्ट्रराज्य व महाराष्ट्रधर्म ह्यांचें रक्षण केलें; त्या वंदनीय वीरश्रेष्ठांपैकीं ह्या घराण्यांतील मूळ पुरुष एक होत एवढें सांगितलें, ह्मणजे ह्या घराण्याच्या थोरपणाबद्दल किंवा कुलीनतेबद्दल अधिक प्रशंसा करण्याचें प्रयोजन नाहीं. हणमंतराव पाटणकर हें नांव महाराष्ट्राच्या इतिहासांत प्रसिद्ध आहे. ह्यांनीं राजाराम महाराजांच्या चंदीच्या राजकारणांत उत्कृष्ट स्वामिसेवा केल्यामुळें त्यांस 'समशेरबहादुर' हा किताब व पाटणखोऱ्यांतील ४० गांवांची पाटण कसब्यासुद्धां जहागीर इनाम मिळाली होती. त्यांच्या पूर्वजांचें पूर्वींचें उपनांव साळुंखे हें असून, हे पूर्वापार पाटणचे देशमुख होते. पुढें हे पाटणास राहूं लागल्यापासून ह्यांस पाटणकर हें नांव प्राप्त झालें. ह्यांचें राहण्याचें ठिकाण पाटण हें असून, तें साताऱ्याचे नैर्ऋत्येस १५ कोसांवर कोयना नदीचे कांठीं आहे. येथें त्यांचा पूर्वींचा जुना वाडा वगैरे असून तेथील इनामदार ह्या नात्यानें त्यांच्या वंशजांची योग्यता अद्यापि फार आहे; व दक्षिणेंतील सरदारांच्या पटामध्यें ते उच्च प्रतीचे सरदार आहेत.

हणमंतराव पाटणकर ह्यांस दारकोजीराव, हिरोजीराव, आणि धारराव असे तीन पुत्र होते. ते आपल्या वडिलांप्रमाणेंच कर्तृत्ववान् व पराक्रमशाली होते. ह्यांपैकीं पहिले दारकोजीराव ह्यांस सात पुत्र होते. त्यांपैकीं रामराव व लक्ष्मणराव ह्यांचा वंश नष्ट झाला; व बाकीचे आपापल्या योग्यतेप्रमाणें नांवारूपास आले. ह्या पांच जणांचीं नांवें येणें-प्रमाणें:—बाबूराव, बाळोजीराव, राघोजीराव, बाजीराव व जयरामराव. ह्यांपैकीं चौथे—बाजीराव हे बायजाबाई साहेबांचे मातामह होत. हे मोठे रणशूर पुरुष होते. पेशव्यांनीं अखेरच्या अमदानींत जुन्या मराठे घराण्यांतील शूर पुरुषांचा परामर्ष न घेतल्यामुळें अनेक तेजस्वी व बाणेदार

How softly passed over! ✓ "rather"

पुरुष निराश झाले, व जिकडे अवकाश मिळेल तिकडे आपली शिपाई-गिरी दाखविण्याकरितां निघून गेले. त्यामुळें मराठ्यांचें ऐक्य व तेजस्विता लोपली जाऊन महाराष्ट्रमंडळाचा नाश झाला. अशा पुरुषांपैकीं बाजीराव पाटणकर हे एक होत. पुणेंदरबारांत ह्यांच्या शौर्यगुणांचें योग्य अभिनंदन व चीज न झाल्यामुळें हे मुधोजी भोंसले नागपूरकर ह्यांच्याकडे गेले. तेथें त्यांनीं अनेक पराक्रमाचीं कृत्यें केलीं, व भोसल्यांच्या दरबारांत फार लौकिक मिळविला. पुढें बाजीराव पेशवे ह्यांनीं त्यांस पाचारण करून पुण्यास आणविलें; आणि त्यांस आपल्या दरबारांत ठेवून घेतलें. बाजीरावसाहेबांनीं त्यांचें शौर्य पाहून त्यांस मौजे तांबवें हा गांव इनाम दिला. तो त्यांजकडे व त्यांचे बंधु जयरामराव ह्यांजकडे इ. स. १८१८ पर्यंत चालत होता. पुढें इ. स. १८१८ सालीं महाराष्ट्रामध्यें राज्यक्रांति घडून आली; व पेशव्यांची सत्ता नष्ट होऊन, इंग्रजसरकार महाराष्ट्राचे सार्वभौमप्रभु बनलें. त्या वेळीं मि० एल्फिस्टन ह्यांनीं, बाजीराव पाटणकर ह्यांची योग्यता व खानदान हीं लक्ष्यांत घेऊन, त्यांस तीन हजार रुपये सालीना पेनशन करून दिलें. परंतु बाजीराव पाटणकर लवकरच मृत्यु पावले. नंतर त्यांच्या स्त्रीस १२०० रुपये तैनात झाली. ती सातारचे छत्रपति प्रतापसिंह ऊर्फ थोरले महाराज ह्यांच्या कारकीर्दीपर्यंत चालत होती.

बाजीराव पाटणकर ह्यांस सुंदराबाई ऊर्फ नानीसाहेब नामक एक कन्या होती. ती कागलचे जहागीरदार सखारामराव घाटगे सर्जेराव ह्यांस दिली होती. ही बाई फार साध्वी व सुशील असे. हिच्या पोटीं सर्जेराव ह्यांस जयसिंगराव व बायजाबाई अशीं दोन अपत्यें झालीं. जयसिंगराव ह्यांचा जन्म इ. स. १७७९ ह्या सालीं झाला; व बायजा-

---

१. मेजर जी. मालकम कोल्हापुरचे अक्टिंग पोलिटिकल सुपरिंटेंडंट ह्यांनीं ता० ३ जुलै इ. स. १८५४ सालीं सरकारास कोल्हापूर प्रांतांतील जहागिरीबद्दल जो रिपोर्ट केला आहे, त्यांत जयसिंगराव बाबासाहेब ह्यांचें वय ७५ वर्षांचे दिलें आहे. त्यावरून हा सन सिद्ध होतो.

बाई ह्यांचा जन्म इ. स. १७८४ सालीं झाला. बायजाबाईच्या बाळपणाची माहिती उपलब्ध नसल्यामुळें ती देतां येत नाहीं. तथापि ती लहानपणीं फार बाळसेदार व देखणी असून, तिजवर सुंदराबाईचें फार प्रेम होतें, एवढें सांगण्यास हरकत नाहीं. सखारामराव घाटगे ह्यांच्या स्थित्यंतराचें व त्या वेळच्या देशस्थितीचें चित्र लक्ष्यांत घेतलें, तर बायजाबाईचें बाळपण राजवाड्यांतील राजलक्ष्मीचे बहुविध विलास उपभोगण्यांत गेलें असावें, असें मानितां येत नाहीं. अनेक वेळां प्राप्त झालेलीं राजकीय संकटें, सदासर्वदां अनुभवलेले घोड्यावरील प्रवासाचे कष्ट, आणि प्रसंगविशेषीं प्राप्त होणारें शिलेदारी पेशाचें सुखपर्यवसायी दुःख, अशा प्रकारच्या परिस्थितीमुळें मराठे सरदारांच्या मुलांवर जे संस्कार होणें साहजिक आहेत, ते बायजाबाई व त्यांचे बंधु ह्यांच्यावर झाले होते, असें ह्मणण्यास कोणताच प्रत्यवाय नाहीं. हीं मुलें अशा प्रकारच्या परिस्थितींत वाढल्यामुळें सुदृढ, सशक्त, धाडशी, व घोड्यावर बसण्यांत पटाईत अशीं निपजलीं होतीं. बायजाबाई ही अगोदरच रूपसंपन्न असून, तिच्यामध्यें हे वरील गुण वास करीत असल्यामुळें तिची कीर्ति महाराष्ट्रांतील थोर थोर सरदारांमध्यें पसरली; व दौलतराव शिंद्यांसारखे तरुण व रंगेल सरदार तिच्या सौंदर्यावर लोलुप होऊन तिला वरण्यास उत्सुक झाले. बायजाबाई शिंदे ह्यांस कित्येक इतिहासकारांनीं 'दक्षिणची सौंदर्यलतिका' (Beauty of the Deccan) अशी संज्ञा दिली आहे. ती अगदीं यथार्थ आहे. राजस्थानांतील कृष्णाकुमारी इत्यादि लोकप्रसिद्ध लावण्यवतींच्या लग्नाचे प्रसंग ज्याप्रमाणें मोठमोठीं राजकारस्थानें घडविण्यास कारणीभूत झाले, त्याप्रमाणें बायजाबाई ह्यांचें लग्न हें देखील महाराष्ट्रांतील एक राजकारस्थान घडवून आणण्यास कारणीभूत झालें.

---

All this is foreign to avowed object of the author



# भाग ३ रा.

## दौलतराव शिंदे ह्यांची कारकीर्द.

सवाई माधवराव पेशवे हे इ. स. १७९५ सालीं मृत्यु पावल्यानंतर पुणें येथील पेशव्यांच्या गादीविषयीं तंटा उत्पन्न झाला. नाना फडनवीस, तुकोजी होळकर, बाळोबा तात्या, परशुराम भाऊ पटवर्धन वगैरे मंडळीनें राघोबादादांचे पुत्र बाजीराव ह्यांस गादी मिळूं न देण्याचा निश्चय करून, सातारच्या छत्रपतीकडून असें आज्ञापत्र[१]

१ हें अस्सल आज्ञापत्र येणेंप्रमाणें आहे:–"स्वस्तिश्री राज्याभिषेक शके १२१ राक्षसनाम संवत्सरे क्षत्रियकुलावतंस श्री राजा शाहू छत्रपति स्वामी यांणीं राजमान्य राजश्री बाळाजी जनार्दन यांस आज्ञा केली ऐसीजे:— माधवराव पंडित प्रधान यांस अकालीं कैलासवास प्राप्त झाला; पोटीं पुत्र नाहीं; पेशवाईचे पदाचा कारभार चालोन बंदोबस्त जाहला पाहिजे. त्यास त्यांचे वंशांतील रघुनाथ बाजीराव यांचे पुत्र आहेत, त्यांतील पंतप्रधान यांची स्त्री यशोदाबाई यांस पुत्र देऊन पदाधिकारी करावें; तर पेशजी रघुनाथराव यांजपासोन अनन्वित गोष्ट घडली. त्या वेळचे मुत्सद्दी व सरदार यांचा पूर्ण द्वेष स्मरोन राज्यांत बखेडा पडेल व शास्त्रविरुध पडतें. व पेशजी कै० बाळाजी बाजीराव यांणीं स्वामिसेवा एकनिष्ठपणें केली. एतदर्थीं त्यांचे वंशाचें नांव पुढें चालावें याकरितां पंतप्रधान यांचे स्त्रीस दत्त पुत्र देऊन, पदास अधिकारी करून, कारभाराचा बंदोबस्त जाहला पाहिजे. हें जाणून हें आज्ञापत्र तुह्मांस सादर केलें असे. तरी त्यांचे गोत्रजांतील दत्तपुत्र यशोदाबाई यांस देऊन, कारभारचा बंदोबस्त तुह्मीं करून, हुजूर विनंति करणें. जाणिजे. छ. २९. जमादिलावल सु॥ तिसैन मया व आलफ " ( मोर्तब ).

आणविलें कीं, कै० सवाई माधवराव ह्यांच्या पत्नी यशोदाबाई ह्यांचे मांडीवर दत्तक पुत्र देऊन त्यास पेशवाईचा अधिकार द्यावा. त्याप्रमाणें त्यांनीं चिमाजीआप्पास यशोदाबाईंचे मांडीवर दत्तक देऊन त्यास गादीवर बसविलें. इकडे बाजीराव ह्यांनीं, दौलतराव शिंदे हे सामर्थ्यवान् व प्रबल असल्यामुळें, त्यांस चार लक्ष रुपयांचा प्रांत व सैन्याचा खर्च देण्याचें मान्य करून, त्यांचे मार्फत स्वतःस गादी मिळविण्याचा प्रयत्न चालविला. ही बातमी नाना फडनविसांस समजतांच, त्यांनीं, शिंद्यांच्या लष्करी सामर्थ्यामुळें बाजीरावांस गादी मिळेल व आपलें वर्चस्व कमी होईल, अशी भीति बाळगून, बाजीरावाकडे सूत्र लाविलें; व आपण होऊन त्यास प्रतिबंधांतून मुक्त करून गादीवर बसविण्याचा निश्चय केला. इकडे शिंद्यांचे दिवाण बाळोबा तात्या ह्यांस हा नानांचा आपमतलबाचा विचार न आवडून त्यांनीं त्यांचा निषेध केला; व तो सिद्धीस जाऊं न देण्याचा प्रयत्न चालविला. बाजीराव ह्यांचा स्वभाव निश्चल व एकमार्गी नसल्यामुळें त्यांनीं, ज्यांच्या हातून आपलें कार्य सिद्धीस जाईल असें वाटे, त्यांचें आर्जव करण्याचा व त्यांस अनुकूल करून घेण्याचा क्रम आरंभिला. नाना फडनविसांनीं आपली सरशी ज्या बाजूनें होईल तो मार्ग स्वीकारिला. त्यामुळें उभयतांस स्वतःच्या कार्यसिद्धीकरितां दौलतराव शिंद्यांच्या मदतीची अपेक्षा करणें भाग पडलें. त्याप्रमाणें उभयतांनीं दौलतराव शिंद्यांस अनुकूल करून घेण्याचा प्रयत्न सुरू केला. ह्या कामीं त्यांस साहाय्य कारण्यास जी व्यक्ति पुढें आली, ती सर्जेराव घाटगे ही होय. नाना व बाजीराव ह्यांनीं सर्जेरावाचा उपयोग करून आपलें इष्ट कार्य तडीस नेलें.

नाना फडनविसांनीं सर्जेराव घाटगे ह्यांचे मार्फत दौलतराव शिंदे ह्यांचे प्रियकर मुत्सद्दी रायाजी पाटील ह्यांजकडे गुप्तरीतीनें अशी रदबदली

चालविली होती कीं, बाळोबा तात्यांस कैद करून बाजीरावांस पेशवाईची गादी द्यावी; ह्मणजे बाजीरावांकडून तुह्मांस अहमदनगरचा किल्ला व परशुरामभाऊ पटवर्धनांची जहागीर मिळून १० लक्षांचा प्रांत बक्षीस मिळेल. परंतु ह्यांत त्यांस यश आलें नाहीं. बाजीराव व नाना ह्यांच्या गुप्त मसलती बाळोबा तात्यांस समजून, त्यांनीं बाजीरावांस कैद करून हिंदुस्थानांत पाठविण्याची तजवीज केली; व तें काम सर्जेराव घाटगे ह्यांस सांगितलें. त्याप्रमाणें त्यांनीं बाजीरावांस कैद करून उत्तर हिंदुस्थानांत स्वसैन्यानिशीं कूच केलें. ह्या प्रवासामध्यें बाजीरावांस एक युक्ति सुचली; व अखेर तीच त्यांस फलदायक झाली.

बाजीराव ह्यांस सर्जेराव घाटगे ह्यांच्या सुस्वरूप कन्येची माहिती असून, तिजवर दौलतराव शिंदे ह्यांचें मन आसक्त झालें आहे ही गोष्ट ठाऊक होती. तेव्हां दौलतराव शिंदे ह्यांस अनुकूल करून घेण्यास, हें आमिष उत्तम आहे असें मनांत आणून, त्यांनीं सर्जेराव घाटगे ह्यांजपाशीं संधान लाविलें. बाजीराव बोलण्यांत फार चतुर व गोड असल्यामुळें त्यांनीं सर्जेराव घाटगे ह्यांजवर आपली छाप बसवून त्यांना अनुकूल करून घेतलें. सर्जेराव ह्यांस, आपली घाटग्यांच्या उच्च कुलांतील मुलगी कण्हेरखेडच्या पाटलाचे वंशांत द्यावी, हें प्रथम बरें न वाटून, त्यांनीं पुष्कळ आढेवेढे घेतले. परंतु बाजीराव हे महाराष्ट्रप्रभु झाल्यानंतर आपले अनेक मनोरथ व महत्त्वाकांक्षा सिद्धीस जातील असें वाटून, पुढें सर्जेराव घाटगे हे ह्या गोष्टीस राजी झाले; व त्यांनीं बाजीरावांकडून तीन अटी लिहून घेतल्या. त्या येणेंप्रमाणें:—(१) बाजीरावांस पेशवाईचा अधिकार मिळाल्यानंतर त्यांनीं दोन कोट रुपये दौलतरावांस द्यावे; (२) घाटग्यांची कागल येथील पुरातन जहागीर सर्जेरावांस द्यावी; आणि (३) आपण राज्यारूढ झाल्यानंतर दौलतराव शिंदे ह्यांची दिवाणगिरी सर्जेरावांस देववावी.

बाजीराव गरजू असल्यामुळें त्यांनीं ह्या सर्व अटी मान्य केल्या. नंतर सर्जेराव घाटगे ह्यांनीं बाजीरावांची प्रकृति नादुरस्त असल्याचें ढोंग करून, हिंदुस्थानांत जाण्याचा बेत रहित केला; व प्रवरा नदीचे कांठीं, केशव गोविंदाचे पिंपळगांवीं, मुक्काम केला. नंतर सर्जेराव घाटगे ह्यांनीं दौलतराव शिंदे ह्यांस सर्व गोष्टी कळवून, त्यांस सर्वस्वीं अनुकूल करून घेतलें. दौलतराव शिंदे ह्यांस हें सौंदर्यरत्न प्राप्त होण्याचा सुयोग आला हें पाहून परमानंद झाला; व त्यांनीं सर्जेरावाचें ह्मणणें अक्षरशः मान्य करून, बाजीरावांस गादीवर बसविण्याचें अभिवचन दिलें. ह्याप्रमाणें शेवटीं बाजीरावांस पेशवाईचें पद प्राप्त करून घेण्यास सर्जेराव घाटगे ह्यांच्या लावण्यवती कन्येचा उपयोग करणें भाग पडलें. स्त्रीसौंदर्यानें राजलक्ष्मीवर आपला पगडा बसविल्याचीं उदाहरणें इतिहासांत विपुल आहेत; तेव्हां ह्याबद्दल विशेष आश्चर्य मानण्याचें प्रयोजन नाहीं.

दौलतराव शिंदे बाजीरावांस अनुकूल झाल्यानंतर त्यांनीं बाळोबा तात्यांस कैद केलें; व बाजीरावांस परत बोलाविलें. नाना फडनवीस ह्यांची मसलत ह्या राजकारणांत होतीच. त्यामुळें त्यांनीं बाजीरावांस गादीवर बसविण्याची संधि साधून, त्यांच्याकडून दिवाणगिरीचीं वस्त्रें मिळविण्याचा यत्न चालविला होता. त्याप्रमाणें त्यांनीं बाजीरावाशीं करार मदार करून, त्यांस सातारचे छत्रपतींकडून पेशवाईचीं वस्त्रें ता० ४ दिसेंबर इ. स. १७९६ रोजीं आणून दिलीं. ह्याप्रमाणें पेशव्यांच्या गादीवर बाजीरावांची संस्थापना झाली.

बाजीरावांस गादी मिळाल्यानंतर ते नाना फडनवीस व दौलतराव शिंदे ह्यांच्या ओंजळीनें पाणी पिऊं लागले. परंतु ते चंचलवृत्ति व कपटबुद्धि असल्यामुळें त्यांचें व नानांचें लवकरच वांकडें आलें, व त्यांनीं नाना व दौलतराव ह्यांच्या त्रासांतून मुक्त होण्याचा प्रयत्न चालविला.

बाजीराव ह्यांस आपले मनोरथ सिद्धीस नेण्यास सर्जेराव घाटगे हें उत्तम साधन मिळालें होतें. त्यांचा त्यांनीं बहुमान करून व त्यांस नानाप्रकारच्या लालुची दाखवून, त्यांस पूर्णपणें अंकित केलें होतें. त्यामुळें ते त्यांच्या अनुषंगातें वागून त्यांची मनीषा तृप्त करण्यास तत्पर झाले होते. अनावर स्वार्थेच्छा व प्रबल महत्त्वाकांक्षा तृप्त करण्यास, सहज संधि प्राप्त झाल्यावर, तिचा फायदा सर्जेराव घाटग्यांसारख्या पुरुषानें घेतल्यास त्यांत आश्चर्य तें काय? बाजीरावांनीं सर्जेरावास अशी मसलत दिली कीं, नानांस कैद केलें असतां तुह्मांस दौलतरावाची दिवाणगिरी मिळण्यास उशीर लागणार नाहीं. त्याप्रमाणें सर्जेराव घाटगे ह्यांनीं ता० ३१ दिसेंबर १७९७ रोजीं नानांस कैद केलें. अर्थात् नाना कैदेंत गेल्यावर पेशव्यांच्या राज्याची सर्व कैद विसकटली जाऊन "बळी तो कान पिळी" असा प्रकार झाला. सर्जेराव घाटगे ह्यांनीं द्रव्यलोभानें नानांच्या आप्त व इष्ट मंडळींचा छल केला; व बहुत अनन्वित कृत्यें केलीं. त्या सर्वांचें वर्णन करण्याचें हें स्थल नाहीं. !!!

Why here the above detail given, [illegible] the few facts have been briefly stated !!!

नाना प्रधानगिरीवरून दूर झाल्यानंतर बाजीराव पेशवे ह्यांनीं अमृतरावास आपले दिवाण नेमिलें, व दौलतराव शिंदे ह्यांच्याजवळ सर्जेराव ह्यांस आपला दिवाण नेमण्याबद्दल शिफारस केली. त्याप्रमाणें शिंदे ह्यांच्या दिवाणगिरीवर ह्या कारस्थानी गृहस्थाची योजना झाली. ह्या समयास दौलतराव ह्यांच्या इच्छेप्रमाणें बायजाबाईचा व त्यांचा विवाहसमारंभ घडून आला. हें लग्न पुणें मुक्कामीं इ. स. १७९८ चे मार्च महिन्यांत मोठ्या थाटानें झालें. ह्या वेळीं उत्सवप्रिय व तरुण शिंद्यांनीं जो समारंभ केला, तो फार हौसेचा व डौलाचा होता. त्यांनीं ब्राह्मणभोजनें, नाचरंग, आतषबाजी वगैरेमध्यें अतिशय द्रव्य खर्च केलें. येणेंप्रमाणें 'दक्षिणची सौंदर्यलतिका' दौलतरावांस

प्राप्त होऊन जिकडे तिकडे आनंदीआनंद झाला. ह्याप्रमाणें बायजाबाईसाहेब ह्या घाटग्यांच्या कुलांतून शिंद्यांच्या कुलांत गेल्या; व इतिहासांत 'बायजाबाईसाहेब शिंदे' ह्या नांवानें प्रसिद्ध झाल्या.

बायजाबाईसाहेबांचें लग्न झाल्यानंतर पुण्याच्या दरबारांत जीं राजकारणें व जे घोंटाळे झाले, त्यांचा संबंध ह्या चरित्राशीं नसल्यामुळें त्यांचें विवरण येथें करितां येत नाहीं. तथापि, ह्या लग्नामुळें दौलतराव शिंद्यांस मनस्वी कर्ज होऊन, त्यांना पुढें, बाजीरावांनीं देऊं केलेलें दोन कोटी रुपये मागावे लागले; व ते वसूल करण्याकरितां सर्जेराव घाटग्यांस पुण्याची लूट करावी लागली. त्या लुटीमध्यें लोकांचा फार भयंकर रीतीनें छल झाला, हें येथें नमूद करणें अवश्य आहे. ह्या छलानें त्रस्त होऊन, अमृतराव पेशवे ह्यांनीं दौलतराव शिंदे ह्यांस कैद करण्याचा यत्न चालविला. बाजीराव पेशवे ह्यांनीं एका भेटीमध्यें दौलतरावांस असें विचारिलें कीं, "तुह्मी माझे धनी आहांत कां नौकर आहांत ? माझी प्रतिष्ठा ठेवायाची असेल, तर तुह्मीं हिंदुस्थानांत निघून जावें. सर्जेरावाचा छल आतां माझ्यानें पाहवत नाहीं !"

पुण्यास बेबंदशाही झाल्यामुळें दौलतरावांचें तेथें वजन पडेनासें झालें. ह्याच सुमारास महादजी शिंद्यांच्या बायका दौलतरावांच्या विरुद्ध होऊन, त्यांनीं शिंद्यांच्या प्रांतांत दंगा चालविला; व तिकडे उत्तर हिंदुस्थानांतही बरीच गडबड उडाली. तेव्हां दौलतराव ह्यांस आपल्या प्रांताचा बंदोबस्त करण्याकरितां तिकडे जाणें भाग पडलें.

दौलतराव शिंदे उत्तर हिंदुस्थानांत गेले, त्या वेळीं त्यांच्या सैन्याची पूर्वींची शिस्त सर्व बिघडली होती; व सर्व लष्करी सरदारांमध्यें परस्परांचा मत्सर व द्वेष हे दुष्ट ग्रह उत्पन्न झाले होते. ज्या वेळीं डी बॉयन ह्या फ्रेंच सरदारानें शिंद्यांच्या नौकरीचा राजीनामा दिला, त्या वेळीं फक्त त्याच्या एकट्याच्या हाताखालीं २४००० पायदळ, ३०००

घोडेस्वार व १२० तोफा इतकें जय्यद सैन्य होतें. डी बॉयन ह्याच्या मागून पेरन हा त्या सैन्याचा अधिपति झाला. त्याच्या ताब्यांत चंबळा नदीपासून पतियाळापर्यंत सर्व शिंद्यांचा प्रांत होता. परंतु त्याचें व लखबादादाचें वैर उत्पन्न होऊन शिंद्यांच्या सैन्यामध्यें फूट झाली. व हीच फूट शेवटीं शिंद्यांची उत्तर हिंदुस्थानांतील सत्ता व स्वातंत्र्य हीं संपुष्टांत आणायास कारणीभूत झाली.

दौलतराव शिंदे ह्यांस बालपणापासून लष्करी शिक्षण नसल्यामुळें व त्यांनीं स्वतः कधीं सेनापतीचें काम केलें नसल्यामुळें, त्यांना सैन्याची व्यवस्था कशी करावी ह्याचें विशेष ज्ञान नव्हतें. त्यामुळें त्यांना निरनिराळ्या अधिकाऱ्यांवर अवलंबून राहून, त्यांच्या तंत्रानें चालण्यावांचून गत्यंतर नव्हतें. परंतु त्यांस तारुण्याची उमेद व अभिमान विशेष असल्यामुळें, जुन्या लोकांचे अनुभवही केव्हां केव्हां त्यांना अप्रिय वाटत असत. त्यांची विशेष प्रवृत्ति डामडौल व बाह्य देखावा ह्यांकडे फार असे. हीच प्रवृत्ति त्यांच्या नाशास कारण झाली. ह्या संबंधानें अशी एक गोष्ट प्रसिद्ध आहे कीं, दौलतराव शिंदे ह्यांनीं उत्तर हिंदुस्थानांत जातांच, प्रथम उज्जनी एथें आपली टोलेजंग छावणी बांधण्याचा निश्चय केला. त्या वेळीं गोपाळरावभाऊ नामक एका जुन्या सरदारानें भर दरबारामध्यें त्यांची कानउघाडणी केली. त्यांनीं सांगितलें कीं, "ज्या आमच्या वाडवडिलांनीं मराठी राज्य स्थापन केलें, त्यांनीं घोड्याच्या पाठीवर आपलीं घरें केलीं होतीं. ह्मणजे ते रात्रंदिवस घोड्यावर स्वार होऊन कालक्रमणा करीत असत. परंतु हळहळ पुढें घोड्याच्या पाठीवरील घरें जाऊन, त्याऐवजीं कापडाचीं घरें ह्मणजे तंबू डेरे वगैरे अस्तित्वांत आलीं; आणि आतां तुह्मी मातीचीं घरें बांधून लष्कराची छावणी उभारीत आहां. परंतु हें लक्ष्यांत ठेवा कीं, ही छावणी अल्पकाळांत मातीमोल किंमतीची होईल." दौलतराव शिंदे ह्यांनीं हें भाषण

ऐकून किंचित् स्मित केलें, व त्यांस उत्तर केलें कीं, "माझ्याजवळ एवढी प्रचंड पायदळ फौज व भरभक्कम तोफखाना असतांना, माझ्याशीं कोण टक्कर देणार आहे?" त्या वेळीं ह्या वयोवृद्ध सरदारानें उत्तर दिलें कीं, "हीच पायदळ फौज व ह्याच तोफा तुमच्या नाशास कारण होतील!" तीच गोष्ट पुढें अक्षरशः अनुभवास आली. असो.

दौलतराव शिंदे ह्यांनीं माळव्यांत गेल्यानंतर उज्जनी वगैरे प्रांत होळकराच्या ताब्यांतून परत घेऊन, उज्जनी येथें आपली राजधानी केली. उज्जनी येथें यशवंतराव होळकरांनीं लूटमार करून शिंद्यांच्या प्रजेस फार त्रास दिला होता. त्याबद्दल त्यांचा सूड घेण्याकरितां दौलतराव शिंदे ह्यांचे कारभारी सर्जेराव घाटगे ह्यांनीं इंदुरावर चाल केली; व इंदूर गांव लुटून उध्वस्त केला. अशा रीतीनें आपसाआपसामध्यें कलह चालले. इकडे पुणें दरबारची स्थिति अत्यंत शोचनीय होत चालली. बाजीराव पेशवे ह्यांनीं यशवंतराव होळकरांचा बंधु विठोजी ह्यास हत्तीच्या पायीं देऊन ठार मारल्यामुळें ते संतप्त होऊन पुण्यावर

---

१ मराठ्यांनीं आपली पूर्वींची युद्धपद्धति सोडून पाश्चिमात्य पद्धति स्वीकारली ह्मणूनच त्यांचा नाश झाला, असे उद्गार मोठमोठ्या युरोपियन मुत्सद्यांनींही काढिले आहेत. सर फिलिफ फ्रान्सिस ह्यांनीं पार्लमेंटमध्यें बोलतांना एकदा असे उद्गार काढिले कीं:–

"Sir, the danger you allude to, in the progress the Marathas are making in the art of casting cannon, in the use and practice of artillery, and in the discipline of their armies is imaginary. The Marathas can never be formidable to us in the field on the principles of an European army. They are pursuing a scheme in which they can never succeed, and by doing so they detach themselves from their own plan of warfare, on which alone, if they acted wisely, they would place dependence."

प्रसिद्ध सेनानी ड्यूक ऑफ वेलिंग्टन ह्यांचेंही असेंच मत होतें.

चालून गेले. त्यामुळें बाजीराव पेशवे हे भयभीत होऊन इंग्रजांकडे पळून गेले, व त्यांनीं वसई मुक्कामीं ता. ३१ दिसेंबर इ. स. १८०२ रोजीं इंग्रजांशीं तह करून त्यांचें सख्य संपादन केलें. वसईचा तह हा इतिहासांत प्रसिद्ध आहे. हाच तह परकीय सत्तेचा मराठ्यांच्या दरबारांत पूर्ण प्रवेश होण्यास कारण झाला.

वसईचा तह हा मराठ्यांचें स्वातंत्र्य नष्ट करणारा असल्यामुळें तो दौलतराव शिंदे, रघुजी भोंसले व यशवंतराव होळकर ह्यांस रुचला नाहीं. त्यामुळें ते त्या तहाप्रमाणें बाजीरावांस सामील होऊन इंग्रजांशीं सख्य करण्यास मान्य होईनात. तेव्हां त्यांची सत्ता कमी करावी ह्या उद्देशानें त्यांचें व इंग्रजांचें युद्ध सुरू झालें. ह्या युद्धामध्यें मराठ्यांचें सैन्य ५०००० घोडेस्वार व ३०००० पायदळ व गोलंदाज मिळून एकंदर एक लक्ष होतें. इंग्रजांचें सैन्य एकंदर ५०००० असून त्यावर त्यांचे प्रसिद्ध सेनापति जनरल वेलस्ली व लॉर्ड लेक हे होते. त्यांच्या व मराठ्यांच्या चकमकी सुरू झाल्या. त्यांत लासवारी, दिल्ली, आसई, अल्लीगड, वगैरे ठिकाणीं फार तुमुल युद्धें झालीं; व उभयपक्षांचें अद्वितीय शौर्य व्यक्त झालें. ता० २ दिसेंबर इ. स. १८०३ रोजीं, लासवारी येथील लढाईचा वृत्तांत लिहितांना, लॉर्ड लेक ह्यांनीं शिंद्यांच्या पक्षाकडील सैन्याची व तोफखान्याची फार फार प्रशंसा केली आहे. त्यांत त्यांनीं शेवटीं असेंही ह्मटलें आहे कीं, "प्रतिपक्षाचे सैनिक लोक केवळ राक्षसाप्रमाणें ह्मणा, किंवा योद्ध्याप्रमाणें ह्मणा, पण फार निकरानें लढले; व त्यांच्याशीं आह्मीं अतिशय प्रबल व अजिंक्य शत्रू समजून लढाई केली; ह्मणूनच आह्मांस यश आलें. तशा रीतीनें आह्मी लढलों नसतों, तर खचित आमचा पराजय झाला असता !" ह्याप्रमाणें मराठी सैन्यानें आपलें शौर्य गाजविलें. परंतु प्रतिपक्षाच्या गनिमी काव्यानें त्यांस यश येऊं दिलें नाहीं. जनरल वेलस्ली ह्यांच्या आसई येथील

युद्धामध्यें देखील मराठ्यांनीं आपला असाच पराक्रम दाखविला. परंतु त्याचा उपयोग झाला नाहीं. तेव्हां अखेर, ता० ३० दिसेंबर इ. स. १८०३ रोजीं, सुर्जीअंजनगांव येथें, दौलतराव शिंदे ह्यांचे वकील विठ्ठल महादेव, मुनशी कवलनयन, यशवंतराव घोरपडे आणि नारो हरी ह्यांनीं जनरल आर्थर वेलस्ली ह्यांच्याशीं तह ठरविला. ह्या तहानें शिंद्यांच्या ताब्यांतील बराच प्रांत इंग्रजांकडे गेला; व त्यांचें पुष्कळ स्वातंत्र्य नष्ट झालें. इंग्रजांचा रेसिडंट शिंद्यांच्या दरबारीं प्रविष्ट झाला; व इंग्रजांची कांहीं फौज शिंद्यांच्या मदतीकरितां त्यांच्या सरहद्दीवर येऊन दाखल झाली.

सुर्जीअंजनगांवचा तह झाल्यानंतर पुनः इंग्रजांचा व शिंद्यांचा कांहीं दिवस बिघाड झाला. दौलतरावांनीं यशवंतराव होळकर व रघुजी भोंसले ह्यांस सामील होऊन पुनः इंग्रजांविरुद्ध लढण्याचा प्रयत्न केला. परंतु तो निष्फल होऊन अखेर त्यांस मेजर मालकम ह्यांच्या बरोबर ता. २२ नोव्हेंबर इ. स. १८०५ रोजीं तह करणें प्राप्त झालें. ह्या तहामध्यें विशेषेंकरून पूर्वींच्या तहांतील अटी मान्य करून क्वचित् फेरफार केले होते. पूर्वींच्या तहांत ग्वाल्हेर व गोहद प्रांत दौलतराव शिंद्यांस न देतां, त्याबद्दल १५ लक्ष रुपयांची नेमणूक देण्याचा ठराव होता; परंतु ह्या तहनाम्यानें ते प्रांत शिंद्यांच्या आग्रहा-स्तव त्यांस परत दिले. ह्या प्रांताबद्दल इंग्रज मुत्सद्द्यांचा पुष्कळ वाद-विवाद होऊन, अखेर इंग्रजांचा नांवलौकिक रक्षण करण्याकरितां ते त्यांस परत द्यावे असें ठरलें.

---

१ ह्या वेळचे सर जॉन मालकम, जनरल वेलस्ली वगैरे मुत्सद्दी इंग्रजांच्या नांवाबद्दल कशी काळजी बाळगीत असत, हें ह्यावरून शिकण्यासारखें आहे. ग्वाल्हेर व गोहद प्रांत शिंद्यांस देण्याबद्दल ज्या वेळीं भवति न भवति झाली,

ह्या तहामध्यें मालकम साहेबांनीं आणखी एक महत्त्वाचें कलम घातलें होतें. तें बायजाबाई संबंधाचें होय. बायजाबाई ह्यांचें दौलतराव शिंद्यांशीं लग्न झाल्यानंतर, त्या नेहमीं त्यांच्या लष्करावरोबर त्यांचे सन्निध असत; व त्यांच्या सर्व राजकारणामध्यें त्यांचा प्रवेश असे. त्या त्यांच्या स्वारीशिकारीबरोबर स्वतः जात असत. घोड्यावर बसणें, बंदूक मारणें, भाला फेंकणे वगैरे शिपाईगिरीच्या गोष्टींमध्यें त्या तरबेज असत. त्यामुळें त्यांचें नांव इंग्रज सेनापति जनरल वेलस्ली व मेजर मालकम ह्यांस पूर्ण माहित झालें होतें. दौलतराव शिंदे ह्यांचा व इंग्रजांचा जो रण-संग्राम झाला; त्यामध्यें बायजाबाई साहेबांनीं प्रत्यक्ष रणभूमीवर किती कामगिरी बजाविली, हें समजण्यास मार्ग नाहीं. तथापि वेलस्ली साहे-बांच्या सैन्याबरोबर टक्कर देऊन, त्यांनीं आपलें शौर्य व्यक्त केलें असावें असें मानण्यास जागा आहे. ह्या त्यांच्या तेजस्वितेचा परिणाम ह्मणून ह्मणा, किंवा दौलतराव शिंद्यांच्या प्रिय पत्नी ह्मणून ह्मणा, इंग्रज मुत्स-द्यांनीं वर निर्दिष्ट केलेल्या तहामध्यें पुढील कलम दाखल केलें होतें:—

"कलम ९:—उभयतां सरकारांनीं चंबल नदीची हद्द ठरविली; तेणें-करून कंपनी सरकारास फायदा झाला; व महाराज अलिज्याबहादर

---

त्या वेळीं जनरल वेलस्ली ह्यांनीं पुढीलप्रमाणें आपलें मत मेजर मालकम ह्यांस कळविलें होतें:—

"I would sacrifice Gwalior or every frontier of India ten times over, in order to preserve our credit for scrupulous good faith, and the advantages and honour we gained by the late war and the peace; and we must not fritter them away in arguments drawn from overstrained principles of the laws of nations, which are not understood in this country. What brought me through many difficulties in the war, and the negotiations of peace? The British good faith, and nothing else."

*Malcolm's life by Kaye Vol. I Page 269.*

दौलतराव यांची कंपनी सरकाराशीं दोस्ती झाली. हे सर्व प्रकार मनांत आणून, कंपनीसरकार सालीना च्यार लक्ष रुपये खुद्द अलिज्याबहादर दौलतराव ह्यांस पेनशन देण्याचें कबूल करीत आहेत. ही रक्कम रेसिडेंट मार्फत तिमाही हप्तेबंदीनें महाराज अलिज्याबहादरांस आदा होत जाईल. ह्याशिवाय, महाराज अलिज्याबहादर दौलतराव ह्यांच्या राणी बायजाबाईसाहेब ह्यांस, बाळाबाईप्रमाणें कंपनीसरकार आपले हिंदुस्थानांतील राज्यांत दोन लक्ष रुपयांची जहागीर व महाराजांची कन्या चिमणाबाई हिजला एक लक्षाची जहागीर एकूण तीन लक्षांची जहागीर देण्याचें कबूल करीत आहेत."

ह्या कलमाप्रमाणें बायजाबाईसाहेब व त्यांची कन्या चिमाबाईसाहेब ह्यांस कंपनीसरकारांतून स्वतंत्र जहागीर देण्यांत आली. त्यावरून बायजाबाईसाहेब ह्यांचें माहात्म्य इंग्रज मुत्सद्द्यांस पूर्ण विदित झालें असावें असें स्पष्ट दिसून येतें. हा तह झाल्यानंतर दौलतराव शिंदे ह्यांनीं उघडपणानें इंग्रजांच्या विरुद्ध कधींही शस्त्र उचललें नाहीं. त्यांनीं १८०५ नंतर उत्तर हिंदुस्थानांत ग्वाल्हेर येथें आपल्या सैन्याचा तळ दिला होता. तेथेंच इ. स. १८१० सालीं "लष्कर" हें गांव वसलें. हीच पुढें शिंद्यांची राजधानी झाली. दौलतराव शिंदे ह्यांचे पदरीं सैन्य पुष्कळ असून जानबत्तीस, सवाई शिकंदर, पेरन वगैरे फ्रेंच सेनापति होते. त्याचप्रमाणें बापू शिंदे, देवबा काळे, जगु बापू, अंबाजी इंगळे वगैरे नामांकित मराठे सरदार होते. सर्जेराव घाटगे हे इंग्रजांच्या विरुद्ध असल्यामुळें १८०५ सालच्या तहाप्रमाणें त्यांस दरबारांतील मंत्रिमंडळांतून कमी केलें होतें. परंतु पुनः त्यांनीं दौलतरावांची मर्जी संपादन करून शिंद्यांच्या दरबारांत वर्चस्व प्राप्त करून घेतलें होतें. त्यांच्या अंगीं धारिष्ट व शिपाईगिरी हे दोन चांगले गुण होते. परंतु त्यांच्या इतर दुर्गुणांमुळें ते सर्वांस अप्रिय झाले होते. त्यांनीं दौलतरावांच्या दरबारांत अरेरावी-

पणाचें वर्तन केल्यामुळें त्यांचा आनंदराव नामक सरदारानें व मानाजी फाकडे ह्यांच्या मुलानें ता. २७ जुलै इ. स. १८०९ सालीं वध केला.

शिंद्यांचें सैन्य अतिशय असून प्रांताचें उत्पन्न व्यवस्थित रीतीनें येत नसल्यामुळें त्याचा खर्च निभेनासा झाला. त्यामुळें दौलतरावांस आपला पुष्कळ प्रांत सैन्याच्या खर्चाकरितां कर्जदारांकडे गहाण ठेवावा लागला. एवढेंच नव्हे, तर इंग्रजसरकाराकडून मिळणारें पेनशन व जहागिरीचें उत्पन्न सावकारांस लावून द्यावें लागलें. त्यामुळें लष्करी अंमलदार शिरजोर झाले, व त्यांनीं मन मानेल त्याप्रमाणें मनस्वी वर्तणूक केली. त्यामुळें राज्यांतील शिस्त व बंदोबस्त कमी झाला. पुढें इ. स. १८१७ सालीं पेंढारी लोकांची व इंग्रजांची लढाई झाली. त्या वेळीं मेजर मालकम ह्यांनीं, पुनः दौलतरावांबरोबर ता. ५ नोवेंबर १८१७ रोजीं नवा तह करून, शिंद्यांचें सैन्य इंग्रज अधिकाऱ्यांच्या देखरेखीखालीं ठेविलें; व रजपूत संस्थानिकांवरचें शिंद्यांचें स्वामित्व काढून घेतलें. हा तह झाल्यानंतर होळकरांचा दंगा व बाजीराव पेशव्यांची धामधूम झाली. त्या प्रसंगीं शिंद्यांच्या दरबारांतल्या कांहीं लोकांनीं थोडी गडबड केली; परंतु खुद्द दौलतराव ह्यांनीं इंग्रजसरकाराशीं बिघाड केला नाहीं. त्यामुळें बाजीराव पेशवे ह्यांचा त्यांजवर रोष झाला, व त्यांनीं त्यांस रागानें असें पत्र पाठविलें, कीं, "तुमचे तीर्थरूपांनीं स्वामिसेवा एकनिष्ठपणें करून, दिल्लीची वजिरी संपादन केली व ते जगविख्यात होऊन गेले. त्यांचे चिरंजीव तुह्मी असून, कंपनीसरकाराशीं स्नेह करून, आह्मांशीं कृतघ्न झालां. हें करणें तुह्मांस उचित नाहीं. ह्यापेक्षां तुह्मीं बांगड्या भरल्या असत्या, तर बरें झालें असतें. आह्मांवर तूर्त प्रसंग गुदरला आहेच. आतां तुमचें ऐश्वर्य कायम राहणें कठीण दिसतें!" बाजीरावांचें हें पत्र वाचून दौलतराव शिंदे ह्यांनीं विस्मय प्रदर्शित केला. परंतु त्यांनीं त्या पत्रानें प्रोत्साहित

होऊन इंग्रजांविरुद्ध शस्त्र उचललें नाहीं. एकंदरींत त्यांनीं ह्या वेळीं जें वर्तन केलें, तेंच त्यांचें राज्य सुरक्षित राहण्यास कारण झालें. पेंढारी लोकांचें बंड मोडल्यापासून मध्य हिंदुस्थानांत बरीच शांतता झाली. तेणेंकरून शिंद्यांचें उत्पन्न २० लक्ष रुपये अधिक वाढलें व इतर रीतीनेंही पुष्कळ फायदे झाले. इ. स. १८१८ पासून दौलतराव शिंदे हे इंग्रजसरकाराशीं अत्यंत स्नेहभावानें वागून त्यांचे विश्वासू दोस्त बनले. त्यामुळें इंग्रजसरकारही त्यांचा उत्तम प्रकारचा मानमरातब ठेवीत असे. तात्पर्य, इ. स. १८१८ सालीं सर जॉन मालकम ह्यांनीं मध्यहिंदुस्थानामध्यें कंपनी सरकारची सार्वभौम सत्ता संस्थापित केल्यापासून इ. स. १८२७ सालापर्यंत, ह्मणजे दौलतराव शिंदे ह्यांच्या मृत्यूपर्यंत, ग्वाल्हेर दरबारामध्यें ह्मणण्यासारख्या विशेष गोष्टी किंवा राजकीय चळवळी कांहीं घडून आल्या नाहींत.





## भाग ४ था.

## दौलतराव शिंदे ह्यांचा मृत्यु.

महाराज दौलतराव शिंदे ह्यांची प्रकृति इ. स. १८२६ च्या आक्टोबर महिन्यापासून बिघडत चालली, व ग्वाल्हेरच्या उत्तम उत्तम राजवैद्यांचे औषधोपचार चालू झाले. महाराजांची प्रियपत्नी बायजाबाई ह्यांस महाराजांच्या प्रकृतीबद्दल फार काळजी उत्पन्न झाली. महाराजांविषयीं त्यांचा फार प्रेमभाव असल्यामुळें त्या महाराजांच्या शुश्रूषेंत अगदीं तत्पर असत. महाराज आजारी असल्याचें वर्तमान ग्वाल्हेरचे रेसिडेंट मेजर स्टुअर्ट ह्यांस व त्यांचे असिस्टंट क्याप्टन फ्लेमिंग ह्यांस कळल्यामुळें ते उभयतां महाराजांच्या समाचाराकरितां वारंवार राजवाड्यांत येत असत. महाराजांचा व मेजर स्टुअर्ट ह्यांचा चांगल्या प्रकारचा स्नेहसंबंध असून ते परस्परांशीं मोकळ्या मनानें वागत असत. त्यांनीं महाराज दौलतराव शिंदे आजारी असल्याचें वर्तमान रीतीप्रमाणें गव्हरनर जनरल साहेबांस कळविलें. महाराज दौलतराव हे हिंदुस्थानांतील एका स्वतंत्र व बलाढ्य संस्थानाचे अधिपति असून, ते ब्रिटिश सरकाराशीं फार दोस्तीनें वागत असल्यामुळें, त्यांच्याबद्दल हिंदुस्थान सरकारही फार मर्यादेनें व प्रेमभावानें वागत असे. महाराज आजारी असून त्यांची प्रकृति दिवसेंदिवस क्षीण होत चालली हें पाहून, मेजर स्टुअर्ट ह्यांनीं, महाराजांस दत्तक पुत्र घेऊन गादीच्या वारसाची योग्य व्यवस्था

करावी, अशी वारंवार विनंति केली. परंतु त्यांना दत्तक पुत्र घेण्याची गोष्ट पसंत पडेना. ते वारंवार ह्मणत कीं, "माझी पत्नी जर राज्यकारभार चालविण्यास समर्थ आहे, तर मला स्वतःस दत्तक घेण्याची काय अवश्यकता आहे?" अर्थात् महाराजांचें हें उत्तर ऐकलें ह्मणजे त्यांच्यापुढें एक अक्षरही काढण्याची कोणाची प्राज्ञा नसे.

दौलतराव शिंदे ह्यांस रखमाबाई व बायजाबाई ह्या दोन बायका होत्या. पैकीं वडील रखमाबाई ह्या फार साध्याभोळ्या व निरुपद्रवी अशा असून, राज्यशकट चालविण्याचें सामर्थ्य त्यांच्या अंगीं मुळींच नव्हतें. बायजाबाई ह्या शहाण्या, राजकारणी, धूर्त, प्रसंगावधानी, आणि दृढनिश्चयी अशा होत्या; व त्यांनीं आपल्या पतीस राज्यकारभार चालविण्याचे कामीं पुष्कळ वर्षें साहाय्य केलें होतें. त्यामुळें महाराजांस सर्व राज्यकारभार बायजाबाईंचे स्वाधीन करावा अशी इच्छा वाटणें साहजिक आहे. परंतु तसें केल्यानें, कदाचित् दरबारांतल्या कित्येक कारस्थानी व कुटिल लोकांस, हिंदुशास्त्राप्रमाणें रखमाबाईचा पक्ष घेऊन, तंटेबखेडे करण्यास संधि सांपडेल, व त्याचा परिणाम संस्थानास विनाकारण भोगावा लागेल, ह्मणून त्यांनीं ह्या प्रश्नाचा निकाल स्पष्ट रीतीनें कांहींच केला नाहीं. बायजाबाईवर त्यांची अत्यंत प्रीति होती; व राज्य चालविण्यास लागणारें सामर्थ्य व इतर गुण त्यांच्या अंगीं वसत होते; ह्याचा त्यांनीं अनुभवही घेतला होता. एवढेंच नव्हे, तर स्त्रिया ह्मणजे

१ मिल्ल साहेबांनीं आपल्या इतिहासांतही ह्याचा उल्लेख केला आहे:—

"The real cause of his reluctance, however, was his attachment to Baiza Bai, who had long exercised an imperious influence over his mind, and to whom he wished to bequeath the substantial authority of the state, although the opposition of the principal persons of his court, and probably some misgivings of the result, deterred him from declaring her his successor."—*Mill's History of India*, Vol. IX; Page 146.

राजकारणास अयोग्य, त्यांची योग्यता फक्त गोषांत बसण्यापुरती, असला अनुदार विचार बायजाबाईंच्या संगतीमुळें त्यांच्या अंतःकरणांतून पार नाहींसा झाला होता. डा० होप नामक शिंद्यांच्या दरबारांतल्या एका भिषग्वर्यांनीं असें लिहिलें आहे कीं, "दौलतराव शिंद्यांचा असा अभिमान होता कीं, आपण कोणतीही महत्त्वाची गोष्ट आपल्या पत्नीच्या संमतीवांचून केली नाहीं. आणि पूर्वेकडील देशांतील पुरुष आपल्या स्त्रियांस किती कमी दर्जानें वागवितात हें लक्ष्यांत घेतलें, ह्मणजे हा अभिमान फारच अलौकिक होता, असें ह्मटलें पाहिजे.[१]" अर्थात् डा० होपसारख्या परदेशीय गृहस्थांस दौलवराव शिंद्यांच्या ज्या अभिमानाचें फार आश्चर्य वाटलें, त्या अभिमानानें पुष्कळ संस्थानिकांच्या अंतःकरणांत प्रवेश केला असता, तर बायजाबाईसारख्या किती तरी राजकारणी व चतुर स्त्रिया हिंदुस्थानांत चमकूं लागल्या असत्या. जुना काळ व जुना इतिहास ज्या गोष्टी शिकवीत आहे, त्या गोष्टींची हिंदुस्थानच्या सुधारलेल्या वर्तमान स्थितींत उणीव असावी, ही मात्र खेदाची व आश्चर्याची गोष्ट होय. ह्यावरून, दौलतराव शिंद्यांच्या वेळचा धामधुमीचा काळ अधिक बरा असें ह्मणावें लागतें. असो.

दौलतराव शिंदे ह्यांच्या आजारीपणांत रेसिडेंट मेजर स्टुअर्ट ह्यांनीं संस्थानाच्या भावी व्यवस्थेबद्दल पुनः एकदा प्रश्न विचारला. त्या वेळीं महाराजांनीं असें उत्तर दिलें कीं, "जर राजाची बायको शहाणी व समजूतदार असेल, तर त्याच्या पश्चात् त्याचा कारभार करण्यास तीच पात्र होय." त्या वेळीं रेसिडेंट साहेबांनीं पुनः विचारलें कीं, "परंतु

---

१ "His boast was (and a most singular one it is, when we remember the low esteem in which women are held in all eastern countries), that he never undertook an affair of importance without consulting her."

आपणांस दोन बायका आहेत, त्याचा विचार काय ?” महाराजांनीं उत्तर दिलें “होय. शिरस्त्याप्रमाणें माझ्या वडील पत्नीनें माझ्या पश्चात् राज्याचा कारभार चालवावा हें खरें आहे. परंतु राज्यभार हातीं घेणाऱ्या बायकोच्या अंगीं शहाणपण, जगाचें ज्ञान, व्यवहारांतला अनुभव हे गुण असावे लागतात. ह्या सर्वांची तिच्या ठिकाणीं वानवा आहे. त्यामुळें ती राज्य करण्याचे कामीं अगदीं अपात्र आहे. तिनें फक्त राजवाड्यांत बसावें आणि दुवक्तां जेवावें. ह्यापेक्षां तिच्या अंगीं अधिक कांहीं नाहीं.” अशा प्रकारें दौलतराव शिंदे ह्यांनीं रेसिडेंट साहेबांशीं संभाषण करून आपल्या दोन्ही राण्यांविषयीं आपलें मत कळविलें. त्यावरून मेजर स्टुअर्ट ह्यांची बायजाबाईच्या योग्यतेबद्दल खात्री झाली; व आपल्या पश्चात् बायजाबाईनीं राज्यकारभार चालवावा अशी महाराजांची अंतःकरणपूर्वक इच्छा आहे, असें त्यांच्या निदर्शनास आलें. मे० स्टुअर्ट ह्यांनीं महाराजांजवळ आणखीही दोन चारवेळां ह्या प्रश्नाची वाटाघाट केली. परंतु ज्या ज्या वेळीं हा प्रश्न निघाला, त्या त्या वेळीं महाराजांनीं, बायजाबाई शहाण्या व चतुर आहेत असें दर्शवून, “ह्या प्रश्नाचा ब्रिटिशसरकारानें वाटेल तो निकाल करावा; त्यांच्यावर माझा पूर्ण विश्वास आहे.” असेंच सांगितलें.

दौलतराव शिंदे ह्यांची प्रकृति दिवसेंदिवस फार बिघडत चालली. पौष महिन्यांत महाराजांनीं मेजर स्टुअर्ट व आग्रा येथील आपले युरोपियन मित्र ह्यांस संक्रांतीचा शेवटचा तिळगूळ पाठविला. बायजाबाईनीं संक्रांतीप्रीत्यर्थ बहुत दानें व देकार केला. ता० १३ जानेवारी रोजीं त्यांनीं हिंदुरावांस सांगून, काशीचे गंगापुत्र व मथुरेचे चोबे मिळून दोन हजार लोक बोलाविले. व प्रत्येकास एक शेर मिठाई, एक रुपया दक्षणा व लोटाभर तांदूळ देऊन सर्वांस संतुष्ट केलें. त्याचप्रमाणें ब्राह्मणभोजनें वगैरे घालून हिंदुचालीप्रमाणें सर्व दानधर्म, प्रायश्चित्तें व

गोप्रदानें केलीं." ह्या दानधर्माची कीर्ति त्या प्रांतीं बहुत झाली. ह्याप्रमाणें बायजाबाईनीं व हिंदुरावांनीं महाराजांच्या जेवढ्या इच्छा होत्या तेवढ्या सर्व उत्तमप्रकारें सिद्धीस नेल्या. पुढें महाराज अधिक अधिक थकत चालले, व त्यांना उदराची व्यथा होऊन त्यांचे हातपाय सुजले. त्यामुळें त्यांचा अंतकाळ अगदीं समीप आला. बायजाबाई व त्यांचे बंधु महाराजांच्या बिछान्यासन्निध एकसारखे बसले होते. व राजवाड्यांतील सर्व सेवकजन महाराजांच्या प्रकृतीबद्दल चिंतातुर होऊन खिन्नवदन झाले होते. अखेर माघ वद्य ७ शके १७४८ रोजीं महाराजांच्या प्रकृतींत चलबिचल फार दिसूं लागली. त्या वेळीं महाराजांनीं मेजर स्टुअर्ट ह्यांस बोलावून आणण्याबद्दल हिंदुरावांस आज्ञा केली. त्याप्रमाणें हिंदुरावांनीं ताबडतोब घोडेस्वार पाठवून रेसिडेंट साहेबांस पाचारण केलें. रेसिडेंट साहेब आल्यानंतर, कांहीं वेळ त्यांची भेट व शेवटचें संभाषण झालें. नंतर रेसिडेंट साहेब कांहीं वेळ महाराजांस विश्रांति देण्याकरितां दुसरीकडे जाऊन बसले. महाराजांच्या प्रियपत्नी बायजाबाई लगेच महाराजांजवळ आल्या. तों महाराजांनीं त्यांच्याकडे करुणमुद्रेनें पाहून, त्यांचा व त्यांच्या बरोबर आपल्या अखिल प्रजाजनांचा शेवटला निरोप घेतला. महाराजांस देवाज्ञा होतांच राजवाड्यांत जो आकांत झाला, तो वर्णन करणें कठीण आहे. त्याचें

---

१ ह्या दानधर्माचा वृत्तांत 'शमसूल आखबार' ह्या पत्रांत प्रसिद्ध झाला होता. तो वाचून 'एशियाटिक जर्नल' मधल्या एका लेखकानें पुढें लिहिल्याप्रमाणें उद्गार काढिले आहेत:—

"Here is a Chief, once powerful enough to inspire the British Government with apprehension, risking his throne and his life, by wasting upon idle Brahmans money which is due to his dependents!"—Page 373.

ह्या लेखकास हिंदुचालीरीतीचें ज्ञान नसलें पाहिजे असेंच ह्मणावें लागतें!!

वर्णन मेजर स्टुअर्ट ह्यांनीं हिंदुस्थान सरकारास पाठविलेल्या आपल्या खलित्यांत सविस्तर रीतीनें केलें आहे. तें प्रत्यक्ष अनुभवानें लिहिलें असून करुणरसानें ओतप्रोत भरलें आहे. तेंच येथें सादर करितों:—

" काल सकाळीं ९ वाजण्याचे सुमारास, महाराजांच्या राजवाड्यांतून एक घोडेस्वार रसिडेन्सीमध्यें मोठ्या त्वरेनें भरधांव घोडा फेंकीत आला. त्यानें हिंदुरावांचा असा निरोप कळविला कीं, " महाराज साहेबांनीं आपणांस भेटण्याची उत्कट इच्छा व्यक्त केली आहे. ह्याकरितां, आपण एक क्षणाचाही विलंब न लावितां, ताबडतोब राजवाड्यांत यावें." हा निरोप ऐकतांच, महाराजांचा अंतकाल अगदीं समीप येऊन ठेपला असें वाटून, मी लगेच घोड्यावर बसलों; आणि क्याप्टन डाईक ह्यांस फक्त बरोबर घेऊन तत्काल राजवाड्यांत गेलों. राजवाड्यांत जातांच चिंताक्रांत झालेला हजारों लोकांचा समुदाय माझे दृष्टीस पडला. राजवाड्यांत प्रवेश करितांच निरनिराळ्या दालनांमध्यें सरदार, मानकरी व इतर सभ्यलोक जमा झालेले दृष्टीस पडले. हिंदुरावांची व माझी भेट होतांच, महाराजसाहेबांची प्रकृति कशी काय आहे असा मीं प्रश्न केला. हिंदुरावांनीं " महाराज फार अत्यावस्थ आहेत; आपण लवकर भेटावें. " असें उत्तर दिलें. माझें व हिंदुरावांचें हें भाषण होत आहे, तोंच महाराजांच्या अंतःपुरांत, मी आल्याची वर्दी पोहोंचून, महाराजांनीं मला आंत येण्याबद्दल पाचारण केलें. तेव्हां मी लगेंच महाराज ज्या खोलीमध्यें होते तेथें गेलों. मजबरोबर हिंदुराव, रावजी खाजगीवाले, आत्माराम पंडित व आणखी एक दोन गृहस्थ होते. क्याप्टन डाईक हेही मजबरोबर आंत आले. महाराज पलंगावर लोडाला टेंकून बसले होते, किंवा पडले होते, ह्मटलें तरी चालेल. त्यांच्या सभोंवतीं पुष्कळ दासी व नौकर लोक होते. त्यांच्या पलीकडे पडद्यांमध्यें बायजाबाई, रखमाबाई आणि बाळाबाई ह्या होत्या. महारा-

जांच्या चेहऱ्यामध्यें फार फरक झालेला पाहून मला एकदम वाईट वाटलें. त्यांचे हात व शरीराचा वरील भाग अगदीं कृश झाला होता. पोट व पाय फार सुजले होते. मी त्यांच्याजवळ गेलों व त्यांचा हात मी आपले हातांत घेतला. आणि ते काय शब्द उच्चारतात ते ऐकण्याकरितां मीं त्यांच्या तोंडाजवळ आपलें डोकें नेलें. त्यांच्यानें प्रथमतः कांहीं बोलवेना; ह्मणून ते स्तब्ध राहिले होते. शेवटीं, कांहीं वेळानें त्यांनीं स्पष्ट व मोठ्यानें, तेथील सर्व लोकांस व पडद्यांमध्यें देखील ऐकूं जाईल अशा रीतीनें, " जो तुम मुनासीब, सो करो " ( तुह्मांस जें योग्य वाटेल तें तुह्मी करा ) हे शब्द उच्चारिले. ते ऐकून मीं महाराजांस उत्तर दिलें कीं, " महाराजांच्या इच्छेप्रमाणें प्रत्येक गोष्ट केली जाईल. " नंतर मीं त्यांचें थोडें सांत्वन केलें; व परमेश्वराच्या कृपेनें अद्यापही महाराजांच्या प्रकृतीस आराम पडेल, अशी आशा दर्शविली. ह्या वेळीं महाराजांस फार गहिंवर आला, व त्यांनीं "आपके देखनेसे, और आपके मोहबतसे—" एवढे हृदयद्रावक शब्द उच्चारिले. परंतु पुढें त्यांच्यानें तें वाक्य पुरें करवलें नाहीं. पुढें पुष्कळ वेळ ते स्तब्ध राहिले. शेवटीं मीं " महाराज साहेबांस आणखी कांहीं मला कळविण्याची इच्छा आहे कीं काय ?" असें विचारिलें. त्या वेळीं त्यांनीं पुनः "बहुत तेरासा कहना है" ( आपल्याला पुष्कळ सांगावयाचें आहे ) असे शब्द उच्चारिले. परंतु पुढें पुष्कळ वेळ त्यांच्यानें कांहीं बोलवेना. तेव्हां मीं असा विचार केला कीं, दुसऱ्या खोलीमध्यें आपण कांहीं वेळ जावें, व महाराजांस थोडीशी हुषारी वाटली व बोलण्याची थोडी शक्ति आली ह्मणजे पुनः त्यांच्या जवळ यावें. तें तेथील मंडळीस पसंत पडलें. मी उठलों न उठलों तोंच, बायजाबाईनीं पडद्यांतून "डा० प्यांटन ह्यांस बोलावून आणवावें" अशी सूचना केली. तेव्हां मी, महाराजसाहेबांची तशी इच्छा आहे

कीं काय, ह्मणून पुनः प्रश्न केला. त्यास महाराजांनीं 'होय' ह्मणून अस्पष्ट खुणेनें उत्तर दिलें.

"महाराजांनीं ह्या प्रसंगीं जें जें भाषण केलें, तें मी अक्षरशः कळवीत आहें. ह्याचें कारण, ते त्यांचे अगदीं शेवटचे शब्द होत. मी दुसऱ्या माडीवर जाऊन एक तास झाला नाहीं, तोंच राजवाड्यांतील स्त्रियांचा रुदनस्वर ऐकूं आला; व त्यानें महाराजांचा अंत झाला असें कळविलें!

"ह्यानंतर पुढें जो शोककारक देखावा दृष्टीस पडला, त्याचें बरोबर वर्णन माझ्यानें देववत नाहीं. स्त्रियांचें आक्रंदन व पुरुषांचे शोकस्वर ह्यांच्या योगानें राजवाड्यांत जिकडे तिकडे जो आक्रोश व जो गोंधळ उडाला, तो वर्णन करणें अशक्य आहे!

"२० तारखेच्या खलित्यांतील शेवटच्या कलमांत कळविल्याप्रमाणें, मीं महाराजांच्या प्रेताची पुढील तयारी होई तोंपर्यंत, राजवाड्यांत राहण्याचा निश्चय केला, व त्याप्रमाणें हिंदुराव व तेथें हजर असलेले दरबारचे प्रमुख लोक ह्यांनींही मला विनंति केली. राजवाड्यामध्यें जिकडे तिकडे दुःखाचा देखावा दृष्टीस पडत होता; तथापि त्यांतल्या समाधानाची गोष्ट एवढीच कीं, सती जाण्याची तयारी कोठें आढळून आली नाहीं. ज्या वेळीं एखादी स्त्री आपल्या प्राणपतीबरोबर सती जाण्याचा विचार करित्ये, त्या वेळीं तिच्या दुःखास एक प्रकारचें गंभीर आणि उदात्त स्वरूप येत असतें. मग ती त्या वेळीं नेत्रांतून दुःखाश्रू ढाळीत नाहीं, किंवा मोठ्यामोठ्यानें धाय मोकलून रडत नाहीं. मग ती आपला तोंडावरचा पदर एकीकडे सारून सर्व लोकांपुढें येते व आपला निश्चय व्यक्त करिते. अशा प्रकारचें चिन्ह मला बिलकूल दिसत नव्हतें. ह्मणून, जेव्हां बायजाबाई महाराजांबरोबर सहगमन करणार अशी बातमी माझ्या कानावर आली, तेव्हां त्यांचा प्रतिबंध करण्यास फार कठीण जाणार नाहीं अशी मला खात्री वाटत होती. ह्या कारणा-

स्तव मला बाईसाहेबांजवळ नेण्यांत आलें. त्या वेळीं त्यांची व माझी भेट फक्त एका पातळ पडद्याच्या अंतरानें झाली.

"त्या प्रसंगीं मीं जें काय भाषण केलें, तें येथें सविस्तर देण्याची आवश्यकता नाहीं. ह्या भाषणाचे शेवटीं, महाराजांनीं मला मरतेवेळीं जें सांगितलें आहे, त्याप्रमाणें सर्व राज्याचा अधिकार मीं धारण केला आहे, व आतां तुह्मीं आपल्या निवासस्थानीं जावें अशी माझी इच्छा आहे, असें मीं सांगितलें. परंतु त्याप्रमाणें घडलें नाहीं. शेवटीं बायजाबाई ह्यांस राजवाड्यांतील सर्व स्त्रियांना हातीं धरून अंतःपुरांत न्यावें लागलें.

"पुढें कांहीं वेळानें रेसिडेंट ह्या नात्यानें मजकडे एक सात कलमांचा खलिता पाठविण्यांत आला. हें महाराजांचें शेवटचें मृत्युपत्र ह्मणून आलें होतें. परंतु त्यावर महाराजांची सही नव्हती. ह्यांतील मुख्य मुद्यांचा आशयः—महाराजांचा हेतु दत्तकपुत्र घ्यावा; हिंदुराव ह्यांनीं सर्व राज्याचे व्यवस्थापक ( Superintendent ) व्हावें; औरस पुत्र झाल्यास तो गादीचा अधिकारी व्हावा; व न झाल्यास दत्तक पुत्रानें, महाराज व बायजाबाई हे जोंपर्यंत हयात आहेत तोंपर्यंत त्यांच्या आज्ञेंत चालावें; इत्यादि होता. आणि शेवटीं, ह्या सर्व गोष्टी सिद्धीस नेण्यास ब्रिटिश सरकारानें साहाय्य करावें, अशी विनंति केली होती.

"महाराजांच्या अंत्यविधीचा देखावा फारच हृदयद्रावक व शोककारक होता. महाराजांचें शव पालखीमध्यें घालून त्यावर उंची पोषाख व रत्नांचे व मोत्यांचे अलंकार घातले होते. त्यांचे तोंड मोकळें ठेवलें असून जीवंत मनुष्याप्रमाणें त्यांस बसविलें होतें. त्यांच्या ह्या शेवटच्या स्वारीचा समारंभ दरबारी थाटाप्रमाणें असून, त्यांच्या पालखीबरोबर हत्ती, घोडे, डंका निशाणें वगैरे सर्व चाललें होतें. लष्करांतील प्रत्येक माणूस त्यांच्या प्रेताबरोबर होता. तात्पर्य, त्यांचें शेवटचें दर्शन घेण्यास फारच गर्दी झाली होती. सर्व प्रजाजन महाराजांच्या मृत्यूमुळें अत्यंत

शोकाकुल होऊन गेले होते; व त्यांच्या नेत्रांतून एकसारख्या अश्रु-धारा चालल्या होत्या. त्यावरून महाराजांविषयीं त्यांची किती प्रीति होती ह्याची साक्ष पटत होती. दौलतराव शिंदे हे चांगल्या राजास लागणाऱ्या सर्व गुणांनीं जरी परिपूर्ण नव्हते, तथापि ते दुष्ट किंवा क्रूरकर्म करणाऱ्या राजमालिकेंत गणले जाणारे नव्हते. त्यांच्या ठिकाणीं शहाणपण किंवा समजूत ह्यांची उणीव नव्हती. ह्मणूनच महाराष्ट्रसाम्राज्यरूपी नौकेचा भंग झाला असतांना त्यांचें संस्थान सुरक्षित राहिलें. ते फार शूर व रसिक होते. अनेक भाषणप्रसंगीं ते ज्या उपमा आणि जे दृष्टांत देत असत, ते फार मार्मिक व आनंदप्रद असत. त्यांचा स्वभाव अतिशय सौम्य व शांत होता. तारुण्यावस्थेंत त्यांचे दुर्गुण व प्रमाद कितीही असले (आणि त्याबद्दलचा सर्व दोष महाराजांपेक्षां त्यांच्या कुटिल मंत्रिमंडळाकडे अधिक येतो असें मला वाटतें.), तथापि त्यांच्या पुढील कारकीर्दींत, त्यांच्या हातून नीतीचा मोठासा भंग होण्यासारखी एकही गोष्ट घडली नाहीं. दुर्लक्ष्य व आळस हे त्यांचे दोन मोठे दुर्गुण होते. ते त्यांस राजपदाचीं कर्तव्यकर्में उत्तम रीतीनें बजावण्यास सदैव आड येत असत. एकंदरींत, हिंदुस्थानांतील एवढी मोठी विस्तृत सत्ता त्यांचे हातीं अवघें चौदा वर्षांचें अल्प वय असतां आली; व त्यांचें सर्व बालपण, त्या काळच्या मराठी लष्कराचें लक्षण होऊन राहिलेल्या 'विश्वासघात' व 'लुटालूट' ह्यांच्या देखाव्यांत गेलें; ह्या दोन गोष्टी लक्ष्यांत घेतल्या, ह्मणजे त्यांच्या कारकीर्दींत घडलेल्या पुष्कळ चुका व दोष हे क्षम्य होते, असें मानण्यास हरकत नाहीं. ह्या पत्रांतील कांहीं भाग नेहमींच्या सरकारी पत्रव्यवहाराच्या मर्यादेपेक्षां अधिक लिहिला गेला आहे; तथापि ह्या प्रसंगाचें महत्त्वच तसें आहे असें समजून, त्याबद्दल क्षमा होईल अशी आशा आहे. ज्या संस्थानिकाचा व माझा पुष्कळ दिवसांचा परिचय आहे, व ज्याचें वर्तन अलीकडे मज-

बरोबर अगदीं स्नेहभावाचें होतें, त्याच्या मृत्यूचें वृत्त लिहितांना माझी हृदयवृत्ति द्रवून जाणें साहजिक आहे. तसें न झालें तर मला खरोखर पाषाणहृदयीच व्हावें लागेल. त्याचप्रमाणें, मृत्युसमयीं त्यानें ब्रिटिश सरकारच्या न्यायीपणाबद्दल व औदार्याबद्दल जो अमर्याद विश्वास दाखविला, ती त्याच्या मृत्यूबरोबर घडलेली एक महत्त्वाचीच हृदय-द्रावक गोष्ट समजली पाहिजे."

ह्या खलित्यावरून मेजर स्टुअर्ट हे सुस्वभावी गृहस्थ असून, एतद्देशीय संस्थानिकांविषयीं त्यांच्या मनांत किती आदरबुद्धि वसत होती, हें चांगलें दिसून येतें. असो.

महाराज दौलतराव निवर्तल्यानंतर त्यांचा उत्तरविधि राजकीय थाटानें झाला. महाराणी बायजाबाईसाहेब ह्यांस आपल्या प्रियपतीचें चिर-कालिक वियोगदुःख सहन करण्याचा भयंकर प्रसंग प्राप्त झाला. परंतु त्यांनीं, धीर न सोडतां, मोठ्या शांतपणानें तें सहन करून, आपल्या यजमानाच्या आज्ञेप्रमाणें संस्थानचीं राज्यसूत्रें लवकरच आपल्या हातीं घेतलीं.

बायजाबाईसाहेबांनीं महाराज दौलतराव शिंदे ह्यांच्या दहनस्थाना-वर एक सुरेख छत्री बांधून त्यांचें ग्वाल्हेर येथें चिरस्मारक करून ठेविलें आहे. ह्या छत्रीच्या खर्चाकरितां त्यांनीं सालीना दहा हजार रुपयांची नेमणूक करून दिली आहे. ती अद्यापि चालत असून त्या छत्रीचा प्रतिवार्षिक उत्सव मोठ्या थाटानें होत असतो.

दौलतराव शिंदे शरीरानें धट्टेकट्टे असून त्यांची उंची ५-५॥ फूट होती. त्यांचा वर्ण काळा असून, चेहरा वाटोळा व नाक किंचित् चपटें होतें. तथापि एकंदर चेहरा दिसण्यांत भव्य आणि परोपकारशील असा दिसे. त्यांची वर्तणूक फार आदबीची असून त्यांस आदरसत्कार फार प्रिय असे. त्यांचा पोषाख व एकंदर चालचलणूक पाहून, पुष्कळ

युरोपियन लोक, त्यांची इंग्लंडच्या आठव्या हेन्री राजाशीं तुलना करीत असत. त्यांचें पागोटें लहान व पिळदार असून, तें सध्यांच्या ग्वाल्हेर दरबारच्या चालीप्रमाणें कलतें घालण्याचा त्यांचा परिपाठ असे. त्यांचा पोषाख फार साधा असे. एक तलम झिरझिरीत पांढरा आंगरखा व गुडघ्यापर्यंत लांब असा रेशमी तंग चोळणा हीं फक्त त्यांच्या पोषाखाचीं दोन वस्त्रें असत. त्यांच्या गळ्यामध्यें बकुळाएवढ्या पाणीदार मोत्यांचे व तेजस्वी पाचांचे फार मूल्यवान् कंठे असत. दौलतरावांस मोत्यांचा फार शोक असून, नेहमीं उत्तम मोत्यें पाहिलीं कीं, त्यांचा संग्रह केल्यावांचून ते राहत नसत. त्यांच्या मोत्यांच्या आवडीवरून त्यांस लष्करांतील लोक "मोतीवाले महाराज" असें विनोदानें ह्मणत असत.

हे शिकार करण्यामध्यें फार निष्णात असून, त्यांचा काल बहुतेक घोड्याच्या पाठीवर वाघांची शिकार करण्यांत जात असे. नेम मारण्यांत त्यांचा हातखंडा असे. नदीच्या कांठीं तासांचेतास बसून मासे धरण्याचाही त्यांना नाद असे. घोड्यावर बसण्यांत व भाला मारण्यांत हे पटाईत होते. हे दोन गुण त्यांच्या सहवासानें बायजाबाई ह्यांच्या अंगीं पूर्णत्वेंकरून वसत होते. ते जातीनें आळशी स्वभावाचे असून सदां ऐषआरामांत राहण्याची त्यांना संवय असे. अगदीं बालवयामध्यें त्यांच्या हातून कांहीं क्रूरपणाच्या व कडक गोष्टी घडल्या; परंतु पुढें केव्हांही तशा गोष्टी करण्यास ते सहसा प्रवृत्त होत नसत. ते स्वधर्मनिष्ठ असून पाटीलबावांप्रमाणेंच मोठे कृष्णभक्त होते. सकाळसंध्याकाळीं देवपूजा वगैरे करण्याचा त्यांचा नित्य नियम असे.

दौलतराव शिंदे ह्यांच्या कालामध्यें ज्ञानप्रसार कमी असल्यामुळें ग्रंथवाचनाची अभिरुचि बेताचीच असे. त्यामुळें मनाचें रंजन करण्याचीं साधनें व मार्ग हीं वर्तमानकालाप्रमाणें नसून, गाणेंबजावणें व नाचरंग ह्यांवर त्या वेळीं फार बहार असे. दौलतराव शिंदे हे संगीताचे

फार शोकी असून, त्यांच्या जवळ गानकलासंपन्न गुणिजन फार असत. त्यांच्यापुढें गवयी व कलावंतिणी ह्यांची हजिरी लागली नाहीं असा एकही दिवस जात नसे. ते ह्या कलेंतील पूर्ण रसज्ञ असून, ध्रुपदांचे मोठे भोक्ते होते, अशी ख्याति असे. त्यांना उद्यानविहाराचाही फार नाद असे. ग्वाल्हेरच्या सभोंवतीं त्यांनीं अनेक बागबगीचे केले असून नेहमीं तेथें वनभोजनें व वनक्रीडा चालत असत.

दौलतराव शिंदे ह्यांस दोन बायका होत्या. परंतु त्या दोघीं-मध्यें त्यांची बायजाबाईवर फार प्रीति असे. त्यामुळें बायजाबाईसाहेब नेहमीं त्यांच्या सन्निध असत. त्या स्वतः चतुर व कुशाग्रबुद्धि असल्यामुळें दौलतराव शिंदे ह्यांच्यावर त्यांचें फार वजन असे. दौलतराव शिंदे हे हरहमेषा राजकीय अथवा घरगुती गोष्टींमध्यें त्यांची सल्लामसलत घेत असत. बायजाबाई ह्यांचें दौलतरावांवर विशेष वजन होतें ह्याचें कारण एका इंग्रज गृहस्थानें असें दिलें आहे कीं, "बायजाबाई ह्या राठोर रजपुतांच्या उच्च कुलांतील असल्यामुळें व दौलतराव हे कमी प्रतीच्या मराठ्यांच्या कुलांतील असल्यामुळें, केवळ कुलभेदामुळें त्यांना एवढें वर्चस्व प्राप्त झालें." परंतु हें कारण सयुक्तिक नाहीं. कां कीं, केवळ कुलाच्या उच्चतेमुळें बायजाबाईचें दौलतरावांसारख्या पाणीदार व ऐश्वर्यसंपन्न पतीवर वर्चस्व बसलें नसून, त्यांच्या अंगचे विशिष्ट गुणच त्याला कारण झाले होते.

दौलतराव शिंदे ह्यांचें स्वतःच्या दरबारांतील मुत्सद्यांशीं व पर-राज्यांतील वकिलांशीं जें वर्तन असे, तें फार प्रतिष्ठेचें व सभ्यपणाचें असे. मोठमोठ्या राजकारस्थानांच्या गोष्टींबद्दल देखील जो वादविवाद व जीं संभाषणें व्हावयाचीं, तीं ह्या दरबारच्या आदबीमुळें, दिवाणाच्या

१ "Her descent was from the Rahtore Rajpoots, which alone gave her great power over him, as he was of lower caste."

मार्फत होत असत. तात्पर्य, प्रत्येक गोष्टींत त्यांचें सौजन्य दिसून येत असे. इंग्रजी रेसिडेंटाचा ते फार सत्कार ठेवीत असत; व त्यांस क्वचित् प्रसंगीं मेजवान्या देत असत.

दौलतराव हे सर्व हिंदुलोकांप्रमाणें धर्माच्या बाबतींत परधर्मीयांशीं फार सौम्यपणानें वागत असत. ते स्वतः कर्मनिष्ठ होते, परंतु मुसलमान साधूंविषयीं व त्यांच्या देवस्थानांविषयीं त्यांची पूज्य बुद्धि असे. त्यांनीं मुसलमानांच्या पिरांचीं व फकिरांचीं वर्षासनें चालविलीं होतीं. ग्वाल्हेर येथील शाह मनसूर ह्याच्या स्थानाबद्दल त्यांची पराकाष्ठेची भक्ति असे. ह्याचें कारण, त्या अवलियानें महादजी शिंदे ह्यांस, "दिल्लीपर्यंत तुला राज्य दिलें आहे" असा वरप्रसाद दिला होता. त्याप्रमाणें पुढें घडून आलें, ह्मणून शिंद्यांच्या घराण्यांत त्या अवलियाविषयीं भक्तिभाव उत्पन्न झाला. तो अद्यापि चालू आहे.

दौलतराव हे पुढें पुढें उदास झाले होते असें दिसून येतें. त्यांच्याविषयीं एका युरोपियन गृहस्थानें अशी एक गोष्ट लिहिली आहे कीं, " इ. स. १८०७ सालीं एकदा धूमकेतू निघाला. त्या वेळीं दौलतरावांच्या मुत्सद्द्यांनीं व ब्राह्मणमंडळींनीं, राजे लोकांस हें अनिष्ट असून, कांहीं फेरफार होणार असें भाकित केलें. त्या वेळीं दौलतराव शिंदे ह्यांनीं असें उत्तर दिलें कीं, 'माझें आतां कांहीं अनिष्ट होण्यासारखें राहिलें नसून, माझ्या स्थितीमध्यें झाला, तर कांहीं इष्टच फेरफार होईल !' " इ. स. १८०३–४ सालीं जनरल वेलस्ली व लॉर्ड लेक ह्यांनीं दौलतराव शिंदे ह्यांचा पराभव करून सुर्जीअंजनगांवच्या तहामध्यें त्यांचें स्वातंत्र्य हरण केलें, त्या मानहानीस अनुलक्षून हें उत्तर होतें.

दौलतराव शिंदे ह्यांचा काळ शास्त्रीय शोध व ज्ञानप्रसार ह्यांचा नसल्यामुळें, पाश्चिमात्य देशांतील कलाकौशल्य व शास्त्रीय सुधारणा ह्यांचें त्या वेळीं लोकांस अपूर्व कौतुक व चमत्कार वाटत असे. अर्थात् शास्त्रीय शोधांच्या प्रगतीची लोकांस कल्पना नसल्यामुळें, पाश्चिमात्य

वस्तू पाहून त्यांची मति थक्क होऊन जात असे; व ते शास्त्रीय ज्ञानाच्या अभावीं असंस्कृत व भोळसर तर्क लढवून आपलें हास्यकारक अज्ञान मात्र व्यक्त करीत असत. त्यामुळें अनेक गमतीचे प्रकार वारंवार घडून येत असत. इ. स. १८१० सालीं, शिंद्याच्या दरबारचे ब्रिटिश रेसिडेंट मेजर मालकम ह्यांनीं, दौलतरावांकरितां एक उत्कृष्ट चार चाकी बगी इंग्लंडाहून तयार करून आणिली; व ती चार करड्या रंगाचे आरबी घोडे व त्यांचें उत्तम प्रकारचें कातडी सामान ह्यांसह त्यांस नजर केली. दौलतरावांनीं व त्यांच्या दरबारी मंडळीनें अशा प्रकारचा अश्वरथ पूर्वीं कधींही पाहिला नव्हता. त्यामुळें त्यांस फार चमत्कार वाटला, व त्यांत कदाचित् दारूगोळा भरून ठेवला असेल असें समजून, त्यांनीं त्या गाडीमध्यें प्रथम फकीर लोक बसविले! अर्थात् मोठ्या प्रेमादरानें नजर केलेल्या बहुमूल्य अश्वरथांत फकीर बसलेले पाहून ब्रिटिश रेसिडेंटास काय वाटलें असेल, तें निराळें सांगावयास नकोच. ह्याचप्रमाणें आणखी एक अशीच मजेची गोष्ट घडून आली. एकदां रेसिडेंटानें दौलतराव शिंद्यांकरितां एक भव्य व सुंदर तंबू तयार करवून त्यांस नजर केला. तो पिंवळ्या रंगाचा असून त्याच्या अंतर्भागीं कांचेच्या तावदानांच्या प्रशस्त व रमणीय अशा खोल्या केल्या होत्या. ह्या तंबूमध्यें दौलतराव शिंदे ह्यांनीं एक मोठा मेजवानीचा समारंभ केला. त्या दिवशीं, कर्मधर्मसंयोगानें, रोषनाई करितांना मशालजीच्या नजरचुकीनें त्या तंबूस आग लागली, व तो सर्व जळून गेला. परंतु ही गोष्ट कोणाच्याच लक्ष्यांत न येऊन, जिकडे तिकडे अशी बातमी पसरली कीं, तंबूच्या कनातींमध्यें कळीच्या तोफा, दारूगोळा, व शस्त्रें ठेविलीं होतीं. त्यामुळें तो तंबू पेटून खाक झाला!! तात्पर्य, अशा गोष्टी त्या काळीं फार घडून येत असत, व त्यांच्या योगानें मराठी राज्यांत ज्ञानप्रसार कमी होता हें व्यक्त होत असे.

---



# भाग ५ वा.

## बायजाबाईसाहेबांची कारकीर्द.

दौलतराव शिंदे मृत्यु पावले त्या वेळीं हिंदुस्थानांतील ब्रिटिश राज्यसत्ता लॉर्ड आह्मर्स्ट ह्या गव्हरनर जनरल साहेबांकडे होती. त्यांच्या राजनीतीचा उद्देश एतद्देशीय संस्थानें खालसा करण्याचा नसल्यामुळें त्यांनीं ग्वाल्हेर संस्थानाबद्दल फार उदार मतानें विचार केला. ग्वाल्हेरसारखें प्रचंड संस्थान बिनवारस समजून ब्रिटिश राज्यामध्यें सामील केलें असतें, तर प्रजाजन असंतुष्ट होऊन भयंकर अनर्थ ओढवला असता; व त्यामुळें चोहोंकडे अस्वस्थता उत्पन्न झाली असती. परंतु त्या वेळचें मुत्सद्दीधोरण "एतद्देशीय संस्थानें हीं ब्रिटिश राज्याच्या चिरस्थायित्वाचे आधारस्तंभ आहेत," असें शहाणपणाचें असल्यामुळें, एतद्देशीय संस्थानांच्या हक्कांची पायमल्ली न करितां, उलट तीं रक्षण करण्याकडे, त्या वेळच्या चतुर राज्यकर्त्यांची प्रवृत्ति असे. ह्या प्रवृत्तीचा परिणाम इ. स. १८५७ सालच्या बिकट प्रसंगीं कसा हितावह झाला, व ब्रिटिश राज्य रक्षण करण्यास ग्वाल्हेरसारख्या एतद्देशीय संस्थानांनीं किती उत्कृष्ट साहाय्य केलें, हें इतिहासवाचकांस सांगावयास नकोच. ग्वाल्हेरच्या संस्थानिकास औरस संतति नसल्यामुळें त्यास दत्तक घेण्याबद्दल ब्रिटिश रेसिडेंटानें आग्रहपूर्वक विनवणी करावी; तथापि त्यानें ती न जुमानतां, आपल्या पत्नीच्या शहाणपणावर हवाला देऊन ब्रिटिश सरकारावर आपला पूर्ण विश्वास ठेवावा; व ब्रिटिश सरका-

रानें त्या विश्वासाचें चीज करावें; हा प्रेमभाव मांडलिक व त्यांचे सार्वभौम प्रभु ह्या उभयतांस सारखाच भूषणावह आहे, ह्यांत शंका नाहीं. असो.

लॉर्ड आह्मर्स्ट ह्यांनीं ग्वाल्हेरच्या गादीबद्दल विचार करितांना, महाराज दौलतराव शिंदे ह्यांची शेवटची इच्छा व त्यांच्या पत्नी बायजाबाईसाहेब ह्यांची योग्यता व कर्तृत्वशक्ति हीं पूर्णपणें ध्यानांत

---

१ लॉर्ड डलहौसी ह्यांनीं ज्या वेळीं एतद्देशीय संस्थानें खालसा करण्याचा क्रम आरंभिला, त्या वेळीं मि० सलिव्हन नामक एका युरोपियन गृहस्थांनीं ग्वाल्हेरच्या संस्थानाची ही हकीकत देऊन त्या वेळच्या उदार राजनीतीची प्रशंसा केली आहे. त्यांनीं ह्याप्रमाणें उल्लेख केला आहे:—

"In 1826 Dowlatrao Scindiah, Rajah of Gwalior, was ill and childless. Colonel Stewart, the Resident at his court, and his assistant, passed months in urging him to adopt an heir; they reasoned, they argued, they insisted, they even annoyed and irritated the sick prince: for the pride of Scindiah had been broken. After the downfall of the Peishwa, in whose defence his sword had not been drawn, the glory of the Mahratta race was, he felt, gone, and he was no longer the same man. So, careless of the future, he repulsed all their entreaties, replying—"After my death you will be masters of every thing, and may do as you please." In March 1827, he died heirless. But Lord Ahmerst did not–as Lord Dalhousie now says we are bound in "all" such cases to do–seize on Gwalior as a "lapsed" fief. On the contrary–he disclaimed any right "to regulate the Gwalior succession;" eagerly and gracefully he recognized the boy whom Scindiah's favourite wife adopted after his death. In this case the right was exercised, not by the eldest, but by the second wife, who, said Scindiah to Colonel Stewart, when teased about the eventualities of his succession, "was a woman of sense."—*The Native States of India. page. 22.*

1827

घेऊन, त्यांसच संस्थानचें सर्व आधिपत्य दिलें; व त्यांनीं आपल्या इच्छेप्रमाणें दत्तक पुत्र घ्यावा असें ठरविलें. ही गोष्ट बायजाबाईसाहेब व ग्वाल्हेर दरबारचे मुत्सद्दी व सर्व प्रजाजन ह्यांस संतोषदायक झाली; व त्यांनीं त्याबद्दल नामदार गव्हरनर जनरलसाहेब ह्यांचें व रेसिडेंट मेजर स्टुअर्ट ह्यांचें फार फार अभिनंदन केलें.

बायजाबाईसाहेब ह्यांनीं ग्वाल्हेरचे रेसिडेंट मेजर स्टुअर्ट ह्यांच्या विचारानें सर्व राज्यकारभार आपल्या हातीं घेतला; व ग्वाल्हेरचे सर्व मुत्सद्दी व सरदार लोक ह्यांच्या भेटी घेऊन त्यांस आश्वासनें दिलीं. महाराजांच्या पश्चात् बायजाबाईसाहेब व त्यांचे बंधु हिंदुराव घाटगे ह्यांनीं राज्याची सर्व व्यवस्था आपले हातीं घेतल्यामुळें व दरबारी लोकांस संतुष्ट केल्यामुळें, ग्वाल्हेर येथें कोणत्याही प्रकारें गडबड झाली नाहीं.

बायजाबाईसाहेब ह्यांनीं संस्थानच्या गादीचा धनी करण्याकरितां दत्तक पुत्र घ्यावा अशी सर्व नागरिक जनांची इच्छा होती; व तशी इच्छा ब्रिटिश रेसिडेंट ह्यांनींही व्यक्त केली होती. ह्याकरितां बायजाबाईसाहेबांनीं दक्षिणेंतील शिंदे ह्यांच्या वंशापैकीं पांच मुलें हिंदुस्थानांत आणविण्याबद्दल कारकून व स्वार पाठविले. त्याप्रमाणें त्यांनीं शिंदेघराण्याच्या निरनिराळ्या शाखेंतील मुलांचा शोध करून पांच मुलें ग्वाल्हेर येथें आणिलीं. शिंदे घराण्याचे मूळ पुरुष मानाजी शिंदे कन्हेरखेडकर हे होते. ह्यांच्या वंशजांपैकीं चांगजी शिंदे ह्यांच्या शाखेपैकीं पाटलोजी ह्मणून जे पुरुष होते, त्यांचा पुत्र मुकुटराव हा वयानें ११-१२ वर्षांचा असून, दिसण्यांत हुशार व तरतरीत असा होता. तो बायजाबाईसाहेबांनीं पांच मुलांतून पसंत केला. त्याला थोडें लिहितां वाचतां येत असून, घोड्यावर बसण्याचेंही ज्ञान होतें. त्यामुळें दरबारच्या मराठे मंडळीस त्याचीच निवड पसंत वाटली. ह्या मुलाची जन्मपत्रिका संस्थानच्या विद्वान् ज्योतिष्यांनीं पाहिली, व

मुलाचे उच्च प्रतीचे ग्रह वर्तविले. त्याचप्रमाणें सामुद्रिकांनीं त्याच्या शरीरावर राजचिन्हें आहेत असें सांगितलें. ह्याप्रमाणें राजपद उपभोगण्यास हा मुलगा पात्र आहे, असें सशास्त्र ठरल्यानंतर, शनिवार ता० १६ जून इ. स. १८२७ रोजीं, बायजाबाईसाहेबांनीं आपले बंधु हिंदुराव आणि ग्वाल्हेरचे दिवाण बापूजी रघुनाथ, व इतर मुत्सद्दी व सरदार लोक ह्यांस पाचारण करून त्यांचा दरबार भरविला, व त्यामध्यें हा मुलगा दत्तक घेऊन त्यास संस्थानाचा अधिपति करण्याबद्दल त्यांची संमति विचारली. सर्व मंडळींनीं मुलगा पसंत करून त्यास गादीवर बसविण्याबद्दल आपलें पूर्णपणें अनुमोदन दिलें. नंतर बाईसाहेबांनीं ता० १८ जून इ. स. १८२७ ह्या शुभदिनीं दत्तविधान व राज्याभिषेक समारंभ करण्याचा बेत ठरविला. बाईसाहेबांच्या मनांत ह्या मुलांस आपल्या मुलीची कन्या देऊन त्याचें लग्न करावें अशी इच्छा उत्पन्न झाली. तेव्हां त्यांनीं शास्त्री व पंडित लोकांस बोलावून त्यांच्याकडून उभयतांचीं टिपणें पाहविलीं. त्यांत उभयतांची गणमैत्री जमल्यामुळें बाईसाहेबांनीं आनंददायक राज्याभिषेकसमारंभाबरोबर मंगलकारक लग्नसमारंभही करण्याचें ठरविलें.

---

१ सर्व सरदार व मुत्सद्दी लोकांचा दरबार भरवून सर्वांच्या विचारानें बायजाबाईनीं दत्तविधान व राज्याभिषेक असे दोन्ही समारंभ ठरविले, ही गोष्ट ता. ९ जुलईच्या "कलकत्ता गव्हरमेंट ग्याझेट" मध्येंही प्रसिद्ध झालेली आहे. त्यांत स्पष्ट लिहिलें आहे:—

"On the Saturday previous, the chiefs and the ministers were assembled at the durbar, when the intentions of the Baiza Bai to adopt and place Mookut Rao on the musnud were publicly announced, and the opinions of the assembly were asked. Not a dissentient voice was heard, and all expressed their warm concurrence in the measure."

ह्यावरून बायजाबाईसाहेब ह्या लोकमताचें महत्त्व जाणत होत्या असें ह्मणण्यास हरकत नाहीं.

रविवार ता. १७ जून रोजीं ग्वाल्हेर येथील राजवाड्यांत मुकुटराव ह्यांचा दत्तविधानविधि व लग्नसमारंभ फार थाटानें झाला. नंतर दुसरे दिवशीं–ह्मणजे सोमवार ता. १८ रोजीं, राज्याभिषेक समारंभ झाला. ह्या दिवशीं सर्व नगरामध्यें आनंदप्रदर्शनार्थ गुढ्या तोरणें उभारलीं होतीं; व जिकडे तिकडे मंगलोत्सव दृष्टीस पडत होता. त्या दिवशीं प्रातःकाळीं वधूवरांची वरात हत्तीवरून मोठ्या समारंभानें वाजत गाजत निघाली व गृहप्रवेश होऊन बायजाबाईसाहेबांनीं उभय मुलांस मांडीवर घेऊन त्यांच्या तोंडांत साखर घातली. ह्याप्रमाणें लग्नसोहळा झाल्यानंतर राजवाड्यामध्यें राज्याभिषेकाचा थाट उडाला. ब्रिटिश रेसिडेंट मेजर स्टुअर्ट व त्यांचे असिस्टंट आणि इतर युरोपियन लष्करी कामगार आपापले दरबारी पोषाख करून व सुवर्णांकित म्यानाच्या समशेरी कमरेस लटकावून सभास्थानीं येऊन दाखल झाले. त्याचप्रमाणें ग्वाल्हेर संस्थानचे सर्व सरदार, दरकदार, मानकरी, मुत्सद्दी वगैरे लोक आपापल्या इतमामानिशीं दरबारांत हजर झाले. राजवाड्यापुढें घोडेस्वार, शिबंदी, प्यादे ह्यांचीं निरनिराळीं पलटणें खडी ताजीम देण्याकरितां खडीं होतीं. ह्याप्रमाणें दरबार भरून सुमुहूर्त वेळा प्राप्त होतांच, हिंदुरावांनीं मुकुटराव ह्यांस अंतःपुरांतून दरबारमहालामध्यें आणिलें. नंतर ब्रिटिश रेसिडेंट व सर्व दरबारी लोक ह्यांनीं खडी ताजीम देऊन महाराजांस सिंहासनावर आरूढ केलें. तों इकडे तोफा व बंदुका ह्यांचे मोठमोठे आवाज निघून त्यांनीं नभोमंडल भरून गेलें. ह्याप्रमाणें मुकुटराव ग्वाल्हेरचे अधिपति झाल्यानंतर मेजर स्टुअर्ट ह्यांनीं गव्हरनर जनरलसाहेबांचा खलिता व उभय वधूवरांस सादर करण्याकरितां त्यांच्याकडून आलेली बहुमूल्य खिलात अर्पण केली. नंतर सरदार व बडे लोक ह्यांनीं अनेक नजरनजराणे व मूल्यवान् वस्त्रें महाराजांस व बाईसाहेबांस नजर केलीं. ह्या वेळीं मुकुटराव ह्यांस शिंदे घराण्यांतील रणशूर वीर जनकोजी



हिंदुराव घाटगे.

ह्यांचें अभिधान देण्यांत आलें, व त्यांच्या नांवानें जयघोष करण्यांत आला. ह्याप्रमाणें मध्यान्ह समय पावेतों समारंभ होऊन, रीतीप्रमाणें अत्तरगुलाब व पानसुपारी होऊन दरबार बरखास्त झाला.

राज्याभिषेकसमारंभ आटोपल्यानंतर बायजाबाईसाहेब ह्यांनीं ग्वाल्हेर दरबारचे सरदार व मुत्सद्दी लोक ह्यांना त्यांच्या त्यांच्या योग्यतेप्रमाणें पोषाख व बहुमान देऊन संतुष्ट केलें. कै० महाराज दौलतराव शिंदे ह्यांचे कारकीर्दींत जे लोक आपल्या कर्तृत्वशक्तीनें आणि मर्दुमकीनें योग्यतेस चढले होते, त्यांस व त्यांच्या वंशजांस बायजाबाईसाहेबांनीं पूर्णपणें अभय देऊन, त्यांच्या पूर्वींच्या जहागिरी, तैनाती अथवा नेमणुका ह्यांत बिलकूल अंतर पडूं दिलें नाहीं. त्यामुळें त्यांची कारकीर्द लोकप्रिय होऊन सर्व लोक त्यांच्या आज्ञेमध्यें वर्तूं लागले; व दरबारची शिस्त उत्तम राहून ग्वाल्हेरच्या प्रजेस राजक्रांतीचें कोणतेंही दुःख सहन करण्याचा प्रसंग आला नाहीं.

बायजाबाईसाहेब ह्यांच्या दरबारीं कोण कोण सरदार व मुत्सद्दी होते ह्यांची माहिती उपलब्ध झाली आहे. ती पाहिली ह्मणजे बायजा-बाईंची जुन्या सेवकांविषयींची प्रीति व राजव्यवहारचातुर्य ह्या गुणांचें प्रकाशन झाल्यावांचून राहत नाहीं. जातीची अबला होऊन ज्या राजस्त्रीनें आपल्या दरबारांत राजकारस्थानपटु, तरवारबहादुर, व बुद्धिवैभवसंपन्न अशा मंत्रिमंडळाचा व सेनाग्रणींचा संग्रह केला होता, त्या स्त्रीच्या शहाणपणाची व हुशारीची तारीफ कोण करणार नाहीं? असो. बायजाबाईसाहेबांच्या दरबारांत जे सरदार व मुत्सद्दी होते त्यांची माहिती येणेंप्रमाणें:—

जयसिंगराव घाटगे हिंदुरावः—हे सखारामराव घाटगे सर्जेराव ह्यांचे चिरंजीव व बायजाबाईसाहेबांचे वडील बंधु होत. सर्जेराव घाटगे ह्यांचा दौलतराव शिंदे ह्यांच्या दरबारीं इ. स. १८१० सालीं वध

झाला. नंतर जयसिंगराव हे इ. स. १८१५ चे सुमारास ग्वाल्हेरीस गेले. तोंपर्यंत हे दक्षिणमहाराष्ट्रांतील आपल्या कागलच्या जहागिरीचा उपभोग घेत होते. कोल्हापुरचे महाराजांनीं ह्यांस 'हिंदुराव' व 'वजारतमाब' असे किताब दिले होते. त्यावरून हे 'हिंदुराव' ह्याच नांवानें प्रसिद्ध होते. हे बायजाबाईसाहेबांचे सख्खे बंधु असल्यामुळें व बायजाबाईसाहेबांचें दौलतराव शिंदे ह्यांचेवर चांगलें वजन असल्यामुळें हे ग्वाल्हेरच्या दरबारांत तेव्हांच मोठ्या योग्यतेस चढले. हे स्वभावतः मोठे बाणेदार व तेजस्वी असून, स्वातंत्र्यप्रियता हा गुण त्यांचे अंगीं फार वसत असे. त्यामुळें संस्थानांतील हांजी हांजी करणाऱ्या लोकांवर त्यांची तेव्हांच छाप पडत असे. दौलतराव शिंदे ह्यांची हिंदुरावांवर पुढें पुढें इतकी मेहेरबानी जडली कीं, त्यांनीं त्यांस १,५०,००० रुपयांची जहागीर बक्षीस दिली, व आपल्या दरबारांत त्यांस पहिल्या प्रतीचे सरदार केलें. एवढेंच नव्हे, तर त्यांच्या प्रत्येक हिताहिताच्या गोष्टीबद्दलही ते काळजी घेऊं लागले. हिंदुराव ग्वाल्हेरीस राहूं लागल्यानंतर इ. स. १८२५ सालीं, कागलची जहागीर कोल्हापुरच्या महाराजांनीं पुनः जप्त केली; व कागलच्या किल्ल्यावर स्वसैन्यानिशीं चालून जाऊन तो हस्तगत केला; आणि हिंदुरावांच्या मातुश्रींस व इतर कुटुंबीय मंडळीस तेथून घालवून दिलें. त्या वेळीं दौलतराव शिंदे ह्यांनीं इंग्रजसरकारांस मध्यस्थी घालून कोल्हापुरच्या महाराजांकडून ही जहागीर परत मिळवून देण्याची खटपट केली. ह्या संबंधानें महाराजांची अट अशी होती कीं, हिंदुरावांनीं आपल्या दरबारांत जहागीर मागण्यास स्वतः यावें. परंतु हिंदुराव ती गोष्ट मान्य करीनात. अखेर इंग्रजसरकारांनीं कोल्हापुरावर सैन्य नेलें; तेव्हां कोल्हापुरच्या महाराजांनीं, ता. ३० डिसेंबर इ. स. १८२५ रोजीं, इंग्रजांशीं तह करून हिंदुरावांची जहागीर सोडून दिली; व त्यांना कोणत्याही प्रकारें उपद्रव करणार नाहीं असें मान्य केलें.

ह्या एकाच गोष्टीवरून दौलतराव शिंद्यांचे दरबारीं हिंदुरावांची किती प्रतिष्ठा वाढली होती, ह्याची कल्पना करितां येईल. इ. स. १८२६ सालीं दौलतराव शिंदे ह्यांनीं, गव्हरनर जनरल लॉर्ड आम्हर्स्ट ह्यांची आग्रा मुक्कामीं भेट घेण्याकरितां, आपल्या वतीनें हिंदुराव ह्यांस आपले प्रतिनिधि ह्मणून पाठविलें होतें. अर्थात् हिंदुराव हे ग्वाल्हेर दरबारचे प्रमुख सूत्रधार बनल्यामुळें, दौलतराव शिंदे ह्यांच्या मृत्यूनंतर बायजाबाई-साहेबांनीं त्यांना आपले प्रधान मंत्री व सर्व राजकारणाचे आधारस्तंभ बनवावेत ह्यांत नवल नाहीं. बायजाबाईसाहेबांच्या कारकीर्दींतील बहुतेक राजकारणांत हिंदुरावांचा संबंध असून, त्यांच्या यशापयशाचा पुष्कळ वांटा त्यांच्याकडे आहे, असें ह्मणण्यास हरकत नाहीं.

बापूजी रघुनाथः—हे जातीचे चांद्रसेनीय कायस्थ प्रभु होते. ह्यांचें उपनांव दिघे. हे बडोद्याचे प्रख्यात मुत्सद्दी विठ्ठलराव देवाजी ह्यांच्या वशिल्यानें गायकवाड सरकारच्या पागेचे अधिपति झाले. गायकवाड सरकारचें व धारच्या पवारांचें नातें होतें. गोविंदराव गायकवाड ह्यांची कन्या धारचे रणशूर व पराक्रमी राजे यशवंतराव पवार, जे पानिपतच्या तुमुल रणकंदनांत इ. स. १७६१ सालीं पतन पावले, त्यांच्या पुत्रास—ह्मणजे खंडेराव पवारांस दिली होती. त्यांचे पुत्र आनंदराव पवार ह्यांस गोविंदराव गायकवाडाच्या पत्नी गहिनाबाईसाहेब ह्यांची सख्खी भाची मैनाबाई ही दिली होती. आनंदराव पवार इ. स. १८०७ सालीं मृत्यु पावले. त्यांस औरसपुत्र नसून त्यांच्या पत्नी मैनाबाई ह्या गरोदर होत्या. त्या अबला आहेत असें पाहून, धारच्या पवारांचा मुरारराव नामक एक दासीपुत्र, स्वतः सर्व राज्यकारभार बळकावून, त्यांना फार त्रास देऊं लागला; व संस्थानांत दंगेधोपे करूं लागला. त्यामुळें धार येथें झोटिंगबादशाही होऊन, शिंदे होळकर वगैरे प्रबल सरदारांस आपला फायदा करून घेण्यास चांगली संधि मिळाली. त्या वेळीं

धारसंस्थानास मदत करण्याकरितां बडोद्याच्या राणी गहिनाबाईसाहेब ह्यांनीं सखाराम चिमणाजी नामक एका शूर सरदाराबरोबर कांहीं सैन्य देऊन तिकडे पाठविलें. त्यांनीं तिकडे जाऊन बराच बंदोबस्त केला; परंतु त्यांस तेथील प्रमत्त लोकांचें पारिपत्य करण्याकरितां आणखी एका शूर सरदाराची अवश्यकता भासूं लागली. ह्मणून त्यांनीं बडोद्याहून बापूजी रघुनाथ ह्यांस बोलावून नेलें; व त्यांस सेनापतीचा अधिकार दिला. पुढें कांहीं दिवसांनीं सखाराम चिमणाजी मृत्यु पावले. तेव्हां धारची दिवाणगिरी बापूजी रघुनाथ ह्यांजकडे आली. त्यांनीं मोठ्या शहाणपणानें व शौर्यानें शत्रूंचा पराभव करून धारच्या राज्यांत शांतता स्थापन केली. ह्यांच्या कारकीर्दींत इ. स. १८१७ सालीं माळव्यामध्यें राज्यक्रांति घडून आली, व सर जॉन मालकम हे माळव्याच्या बंदोबस्ताकरितां आले. त्यांजबरोबर ह्यांनीं ता० १० जानेवारी १८१९ रोजीं मित्रत्वाचा तह करून धार संस्थानाचें रक्षण केलें. ह्यांचे कारकीर्दींत धार संस्थानांत अनेक सुधारणा होऊन प्रजा सुखी झाली. ह्यांनीं मैनाबाईचे चिरंजीव रामचंद्रराव पवार ह्यांचा, दौलतराव शिंदे ह्यांची नात अन्नपूर्णाबाई हिजबरोबर, मोठ्या थाटानें विवाहसमारंभ करून, ग्वाल्हेर व धार ह्या दोन्ही संस्थानांचा प्रेमसंबंध दृढतर केला. ह्यांचें शहाणपण व राजकारण-कौशल्य पाहून दौलतराव शिंदे ह्यांची त्यांच्यावर फार प्रसन्न मर्जी झाली, व त्यांनीं इ. स. १८२६ सालीं त्यांना ग्वाल्हेर येथें नेऊन दिवाणगिरीचीं वस्त्रें अर्पण केलीं. पुढें दौलतराव शिंदे लवकरच वारले. तथापि, बायजाबाईसाहेबांनीं ह्या प्रख्यात मुत्सद्याची कर्तृत्वशक्ति व धूर्तता लक्ष्यांत घेऊन, त्यांस आपल्या कारकीर्दींत मुख्य प्रधानकीचीं वस्त्रें दिलीं. बापूजी रघुनाथ ह्यांच्यासारख्या कीर्तिशाली मुत्सद्याचे योग्य सद्गुण ध्यानीं घेऊन, बायजाबाईसाहेबांनीं त्यांस आपल्या दरबारांतील प्रधान-पद सादर केलें, हीच गोष्ट त्यांच्या शहाणपणाची दर्शक आहे. उत्तम

मंत्र्याची निवड करणें हा महत्त्वाचा गुण होय. तो बापूजी रघुनाथ ह्यांच्या नेमणुकीवरून, बायजाबाईसाहेबांच्या अंगीं चांगल्या रीतीनें वास करीत होता, असें दिसून येतें.[1]

यशवंतराव दाभाडेः—हे तळेगांवच्या रणशूर सेनापति दाभाडे ह्यांच्या घराण्यांतील पुरुष होत. पेशव्यांनीं लष्करी सत्ता आपल्या हातीं घेतल्यामुळें हें घराणें पुढें नामशेष झालें होतें. परंतु दौलतराव शिंद्यांनीं यशवंतरावांस आश्रय देऊन आपल्या दरबारचे सरदार केलें होतें. शिंद्यांच्या मुलुखांत त्यांस ७०,००० हजारांची जहागीर होती. शिवाय दक्षिणेंत, खासगी जहागीर व तळेगांव व इंदुरी हीं दोन इनाम गांवें मिळून एकंदर ३१,१५० रुपयांचें उत्पन्न होतें. ह्यांचे चिरंजीव मन्याबा ऊर्फ बाबुराव ह्यांस दौलतराव शिंद्यांनीं आपली वडील मुलगी चिमणा-

---

१ बापूजी रघुनाथ ह्यांची प्रशंसा मध्यहिंदुस्थानचे पोलिटिकल एजंट सर जॉन मालकम, वेलस्ली व मार्टिन ह्यांनीं फार फार केली आहे. सर जॉन मालकम ह्यांनीं मध्यहिंदुस्थानच्या इतिहासामध्यें बापू रघुनाथासंबंधानें जो उल्लेख केला आहे तो वाचण्यासारखा आहे:–

"The administration of Dhar is conducted by Bapoo Raghunath, who acting in complete confidence of meriting and receiving the support of the British Government is incessant in his labours to restore this principality to prosperity."

"That principality being under a minor prince, the adopted son of Maina Bai, the widow of the late Raja, has afforded us the same advantages, in carrying into execution economical reforms of the state of Holkar, nor is the minister Bapoo Raghunath inferior to Tantia Jogh in zeal or in a just appreciation of the generous policy of the British Government, which has restored the ruined fortunes of the Dhar family, and given them once more a rank and place among the princes of India."

बाई ही दिली होती. हिच्या पोटीं त्यांस एकंदर तीन कन्या झाल्या. त्यांपैकीं एक धारचे राजे आनंदराव पवार ह्यांस आणि दुसरी महाराज जनकोजीराव शिंदे ह्यांस दिली होती. त्यामुळें बाबुराव दाभाडे बायजाबाई-साहेबांचे जांवई होते. त्यांनीं त्यांस दरमहा २५०० रुपयांची तैनात करून देऊन आपल्या दरबारांतील सरदारी सांगितली.

यशवंतरावभाऊः—हे जावद प्रांताचे व मेवाडांतील इतर जिल्ह्यांचे सुभेदार होते. ह्या प्रांतांचा सर्व वसूल पूर्वीं त्यांच्याकडे सोंपविला असून, त्यांत त्यांनीं आपल्या हाताखालील सैन्याचा खर्च भागवावा, असा ठराव होता. यशवंतरावभाऊ हे दौलतराव शिंद्यांचे प्रख्यात सेनापति जिवबा-दादा बक्षी ह्यांचे चिरंजीव होत. ह्यांचे बंधु नारायणराव ह्यांस सर्जेराव घाटग्यांनीं इ. स. १८०० मध्यें तोफेच्या तोंडीं देऊन निर्दयपणानें मारिलें होतें. यशवंतरावभाऊ हे शिंद्यांच्या दरबारांतील पुढारी सरदारांपैकीं एक असून दौलतरावांच्या कारकीर्दींत ह्यांची फार भरभराट असे. ह्यांनीं पेंढारी लोकांस इ. स. १८१७–१८ मध्यें साहाय्य केल्यामुळें व त्यांचें रक्षण केल्यामुळें ह्यांची व बंगालच्या सैन्याचे अधिकारी मेजर जनरल ब्रौन ह्यांची लढाई होऊन ह्यांच्या सैन्याचा फार नाश झाला होता. पुढें इंग्रज सरकारचा व दौलतरावांचा तह होऊन मेवाड प्रांत ग्वाल्हेर संस्थानांतून गेल्यानंतर यशवंतरावभाऊ हे ग्वाल्हेरीस येऊन राहिले. ह्यांची स्वतःची जहागीर ४०,००० हजारांची असून ती बायजाबाईसाहेबांनीं त्यांच्याकडे चालविली. ह्यांस शिंदे सरकारच्या दरबारांत फार मान असून हे त्या वेळच्या मुत्सद्दी मंडळींतील एक अग्रणी होते.

लालाभाऊः—हे दौलतराव शिंद्यांचे प्रसिद्ध सरदार गोपाळराव भाऊ ह्यांचे चिरंजीव होत. शिंदे सरकारांकडून ह्यांस एक लाख रुपयांची जहागीर होती. ह्यांचें वय २५ वर्षांचे असून त्यांच्याकडे

दक्षिणेंतील सातारा जिल्ह्यापैकीं वांकडी व अहमदनगरपैकीं बेलापुर अशीं दोन गांवें इनाम होतीं. ह्यांच्याकडे बायजाबाईसाहेबांच्या दरबारांतील सरदारीचें काम होतें.

फकीरजी गाढवेः—हे सातारा जिल्ह्यांतील वांई गांवचे रहिवासी असून जातीचे धनगर होते. हे प्रथमतः महादजी शिंद्यांचे हाताखालीं १०० स्वारांचे शिलेदार होते. ह्यांनीं इ. स. १७९८ सालीं महादजी शिंद्यांच्या बायकांचें व दौलतरावांचें वैमनस्य होऊन जो दंगा झाला, त्या वेळीं सर्जेराव घाटग्यांस मदत केली; व पुढेंही वेळोवेळीं अनेक साहसाचीं कृत्यें करण्यांत त्यांस साहाय्य केलें. त्यामुळें दौलतरावांची त्यांजवर मेहेरबानी जडून, त्यांस सैन्याच्या एका तुकडीचें स्वतंत्र आधिपत्य मिळालें होतें. ह्यांनीं सर्जेरावांच्या बरोबर जरी कांहीं निर्दयपणाचीं कृत्यें केलीं होतीं, तथापि पुढें गोपाळरावभाऊबरोबर उत्तर हिंदुस्थानांत त्यांनीं शौर्याचीं चांगलीं कामेंही अनेक केलीं. त्यामुळें ह्यांच्या शूरपणाची शिंद्यांच्या दरबारांत प्रसिद्धी होती. बायजाबाईंनीं फकीरजी गाढवे हे आपल्या यजमानाच्या वेळचे जुने सरदार आहेत असें पाहून, त्यांच्याकडे खासपागेपैकीं २०० स्वारांचें आधिपत्य सांगितलें.

उदाजी कुटकेः—हे जातीचे धनगर असून अहमदनगर जिल्ह्यांतील कोळ पिंपळगांवचे राहणारे होत. हे दौलतराव शिंद्यांचे कारकीर्दींतील एक प्रख्यात सरदार होते. ह्यांच्याकडे 'सरनोबत' हा अधिकार असून २००० स्वारांच्या कांटिंजंट फौजेचें आधिपत्य होतें. ही फौज शिंदे सरकारची होती, तथापि तिच्यावर ब्रिटिश अधिकाऱ्यांची देखरेख असे. हे नेहमीं गुणा येथील छावणीमध्यें राहत असत. बायजाबाईसाहेबांनीं ह्यांच्याकडे सरनोबतीचें पद देऊन, पूर्वींप्रमाणेंच कांटिंजंट फौजेचेंही काम सांगितलें.

माधवरावपंत ब्रह्माजीः—हे शिंदे सरकारच्या तोफखान्याचे अधिपति होते. हें काम त्यांच्याकडे इ. स. १८०९ पासून होतें. हे जुने

व प्रामाणिक नौकर असें पाहून बाईसाहेबांनीं तेंच काम त्यांस सांगितलें. दौलतराव शिंदे ह्यांनीं सहा पायदळ पलटणी व त्यांच्या बरोबरच्या २० तोफा ह्यांच्या ताब्यांत दिल्या होत्या, व त्यांच्या खर्चाकरितां स्वतंत्र मुलूख तोडून दिला होता. हे अहमदनगर जिल्ह्यांतील साकुरमांडव्याचे कुळकर्णी होते. परंतु केवळ स्वतःच्या कर्तबगारीनें उदयास चढले. बायजाबाईसाहेबांनीं ह्यांचा पूर्वींचा इतमाम ह्यांच्याकडे तसाच कायम ठेविला.

लक्ष्मणराम विठ्ठलः—हे मूळचे दक्षिणेंतील चांभारगुंडी गांवचे रहिवासी होत. ह्यांचे वडील विठ्ठल महादेव ऊर्फ विठ्ठलपंत तात्या हे दौलतराव शिंद्यांच्या दरबारांत नामांकित मुत्सद्दी होते. ह्यांनींच इ. स. १८०३ सालीं, सर आर्थर वेलस्ली साहेबांबरोबर सुर्जीअंजनगांवचा तह ठरविला होता. ह्यांचें शहाणपण जाणून दौलतराव शिंदे ह्यांनीं त्यांच्याकडे दरबारवकिलीचें काम सोंपविलें होतें. ह्यांचें सर आर्थर वेलस्ली, सर जॉन मालकम इत्यादि युरोपियन मुत्सद्यांवर चांगलें वजन असे.[1] त्यांचे चिरंजीव लक्ष्मणराव विठ्ठल हे होत. ह्यांस बायजाबाईसाहेबांनीं ग्वाल्हेरचे किल्लेदार नेमून, त्यांच्या सैन्याच्या खर्चाकरितां ग्वाल्हेरसभोंवतालचीं ५०।६० गांवें त्यांस जहागीर दिलीं.

---

१ विठ्ठलपंत तात्या हे फार शहाणे व चतुर मुत्सद्दी होते. इंग्रजाकडील लष्करी मंडळींत विनोदानें ह्यांचें टोपण नांव "Old Brag" (ह्यातारा बढाईखोर) असें पडलें होतें. ह्या संबंधानें के साहेबांनीं मालकमसाहेबांच्या चरित्रांत एक आख्यायिका दिली आहे. ती फार मौजेची व वाचनीय आहे. ती येणेंप्रमाणें:—

"He was a man far advanced in years, but of unbroken energy, and formed both by nature and habit for diplomatic address. His self-command was wonderful. He had a sour supercilious, inflexible countenance, in which no penetration could ever discern a glimpse of feeling. He wore, indeed, an

रामराव फाळकेः—हे वांईप्रांतांतील जुने मराठे सरदार ग्वाल्हेर दरबारीं होते. बायजाबाईसाहेबांनीं ह्यांच्या हाताखालीं ४०० शिलेदार स्वार देऊन त्यांचें आधिपत्य त्यांस सांगितलें.

मणीराम शेटः—शिंद्यांच्या राज्यामध्यें मुख्य फडणीस गोकुळ पारख ह्मणून एक धनाढ्य पेढीवाला होता. तो इ. स. १८२७ सालीं मृत्यु पावला. तेव्हां त्याचें काम बायजाबाईनीं जयपुरचे रहिवासी मणीराम शेट ह्यांजकडे सांगितलें. हे पूर्वीं अगदीं गरीब स्थितींत होते. परंतु पुढें इतके द्रव्यसंपन्न झाले कीं, शिंद्यांच्या लष्करांत त्यांची बरोबरी कोणाच्यानेंही करवेना. ह्यांचें सर्व सावकारांवर व पेढीवाल्यांवर अतिशय वजन असून त्यांची सल्लामसलत घेतल्यावांचून सरकारास एक रुपयाही कोणी कर्ज देत नसे. ह्यांची पेढी "मणीराम आणि लखमीचंद" ह्या नांवानें त्या वेळीं प्रसिद्ध असे.

दाजीबा पोतनीसः—शिंदे सरकारच्या राज्यांतील मुख्य पोतनिशीचें काम ह्या गृहस्थाकडे होतें. हे दौलतराव शिंद्यांच्या कारकीर्दींत स्वामिनिष्ठ व प्रामाणिक सेवक ह्मणून प्रसिद्ध होते. बायजाबाईनींही आपल्या कारकीर्दींत तेंच काम त्यांच्याकडे सोंपविलें. ह्यांचे बंधु कृष्णराव ह्यांच्याकडे हा हुद्दा महादजी शिंद्यांचे वेळेपासून होता. परंतु

impenetrable mask. The most startling demand or the most unexpected concession was alike received without the motion of a muscle. Malcolm said of him that he never saw a man with such a face for the game of *Brag*. From that time Wittal Pant was known by the name of "Old Brag" in the British camp. And years afterwards, when Malcolm met General Wellesly, then the Duke of Wellington, in Europe, and the conversation one day turned upon the characters of the great men of France, the latter, when questioned regarding Tallyrand, replied that he was a good deal like "Old Brag"–but not so clever."

—*Malcolm's Life by Kaye. Vol. II. Page* 241.

कृष्णरावांचे पश्चात् त्यांचे चिरंजीव अमृतराव हे अज्ञान व अल्पवयी असल्यामुळें दाजीबा हेच सर्व काम पाहत असत.

आत्माराम शिवरामबाबा वांकडेः—ह्यांचे पूर्वज लक्ष्मणराव वांकडे हे पुण्याचे रहिवासी असून, महादजी शिंदे ह्यांचे बरोबर उत्तर हिंदुस्थानांत आले होते. ह्यांच्याकडे प्रथम पोतनिशीचें काम होतें. पुढें कांहीं कारणामुळें ते त्या कामावरून दूर झाले. त्यांचे पश्चात् दौलतराव शिंदे ह्यांनीं तात्या पागनीस ह्यांजकडे तें काम सांगितलें. ते मृत्यु पावल्यानंतर लक्ष्मणराव ह्यांचे नातू आत्मारामपंत ह्यांस तें काम सांगितलें. दोन वर्षेंपर्यंत तें काम त्यांनीं उत्तम रीतीनें बजावल्यामुळें सर्जेराव घाटगे ह्यांची त्यांजवर फार मेहेरबानी जडली, व त्यांनीं त्यांस खासगी दिवाण नेमिलें. पुढें सर्जेराव इ. स. १८१० सालीं मृत्यु पावल्यानंतर कांहीं दिवस ते स्वस्थ होते. परंतु ते चतुर व दूरदर्शी मुत्सद्दी असल्यामुळें दौलतराव शिंद्यांची त्यांच्यावर पुनः कृपा जडली, व त्यांच्या दरबारामध्यें त्यांचा पगडा बसला. दौलतरावांच्या पश्चात् बायजाबाईसाहेबांनीं त्यांस आपले खासगी दिवाण नेमिलें. ते बायजाबाईसाहेबांच्या दरबारांत आत्माराम पंडित ह्या नांवानें प्रसिद्धीस आले.

कर्नल जेकबः—हा आर्मीनिया प्रांतांतील मूळचा राहणारा इसम स्वपराक्रमानें दौलतराव शिंदे ह्यांच्या पदरीं योग्यतेस चढला. ह्याच्याकडे १३ पायदळ पलटणी, ४०० घोडेस्वार, व एकंदर ५२ तोफा होत्या. ह्या सैन्याची व्यवस्था त्यानें फार चांगली ठेविली होती व त्याचा पगार वगैरे वेळच्यावेळीं तो देत असे. त्याबद्दल कर्नल जेकब ह्यांस स्वतंत्र प्रांत तोडून दिला होता. बायजाबाईसाहेबांनीं दौलतराव शिंदे ह्यांच्या व्यवस्थेंत कांहीं फेरफार न करितां, कर्नल जेकब ह्याजकडे पूर्वींप्रमाणें जायदाद व अधिकार कायम ठेविले.

कर्नल जॉन बॅप्टिस्ट फिलोजः—हा शिंदे सरकारच्या दरबारामध्यें "जॉन बत्तीस" ह्या नांवानें प्रसिद्ध आहे. हा जातीचा फराशीस होता. ह्यानें दौलतराव शिंद्यांचे कारकीर्दींत अनेक लढाया मारून फार प्राबल्य मिळविलें होतें. हा शूर, धाडशी व प्रसंगावधानी असल्यामुळें ह्याची शिंद्यांच्या दरबारांत बरीच छाप बसली होती. ह्यानें केरोली, चंदेरी, राघोगड, बहादुरगड, लोहपाड वगैरे ठिकाणच्या रजपूत व बुंदेले राजांवर स्वाऱ्या करून व त्यांना जेरीस आणून, त्यांचा प्रांत काबीज केला होता. परंतु हा इसम स्वार्थसाधु असल्यामुळें दौलतराव शिंद्यांची ह्याजवर गैरमर्जी झाली; व त्यांनीं त्यास इ. स. १८१७ मध्यें ग्वाल्हेरीस आणून सक्त नजरकैदेंत ठेविलें होतें. पुढें ह्यानें, दौलतरावांचे मुख्य खजानची किंवा फडणीस गोकुळ पारख ह्यांजकडे संधान लावून, इ. स. १८२५ सालीं आपली सुटका करून घेतली. तेव्हांपासून हा धाडशी व महत्वाकांक्षी सरदार मोकळाच होता. बायजाबाईसाहेबांनीं ह्यास मोकळा ठेवून उपयोगी नाहीं असें मनांत आणून, त्यास दरबारांत हजर राहण्याची परवानगी दिली, व सैन्याच्या एका छोट्या पथकाचा अधिकार दिला. ह्या पुरुषानें पुढें ग्वाल्हेर दरबारांतील राजकारणांत चांगलाच प्रवेश केला व तेथें वर्चस्व संपादन केलें.

मेजर जोसेफ आलेक्झांडरः—ह्यास "जोशी शिकंदर" किंवा "सवाई शिकंदर" असें ह्मणत. हा पूर्वीं जान बत्तिसाच्या सैन्यामध्यें एक लहानसा सेनाधिकारी होता. परंतु जान बत्तीस ह्याजवर मध्यंतरीं दौलतराव शिंदे ह्यांची इतराजी झाली व त्याचें सेनाधिपत्य त्यांनीं काढून घेतलें, त्या वेळीं ह्यास सर्व कंपूंचें आधिपत्य देण्यांत आलें. तें त्याजकडे पुष्कळ वर्षें होतें. पुढें इ. स. १८२१ सालीं, बुंदेलखंडांतील एका राजाचें व जोशी शिकंदर ह्याचें भांडण झालें. त्या वेळीं ब्रिटिश सरकार मध्यें पडून त्यांनीं शिंदे सरकाराकडून त्यास ग्वाल्हेरीस परत बोला-

विलें; व त्यास खुद्द ग्वाल्हेर येथें ठेवविलें. ह्याच्या ताब्यांत दोन जंगी कंपू आणि दोनशें घोडेस्वार असत. बायजाबाईसाहेबांनीं त्याच्याकडे तेवढेंच सैन्य ठेविलें.

बायजाबाईसाहेब ह्यांनीं ह्या सर्व मुत्सद्यांच्या व सरदारांच्या साहाय्यानें ग्वाल्हेरचा राज्यकारभार पाहण्यास आरंभ केला. त्यांनीं राज्यसूत्रें हातीं घेतलीं नाहींत तोंच त्यांच्या पुढें दोन महत्त्वाचे राजकीय प्रश्न उपस्थित झाले. महाराज दौलतराव शिंदे हे मृत्यु पावल्यानंतर त्यांच्या पश्चात् ग्वाल्हेरची राज्यव्यवस्था पाहण्यास ब्रिटिश सरकारानें बायजाबाईसाहेब यांस पूर्ण मोकळीक दिली. परंतु त्यांनीं दक्षिणेंतील शिंद्यांच्या ताब्यांतील गांव जे दौलतरावांच्या हयातीपर्यंत त्यांजकडे चालविले होते, ते सोडून देण्याबद्दल बायजाबाईसाहेब ह्यांचे जवळ बोलणें लाविलें, व कांटिंजंट फौजेच्या खर्चाची तजवीज करण्याबद्दल तगादा लाविला. ह्या दोन्ही प्रश्नांचा समाधानकारक निकाल करणें फार कठीण होतें. ज्या वेळीं इ. स. १८०३ सालीं सुर्जीअंजनगांव येथें तह झाला, त्या वेळीं असें ठरलें होतें कीं, शिंद्यांच्या घराण्याकडे पूर्वापार चालत आलेले जे इनाम गांव व बाबती व सरदेशमुखीचे हक्क आहेत, ते कायम ठेवून, बाकीचे गांव इंग्रजांच्या स्वाधीन करावेत. परंतु पुढें ह्या इनाम गांवांबद्दल वाद उपस्थित झाला. तहाच्या इंग्रजी कागदांतील कलमांत, “इनाम” ह्या शब्दाचा उल्लेख न करितां फक्त “शिंद्याकडे चालत आलेले गांव” असेंच ह्मटलें होतें. त्यावरून शिंद्यांच्या तांब्यांतील कोणते गांव सोडावे व कोणते न सोडावे ह्याबद्दल वाद उत्पन्न झाला. अखेर ह्या संदिग्ध प्रश्नाचा इ. स. १८२२ मध्यें असा निकाल झाला कीं, दौलतराव शिंदे जोंपर्यंत हयात आहेत, तोंपर्यंत त्यांच्या ताब्यांत असलेले सर्व गांव त्यांजकडे चालवावे व त्यांचे पश्चात् त्यांचे खासगत इनाम गांव खेरीजकरून, बाकी सर्व गांव खालसा करावेत.

त्याप्रमाणें दौलतराव शिंदे वारल्यामुळें त्यांचे पश्चात् दक्षिणेंतील गांव खालसा करण्याबद्दल हिंदुस्थान सरकारचा ता. २४ मार्च इ. स. १८२८ रोजीं नवीन ठराव होऊन आला. तो ग्वाल्हेरचे रेसिडेंट मेजर स्टुअर्ट ह्यांनीं बायजाबाईसाहेब ह्यांस सादर केला. सुर्जीअंजनगांवच्या तहामध्यें इनाम गांवांची यादी बरोबर न देतां, अदमासानें कांहीं तरी नांवें दिलीं होतीं; त्या चुकीचा परिणाम आतां भोगण्याचा प्रसंग आला. बायजाबाईसाहेब ह्यांस शिंद्यांच्या घराण्याकडे फार दिवस चालत आलेले गांव सोडून देऊन दक्षिणेंतील आपला संबंध नाहींसा करणें इष्ट वाटेना. तेव्हां त्यांनीं रेसिडेंट-मार्फत अनेक तडजोडी करण्याचे प्रयत्न केले. परंतु, इंग्रज सरकारास राज-कीयदृष्ट्या शिंद्यांचा संबंध सातपुड्याच्या पलीकडे दक्षिणेंतील गांवांवर असणें बरोबर वाटत नसल्यामुळें त्यांनीं तीं गांवें आपल्या ताब्यांत घेण्याचा आग्रह धरिला. अर्थात् सार्वभौम प्रभूचा विशेष आग्रह पडल्यामुळें बायजाबाईसाहेबांस दक्षिणेंतील ८९$\frac{१}{२}$ गांव इंग्रजांच्या ताब्यांत देणें भाग पडलें. त्याप्रमाणें त्यांनीं आनंदराव दत्तात्रय कमाविसदार ठाणें जामगांव ह्यांस गांवें सोडण्याबद्दल सनद पाठविली. ती येणेंप्रमाणें:—

"राजश्री आनंदराव दत्तात्रय कमाविसदार ठाणें जामगांव:—

स्नेहांकित बायजाबाई शिंदे दंडवत सु॥ तिस्सा अशरीन मयातैन व अलफ. सुर्जेअंजनगांवचे मुक्कामीं कंपनी इंग्रजबहादूर यांचा व आपला तहनामा झाला. त्यांत आठवे कलमांत, दक्षणचे रुखेशीं श्रीमंत पेशवेसाहेब ह्यांचे मुलुकांत, आपले पिढीदरपिढीपासून कितेक परगणे व तालुके व गांव सुदामत वडिलोपार्जित चालत आले, त्याप्रमाणें चालावे असा करार ठरला असतां, तहनामा करावयाचे समयीं कागद पत्राचा दाखला, वहिवाटीस तालुके व परगणे व फुटकर देहें चालत आहेत त्यांचा न पाहतां, गैरमाहितीनें जबानीवरून, परगणे व तालुके व देहें लिहिलें; त्यांत सुदामतपासून वहिवाट चालत आली

त्याप्रमाणें तालुके व देहें लिहिले गेले नाहींत. परंतु त्यांची वहिवाट आजपर्यंत आपल्याकडे चालत आली असतां, तहनाम्याखेरीज साडे-एकूणनव्वद देहें सोडून देण्याविषयीं कंपनी इंग्रजबहादूर यांचें ह्मणणें पडलें. सबब * * * * * साडेएकूणनव्वद देहें खालसा व दुमाला मिळून आहेत ते सोडून कंपनी इंग्रजबहादूर यांजकडे द्यावयाचें ठरलें. त्याजवरून ही सनद तुह्मांस सादर केली असे. तरी सदर्हू साडेएकूण-नव्वद देहें कंपनी इंग्रजबहादूर यांजला लिहून, अंमलदार यांचे स्वाधीन, सरदेशमुख्या व पाटीलक्या व मोकदम्या व नावघाट वगैरे वतनबाब खेरीजकरून देणें. साहेबबहादूर यांजकडील अंमलदार सदर्हू गांवीं अंमल करतील. तुह्मीं दखलगिरी न करणें. जाणीजे. छ. २४ रबिलाखर हे विनंति. (मोर्तबसुद)"

ह्याप्रमाणें दक्षिणेंतील गांवें इंग्रजांच्या ताब्यांत देऊन एका प्रश्नाचा निकाल लागला. परंतु दुसरा ब्रिटिश सरकारच्या कांटिंजंट फौजेच्या खर्चाचा प्रश्न तसाच राहिला. महाराज दौलतराव शिंदे मृत्यु पावल्यामुळें त्यांना ब्रिटिश सरकाराकडून जें चार लक्ष रुपये पेनशन मिळत असे, तें बंद झालें. तें त्यांनीं कांटिंजंट फौजेच्या खर्चाकरितां लावून दिलें होतें. अर्थात् तें कमी झाल्यामुळें बायजाबाईसाहेबांच्या दोन लक्ष पेनशनानें व रजपूत संस्थानाकडील खंडणीनें ती रक्कम भरून येईना.

| | |
|---|---|
| बायजाबाईसाहेबांचें पेनशन,... ... ... | २,००,००० |
| खंडणी संस्थान कोटा, .... ... .... .... | १,०२,४३० |
| ,, ,, ,, कोट्री .... .... .... | १०,६१० |
| ,, ,, ,, जयपूर... .... ... .... | १,००,००० |
| ,, ,, ,, रतलाम व सेलना.... ... | १,१२,१४० |

१ ही अस्सल पत्राची नक्कल असून, ती आमचे मित्र कै. रा. रा. वामनराव लेले वकील राहणार पुणें ह्यांच्या दप्तरांतून आह्मांस उपलब्ध झाली आहे.

वसूल प्रांत गढाकोटा व मलठण .... ... ७०,०००
" " " येवलें व चोपडें .... .... ७३,५६०

मिळून ६,६८,७४० रुपये व आणखी कांहीं किरकोळ बाबींचे ६,९५६ रुपये, मिळून एकंदर ६,७५,६९६ रुपये पावत असत. परंतु तेवढ्यानें फौजेचा खर्च ७,०९,२२४ रुपये भरून न येतां, ३३,५२८ रुपये तूट पडूं लागली. शिवाय बायजाबाईसाहेबांचें पेनशन तहाहयात असल्यामुळें त्यानें कायमच्या खर्चाची व्यवस्था होणार नाहीं, अशीही तक्रार उपस्थित झाली. तेव्हां उभय पक्षीं बरीच वाटाघाट होऊन बायजाबाईसाहेबांनीं ८० लक्ष रुपये सरकारास कर्जाऊ द्यावे व त्याच्या व्याजांतून ह्या फौजेचा खर्च भागवावा असें ठरलें. ह्याप्रमाणें बायजाबाईसाहेबांस राज्याधिकार आपल्या ताब्यांत ठेवण्यास, अप्रत्यक्ष रीतीने, सार्वभौम सरकारास, द्रव्यद्वारें खूष करणें भाग पडलें.

कंपनी सरकारची भानगड संपल्यानंतर बायजाबाईसाहेबांनीं ग्वाल्हेरच्या राज्यकारभारांत आपलें लक्ष्य चांगल्या रीतीनें घातलें. त्यांची एकंदर कारकीर्द इ. स. १८२७ पासून इ. स. १८३३ पर्यंत सरासरी साहा वर्षेंच चालली; परंतु तेवढ्या अवधीमध्यें त्यांनीं मोठ्या दक्षतेनें व शहाणपणानें राज्यकारभार चालविला, आणि मराठ्यांच्या स्त्रिया राज्यकारभार चालविण्यास किती समर्थ असतात हें सर्व जगास महशूर केलें. ह्यांचे मुख्य दिवाण बापूजी रघुनाथ हे इ. स. १८२८ सालीं धारचा कारभार पाहण्याकरितां तिकडे निघून गेले. त्या वेळीं त्यांनीं इंदूरचे प्रख्यात मुत्सद्दी तात्या जोग ह्यांच्या शिक्षणानें राजकारणांत पूर्ण वाकबगार बनलेले गृहस्थ रावजी त्रिंबक चांदवडकर ह्यांस ग्वाल्हेरीस नेऊन, त्यांस आपल्या दिवाणगिरीचीं वस्त्रें दिलीं. रावजी त्रिंबक ह्यांचा नामनिर्देश सर जॉन मालकम ह्यांच्या इतिहासांत आला असून, हे गृहस्थ ग्वाल्हेर दरबारांत पुढें फार प्रसिद्धीस

आले. ह्यांच्या मदतीनें बायजाबाईसाहेबांनीं राज्यांत अनेक सुधारणा केल्या व प्रजेस फार सुख दिलें. बाईसाहेबांच्या कारकीर्दीचे अस्सल कागदपत्र अद्यापि उपलब्ध झाले नसल्यामुळें त्यांच्या राज्यकारभाराची सविस्तर हकीकत देतां येत नाहीं. तथापि जी त्रोटक माहिती मिळाली आहे, तेवढ्यावरून बायजाबाईसाहेबांच्या कारकीर्दींत ग्वाल्हेर संस्थानांत ज्या सुधारणा झाल्या, त्यांचा संक्षिप्त उल्लेख करण्यास हरकत नाहीं.

बायजाबाईसाहेबांच्या कारकीर्दींत देशामध्यें बरीच शांतता झाली. त्या वेळची देशस्थिति सांप्रतच्या देशस्थितीहून फार भिन्न होती. त्या वेळीं प्रत्यक्ष रणभूमीवर अनेक पराक्रम गाजविलेलें व युद्धाकरितां आणि लुटीकरितां सदैव उत्सुक असलेलें सैन्य फार होतें. त्यास आपल्या ताब्यांत ठेवून त्याच्याकडून प्रांताचा बंदोबस्त करविणें व परचक्रापासून आणि चोरलुटारूंपासून प्रजेचें रक्षण करणें हीं दोन्हीं कामें युक्तीनें करावयास पाहिजे होतीं. तीं बाईसाहेबांनीं, जनकोजीराव ह्यांचा विरुद्ध पक्ष उत्पन्न होईपर्यंत, चांगल्या रीतीनें केलीं. महाराज दौलतराव शिंदे मृत्यु पावले, त्या वेळीं ब्रिटिश कांटिंजंट व किल्ल्यांवरचें सैन्य खेरीजकरून, १४,००० पायदळ, १०,००० घोडेस्वार, आणि २५० तोफा होत्या. एवढ्या मोठ्या सैन्याचा बंदोबस्त करणें फार कठीण काम होतें. बाईसाहेबांनीं हें सैन्य चांगल्या स्थितींत ठेवून व त्याचे निरनिराळे कंपू करून, त्यांच्यावर स्वतंत्र अधिकारी नेमिले. कर्नल स्लीमन ह्यांनीं इ. स. १८३३ मध्यें–ह्मणजे बायजाबाईसाहेबांच्या कारकीर्दीच्या अखेरीस, शिंद्यांच्या फौजेचे २५ कंपू असून, त्यांपैकीं ३ कर्नल आलेक्झांडर, ६ आपाजी खंडेराव, ११ कर्नल जेकब, आणि ५ कर्नल फिलोज ह्यांच्या ताब्यामध्यें होते, असें लिहिलें आहे.

बाईसाहेबांनीं सैन्याची व्यवस्था करून आपल्या राज्यांतील पेंढारी व ठग लोक ह्यांचें निर्मूलन करण्याचा प्रयत्न केला. सर जॉन मालकम ह्यांनीं

इ. स. १८१८ सालीं पेंढाऱ्यांचे पुढारी पकडून त्यांचें बंड मोडून टाकिलें होतें; परंतु त्यांचा अवशेष राहिलेला भाग ग्वाल्हेर संस्थानच्या सरहद्दीवर लपून छपून अद्यापि हल्ले करीत असे व संस्थानच्या प्रजेस फार त्रास देत असे. त्याचप्रमाणें, नीचतम व कपटपटु ठग लोक हे आपल्या अधमपणाच्या घातकी व निर्दय कृतींनीं प्रजेस अत्यंत पीडा देत असत. ह्या सर्वांचा शोध लावून व पाठलाग करून त्यांचें पारिपत्य करणें फार आवश्यक होतें. त्या कामीं ब्रिटिश राज्यांतील कर्नल स्लीमन, कर्नल म्याक्लौड वगैरे मोठमोठे अधिकारी, सर्व संस्थानांतील पोलिटिकल एजंटांचें साहाय्य घेऊन, एकसारखे झटत होते. बायजाबाईसाहेबांनीं त्यांस उत्तम प्रकारची मदत करून, स्वतंत्र रीतीनें व त्यांच्या साहाय्यानें, ह्या दुष्ट लोकांचा नाश करण्याचा प्रयत्न केला. ठग लोकांस ग्वाल्हेर संस्थानचे नौकर लोक देखील पुष्कळ अनुकूल होते; परंतु बायजाबाईसाहेबांनीं आपले सरसुभे नारायणराव ह्यांस सक्त ताकीद करून, कर्नल म्याक्लौड ह्यांस चांगली मदत देवविली; व स्वतःच्या राज्यांतील ठगांचा मागमूस काढवून त्यांस कडक शिक्षा दिल्या.[1]

---

[1] ठग लोकांचें बंड मोडण्याचे कामीं बायजाबाईसाहेब ह्यांनीं मदत केली अशाबद्दल कर्नल हर्वे ह्यांच्या इ.स.१८६६सालच्या रिपोर्टांत पुढील उल्लेख सांपडतो:—

"In 1833, when Mr. F. D. Macleod, Assistant General Superintendent, had visited Gwalior, he reported to the Agent to the Governor-General, that during his entire stay in that territory he experienced the greatest attention, and that great willingness to co-operate with the measures of the British Government was displayed by Her Highness the Baiza Bai and by her Suba, Narayan Rao, who was the principal organ of communication with him; also that he had no occasion to apply for assistance which was not promptly afforded. ... ... ... ... Gwalior Durbar may be considered to have lent its co-operation in our measures from the period of Mr. Macleod's visit to Gwalior, viz. 1833."

*The Sovereign Princes and Chiefs of Central India. Vol. I.*

ह्याचप्रमाणें बायजाबाईसाहेबांनीं ग्वाल्हेर संस्थानांत मक्त्याच्या मामलतीची जी चाल होती, ती बंद करण्याबद्दल प्रयत्न केला. मक्त्याच्या मामलतीच्या योगानें, अंमलदार लोक, सरकारची व आपली तुंबडी भरण्याकरितां, प्रजेकडून जुलमानें वाटेल तसें द्रव्य काढितात. त्यामुळें प्रजा अगदीं जिकीरीस येऊन त्राणरहित होते. ह्या कारणास्तव तादृश फायद्याकडे लक्ष्य न देतां, प्रजेच्या हिताकडे लक्ष्य देऊन, ही चाल मोडून टाकण्याचा स्तुत्य प्रयत्न दिवाण रावजी त्रिंबक ह्यांनीं सुरू केला. व त्याप्रमाणें त्यांनीं दोन वर्षें अंमलबजावणी केली[१]. त्या योगानें लवकरच ग्वाल्हेर संस्थानची प्रजा सुखी होऊन वसुलाची स्थिति सुधारेल, अशी आशा उत्पन्न झाली. परंतु दुर्दैवानें रावजी त्रिंबक हेच ता. २६ जानेवारी इ. स. १८३३ रोजीं मृत्यु पावले. त्यामुळें बायजाबाईसाहेबांचा उजवा हात मोडल्यासारखें होऊन त्यांस फार दुःख झालें. रावजी त्रिंबक हे प्रामाणिक व शहाणे

---

१. रावजी त्रिंबक ह्यांनीं ही मक्त्याच्या मामलतीची चाल बंद करून वसुलाची सुधारणा केली, अशाबद्दलचा उल्लेख त्यावेळच्या "Mofussil Ukhbar" नामक पत्रांत प्रसिद्ध झालेला आहे:—

"* * * Raoji Trimbak, the minister, has, during the last two years, endeavoured to do away with the system of farming the land revenue; and though the immediate loss from the inefficiency or misconduct of the *aumils* would seem to have been considerable, yet as the system of amani management, under common superintendence, contains within itself the seeds of certain improvement to the country, we may, if it be preserved in, yet expect to see even the most distant districts assume a more flourishing aspect. It is a fine country, and under proper fiscal management, might be expected to yield a revenue of a million and a half of money."

मुत्सद्दी असून, त्यांनीं ग्वाल्हेरच्या राज्यकारभारांत बायजाबाईसाहेबांस उत्कृष्ट मदत केली होती. त्यांचें मृत्युवृत्त विलायतेंतील "एशियाटिक जर्नल" मध्यें छापलें असून, त्यांत रावजी त्रिंबक ह्यांच्या मृत्यूनें ग्वाल्हेर दरबारांतील एका कर्तव्यदक्ष आणि राजकारणपटु प्रधानाची जागा रिकामी झाली, व ती पुनः सहज रीतीनें भरून येणें कठीण आहे असें ह्मटलें[१] होतें. ह्यावरून रावजी त्रिंबक ह्यांची योग्यता व्यक्त होते. रावजी त्रिंबक हे मोठे स्वधर्मनिष्ठ व दानशूर गृहस्थ होते. ह्यांनीं काशी वगैरे ठिकाणीं घाट व देवालयें बांधलीं आहेत.

रावजी त्रिंबक मृत्यु पावल्यानंतर कांहीं दिवस, बायजाबाईनीं कोणासही दिवाण न नेमितां, आपण स्वतः राज्यकारभार चालविला. परंतु पुढें त्यांनीं सखो शामजी व दादा खासगीवाले ह्या उभयतांस राज्यकारभार पाहण्यास सांगितलें. परंतु थोड्याच दिवसांत जनकोजी शिंदे ह्यांचा व त्यांचा उघडपणें बेबनाव होऊन, दरबारी लोकांत दुफळी झाली; व जनकोजीरावांचा पक्ष प्रबल होऊन बायजाबाईसाहेब ह्यांस ग्वाल्हेरचीं राज्यसूत्रें सोडून देणें भाग पडलें. ह्या राज्यक्रांतीची हकीकत पुढील स्वतंत्र भागांत सादर केली आहे.

बायजाबाईसाहेब ह्यांच्या राज्यकारभाराची विस्तृत माहिती उपलब्ध नसल्यामुळें आह्मांस ती सादर करितां येत नाहीं. तथापि त्यांच्या अंगीं राज्यसूत्रें चालविण्याची चांगली शक्ति होती, हें निर्विवाद सिद्ध आहे. ग्वाल्हेरच्या एका एतद्देशीय इतिहासकारानें, "बायजाबाई राज्यकारभारांत बहुत दक्ष व शहाणी असे, व दरबारी लोकांवर हिचा दरारा

---

१ "Raoji Trimbak, the Karbhari of the Gwalior Court, died on 26th January A. D. 1833. His loss as a zealous and able minister will not, it is feared, be easily replaced."

—*Asiatic Journal 1833*.

विशेष असे" असें वर्णन केलें आहे; एवढेंच नव्हे, तर खुद्द ग्वाल्हेर येथील रेसिडेंट व इतर युरोपियन लोक ह्यांनींही त्यांच्या राज्यकारभाराची प्रशंसा केली आहे. ता. १ जुलई इ. स. १८३२ ह्या तारखेच्या "इंडिया ग्याझेट" पत्रामध्यें "रीजंट बाई (बायजाबाईसाहेब) ह्या संस्थानचा राज्यकारभार फार नियमितपणानें चालवीत आहेत. एवढेंच नव्हे, तर कै० महाराज दौलतराव ह्यांच्या कारकीर्दीपेक्षांही तो अधिक चांगल्या रीतीनें चालला आहे" असा स्तुतिपर लेख प्रसिद्ध झालेला दृष्टीस पडतो. "ब्रिटिश हिंदुस्थानच्या इतिहासाचे" कर्ते मिल्लसाहेब ह्यांनीं बायजाबाईविषयीं असें मत दिलें आहे कीं, "ती फार तेजस्वी व सत्वशील बायको असून, तिचें वर्तन सभ्य प्रकारचें होतें. तिच्या अंगांत राज्यकर्तृत्व कमी होतें असें नाहीं. तथापि तिच्याकडून आप्तस्वकीयांसंबंधानें अयोग्य पक्षपात क्वचित् घडून येई; आणि लोभाच्या भरांत ती संस्थानाच्या कारखान्यांचें नुकसान करून खाजगी द्रव्यसंचय करण्यास उत्सुक असे. ती स्वभावानें कडक होती, तथापि क्रूर किंवा खुनशी नव्हती. तिच्या कारकीर्दीमध्यें ग्वाल्हेरचा राज्यकारभार, इतर कोणत्याही संस्थानाच्या बरोबरीनें असा, चांगल्या रीतीनें चालला होता." मिल्लसाहेबांनीं बायजाबाईसाहेबांचे गुण व दोष दोन्ही व्यक्त केले

---

१ रा. फडकेकृत शिंद्यांचा इतिहास.

२. "The Regent Baee conducts the affairs of this state with great regularity, much better, I understand, than what was done in the time of the late Maharaja."

—*India Gazette, 1st July 1832.*

३. "She was a woman of high spirit, and respectable conduct, not destitute of ability to govern, but disposed to the injudicious partiality to her own kin, and greedy in accumulating private wealth at the expense of public establishments. She was violent in temper, but not cruel or vindictive and during her administration the affairs of Gwalior were conducted with as much efficiency as those of any other native principality."

—*Mill's History. Page 292.*

Baiza Bae

आहेत. तथापि त्यांच्या तेजस्वितेविषयीं व राज्यकर्तृत्वाविषयीं त्यांचा मतभेद नाहीं. स्वकीयांविषयीं पक्षपातबुद्धि किंवा द्रव्यसंग्रहाची इच्छा ह्या दोन गोष्टी बायजाबाईसारख्या स्त्रीच्या ठिकाणीं असल्यास नवल नाहीं; परंतु राज्यकारभार चालविण्याचें ज्ञान असणें हीच विशेष महत्त्वाची गोष्ट होय. "मुंबई ग्याझेट" पत्रकारांनीं इ.स. १८३३ सालीं ग्वाल्हेर येथील राज्यक्रांतीबद्दल लिहितांना असें ह्मटलें आहे कीं, "महाराज शिंदे ह्यांनीं आपल्या पश्चात् आपल्या बायकोनें आमरण राज्यकारभार चालवावा अशी इच्छा आपल्या मृत्युसमयीं प्रदर्शित केली होती, व ती सिद्धीस नेणें ब्रिटिश सरकारास एकप्रकारें अगत्याचें होतें. त्याप्रमाणें बायजाबाईनीं आजपर्यंत राज्यकारभार उत्तम रीतीनें चालवून, आपल्या यजमानांचा भरंवसा किती यथायोग्य होता हें सिद्ध करून दाखविलें. त्यांनीं आपल्या शांत व सुखकर कारकीर्दीमध्यें देशाची अंतर्सुधारणा करण्यांत व प्रजेच्या सुखाची अभिवृद्धि करण्यांत अतिशय परिश्रम घेतले...... ...ह्या महाराणी आपल्या प्रजेला सौम्य व सदयवृत्ति वाटत. त्यांचा कल, वयाच्या मानानें व जात्या, शांतता राखण्याकडे असे, आणि कृतज्ञता व स्वहित ह्या दोन्ही दृष्टीनीं त्या इंग्रजसरकाराशीं सलोखा राखीत." ह्याप्रमाणें बायजाबाईसाहेबांच्या राज्यकारभाराविषयीं त्या

---

१. "It was the dying wish of the Scindiah, to the fulfilment of which the British Government was in a manner pledged, that his widow should continue regent till her death; and the manner in which she has hitherto performed the duties of that office is such as must justify the confidence reposed in her by that prince. During a long and peaceful reign, she has directed her energies to the internal improvement of her country and the happiness of her subjects. ......In the Ranee Regent they had a mild and friendly princess, attached to peace alike from inclination and age, and bound to the British from gratitude and interest..."

वेळचें लोकमत अनुकूल असल्याचें दिसून येतें, व त्यावरून ही राजस्त्री सामान्य प्रतीची नसून, राज्यकार्यकुशल व शहाणी होती असें निःसंशय सिद्ध होतें. खऱ्या इतिहासाच्या अभावीं ह्या स्त्रीच्या महत्त्वाच्या राजकारणांचा वृत्तांत किंवा बुद्धिचातुर्याच्या गोष्टी आह्मांस येथें सादर करितां येत नाहींत. तथापि, ह्या स्त्रीनें आपल्या लोकोत्तर गुणांनीं आपलें नांव कीर्तिमंदिरांत प्रविष्ट केलें आहे ह्यांत शंका नाहीं. हिंदुस्थानच्या इतिहासांत रेझियाबेगम, चांदबिबी, ताराबाई, अहल्याबाई हीं स्त्रीरत्नें ज्याप्रमाणें चमकत आहेत, त्याचप्रमाणें बायजाबाई शिंदे ह्यांचेंही नांव अखंड चमकत राहील.





## भाग ६ वा.

# बायजाबाईसाहेब व महाराज जनकोजीराव ह्यांचा बेबनाव.

संस्थानामध्यें कलह उत्पन्न होण्यास विशेषेंकरून राजाचे दुर्गुण व कुसंगति हीं बहुधा कारण असतात. मग त्यांत कित्येक स्वार्थसाधु व कपटपटु लोकांच्या नीच कृतींची भर पडून, त्या कलहाग्नीच्या ज्वाळा अतिशय जोरानें पेट घेतात; आणि लवकरच संस्थानाची राखरांगोळी करितात. महाराज जनकोजीराव व बायजाबाईसाहेब ह्यांच्यामध्यें जो विग्रह उत्पन्न झाला, त्याचें कारण महाराजांची अल्पबुद्धि व दुर्जनसंगति हींच होत. महाराजांचें दत्तविधान होऊन त्यांस इ.स. १८२७ सालीं गादीवर बसविलें, त्या वेळीं त्यांचें वय अवघें ११ वर्षांचें होतें. अर्थात् इतक्या अल्पवयी मुलाच्या हातीं अधिकार देणें अगदीं अयोग्य व शास्त्रदृष्ट्या देखील अप्रयोजक होतें, हें कोणीही सुज्ञ मनुष्य कबूल करील. बायजाबाईसाहेब ह्यांनीं महाराज अल्पवयी असल्यामुळें रीतीप्रमाणें संस्थानाचा राज्यकारभार आपण स्वतः उत्तम प्रकारें चालविला, व महाराज वयांत येईपर्यंत तो तसाच चालवावा अशी त्यांची इच्छा असणें साहजिक आहे. परंतु महाराज गादीवर बसून दोन तीन वर्षें झालीं नाहींत, तोंच दरबारच्या स्वार्थसाधु मंडळीच्या चिथावणीनें ह्मणा, किंवा अन्य कांहीं कारणांमुळें ह्मणा, महाराज जनकोजीराव ह्यांचें वर्तन बायजाबाईसाहेबांस असह्य व अपमानकारक वाटूं लागलें, व त्यांनीं

महाराजांवर सक्त नजर ठेवण्यास सुरवात केली. अर्थात् बायजाबाईसाहेब ह्यांनीं महाराजांस मन मानेल तसें वागूं न दिल्यामुळें, हें प्रकरण जास्तच विकोपास गेलें; व पुढें नामदार गव्हरनर जनरल लॉर्ड उइल्यम बेंटिंक ह्यांस इकडे लक्ष्य पोहोंचविणें भाग पडलें.

बायजाबाईसाहेब ह्यांनीं महाराज जनकोजीराव ह्यांस फार वाईट रीतीनें वागविलें, असा त्यांच्यावर कित्येक इतिहासकारांचा आरोप आहे. परंतु तो वास्तविक खरा नसून, त्यांत अतिशयोक्ति फार आहे. सुरेंद्रनाथ राय नामक ग्वाल्हेरच्या एका इतिहासकारांनीं, इंग्रजी ग्रंथकारांचा अनुवाद करून, बायजाबाईसाहेब व जनकोजीराव ह्यांच्या कलहासंबंधानें लिहितांना असें ह्मटलें आहे कीं, "बाईनीं आपल्या अज्ञान मुलास कोणत्याही प्रकारचें शिक्षण न देऊन संस्थानच्या राजकारणांविषयीं त्यास सर्वथा अज्ञानांधकारांत ठेविलें. त्यांनीं संस्थानचीं भावी राज्यसूत्रें चालविण्यास तो अगदीं अपात्र व्हावा असा यत्न केला; व त्यास अयोग्य रीतीनें प्रतिबंधांत ठेविलें. त्याच्या मनाची वाढ खुंटावी, स्वावलंबनाचा स्वाभाविक अंकुर त्याच्यामध्यें मुळांतच तुटला जावा, त्यास जगाचें अल्पही ज्ञान मिळूं नये, त्यानें नेहमीं दासवृत्तीमध्यें राहून राज्यकारभार हातीं घेण्यास धजूं नये, आणि त्याच्या मनांत आपणांविषयीं पोकळदरारा व अमर्याद भीति राहावी, असा बाईनीं वर्तनक्रम ठेविला."

1. "The Bai kept her ward devoid of all education, and in profound ignorance of state affairs. She did her best to make him utterly unfit to conduct the future Government of the country, and subjected him to galling restraints. Her policy was to dwarf the growth of his mind, to nip in the bud the native spirit of self-reliance, to keep him in utter ignorance of the world, and to fill his mind with a sort of vague and indefinite fear for her, that in future he might not shake off her thraldom, and take the Government in his own hands &c."

—*Gwalior by Roy. Page 333.*

परंतु खरा प्रकार असा नव्हता. महाराणी बायजाबाईसाहेब ह्या स्वभावतः फार तेजस्वी व तीव्र होत्या, व त्यांना ग्वाल्हेरचा राज्यकारभार स्वतःच्या हातीं ठेवण्याची मनुष्यस्वभावानुरूप इच्छा होती, ह्या दोन्ही गोष्टी जरी मान्य केल्या, तरी जनकोजीराव ह्यांस त्यांनीं अतिशय वाईट रीतीनें वागविलें व कलहाचें बीजारोपण केलें, असेंच केवळ ह्मणतां येत नाहीं. हा कलह उत्पन्न होण्यास ग्वाल्हेर दरबारचे कुटिल लोक व त्यांच्या दुष्ट मसलती, आणि जनकोजीरावांची अल्प बुद्धि व उच्छृंखल वृत्ति हींच कारणीभूत झालीं असावींत. ग्वाल्हेरच्या दुसऱ्या एका इतिहासकारांनीं असें लिहिलें आहे कीं, "बिनतोडीचे वेळीं बायजाबाईनें जनकोजी शिंद्यांस दत्तक घेतलें, आणि दौलतरावानें सांगितल्याप्रमाणें आपण जन्मभर राज्य चालवीन असा मनांत निश्चय करून, दत्तक घेतलेल्या मुलास आपल्याजवळ शिक्षणांत ठेविलें. हा मुलगा तारुण्यावस्थेंत येतांच, आपल्यास वैभवास आणणारीचे विचारें न वागतां, कांहीं कुमार्गी व आपस्वार्थी लोकांची संगत धरून, त्या बाईच्या शिक्षणांतून मुक्त होण्याची इच्छा करूं लागला. त्या जनकोजी शिंद्यास अनुपकारीपणाचे मार्गास लावणारे व कांहीं नवेंजुनें होऊं इच्छिणारे लोकांनीं त्याचा पक्ष धरिला. इंग्रज लोकही, याच संधीस, नवा राजा गादीवर बसला त्याचे नांवचा हरएक सरकारी कागदावर शिक्का झाल्याखेरीज तो कागद कोणत्याही प्रकारें ते दस्तऐवजांत खरा मानीनातसे झाले. तेव्हां जनकोजी शिंद्याचे पक्षास अधिक बळकटी आली, व बायजाबाईपासून त्याला दूर करण्याचा त्यांणीं विशेष प्रयत्न मांडिला." हीच वास्तविक खरी गोष्ट असावी असें मानण्यास हरकत नाहीं.

जनकोजीराव ह्यांस बायजाबाईसाहेबांनीं दत्तक घेऊन त्यांस आपला नातजांवई केलें, व ग्वाल्हेर संस्थानच्या राजपदाचे धनी केलें; ही

गोष्ट लक्ष्यांत घेतली ह्मणजे जनकोजीराव ह्यांनीं आपल्या वैभवसंपन्न व राज्यव्यवहारचतुर मातुश्रीच्या आज्ञेंत चालणें हें त्यांचें कर्तव्य होतें असेंच ह्मणावें लागतें. परंतु त्यांनीं ह्या कर्तव्यास पराङ्मुख होऊन लहानपणापासून मूर्ख व हलकट लोकांच्या नादीं लागून कुमार्ग स्वीकारिला. त्यामुळें दिवसेंदिवस बायजाबाईसाहेबांच्या मनांत त्यांचेविषयीं तिरस्कार व अप्रेमबुद्धि उत्पन्न होऊं लागली. महाराज जनकोजीराव ह्यांस दत्तक घेतल्यानंतर कित्येक दिवसपर्यंत, बायजाबाईसाहेब त्यांच्याशीं प्रेमभावानें वागत असून त्यांचें लडिवाळपणानें कौतुक करीत. परंतु जेव्हां महाराजांनीं दुष्ट लोकांच्या नादीं लागून, त्यांच्या शिकवणीनें, स्वतंत्रपणानें वागण्याचा व शिरजोर वर्तन करण्याचा क्रम आरंभिला, त्या वेळेपासून त्यांनीं त्यांस आपल्या ताब्यांत ठेवण्याचा प्रयत्न केला. ग्वाल्हेर दरबारचे माहितगार व जुने रेसिडेंट मेजर स्टुअर्ट ह्यांच्याही कानांवर ह्या अप्रिय गोष्टी अनेक वेळां गेल्या, व त्यांनींही त्यांबद्दल वेळोवेळीं मध्यस्थी करून, उभयतांचा सलोखा करण्याचा प्रयत्न केला; परंतु त्यांत त्यांस यश आलें नाहीं. महाराज जनकोजीराव ह्यांच्याबद्दल ग्वाल्हेरचे रेसिडेंट व दुसरे युरोपियन लोक ह्यांनीं जे लेख लिहिले आहेत, त्यांवरून त्यांच्याविषयीं व त्यांच्या वर्तनाविषयीं अनुकूल ग्रह होत नाहीं.

इ. स. १८२९ च्या जानेवारी महिन्यांत हिंदुस्थानचे मुख्य सेनाधिपति लॉर्ड कोंबरमियर हे ग्वाल्हेर येथील सैन्याची पहाणी करण्याकरितां आले होते. त्या वेळीं त्यांची व महाराज जनकोजीराव ह्यांची मुलाखत होऊन, महाराज जनकोजीराव ह्यांच्यासंबंधानें त्यांचा जो ग्रह झाला, तो त्यांचे एडीकां (परिचारक) मेजर आर्चर ह्यांनीं आपल्या प्रवासवृत्तांत नोंदून ठेविला आहे. त्यांत त्यांनीं असें लिहिलें आहे कीं, "राजेसाहेब हे अगदीं बालवयी ह्मणजे अवघे १४ वर्षांचे

आहेत. त्यांचा चेहरा गोड असून फार सौम्य आहे. त्यांचा वर्ण गोरा असून ते दिसण्यांत सुरेख आहेत. परंतु ते अगदीं जड, जिज्ञासा-शून्य, आणि जवळ चाललेल्या गोष्टींविषयीं मन्दोत्साह असे दिसतात. तथापि, कमांडर-इन-चीफ ह्यांच्यासारख्या बड्या गृहस्थांच्या प्रथम भेटीनें ते घाबरले नाहींत. त्यांनीं आमच्या समक्ष विडा खाल्ला. अशा रीतीनें विडा खाणें. त्यांची दरबारी मंडळी व एकंदरींत सर्व पूर्वेकडील लोक असभ्यपणा मानीत नाहींत."[1] ह्या लेखावरून त्यांच्याविषयीं चांगलें मत होत नाहीं.

महाराज जनकोजीराव ह्यांचें वर्तन दिवसेंदिवस फार शिरजोर-पणाचें व जुलमाचें होऊं लागलें; व त्यांच्या हातून फार अनुचित कृत्यें घडूं लागलीं. इ. स. १८३० मध्यें बायजाबाईसाहेबांची नात जी जनकोजीरावांस दिली होती, ती मृत्यु पावली. तेव्हां जनकोजीराव ह्यांनीं दुसरें लग्न केलें. त्या लग्नामध्यें त्यांनीं आपल्या अविचाराची कमाल करून सोडिली. त्यांनीं जवळच्या लोकांच्या अंगावर बाण उडविले. त्यायोगानें एक मनुष्य जखमी होऊन मृत्यु पावला. त्यामुळें बायजा-बाईसाहेबांस त्यांच्यावर सक्त नजर ठेवून त्यांचा वारंवार निषेध करणें भाग पडलें. परंतु ती गोष्ट त्यांस न रुचून, त्यांनीं रेसिडेंट साहेबांकडे वारंवार तक्रारी नेण्यास प्रारंभ केला. त्यामुळें बाईसाहेबांचें मन त्यां-

---

1. "The Rajah is quite a lad, about fourteen years of age, of a very pleasing and mild expression of countenance; he is fair and good-looking; but appears dull, inapprehensive, and but little interested in what goes on around him; he was not, however, embarrassed, though it was his first appearance before a stranger of the Commander-in-chief's rank. In common with his court, and all Orientals, who consider it no want of politeness, he chewed betel while we were present."

—*Tours in Upper India. Page* 41-42.

च्याविषयीं अतिशय कलुषित झालें. ह्या वेळीं ग्वाल्हेर दरबारचे रेसिडेंट मेजर स्टुअर्ट हे फार भले व थोर गृहस्थ होते. त्यांनीं महाराजांची चांगली कानउघाडणी करून, त्यांस ताळ्यावर आणण्याचा प्रयत्न केला. परंतु तो फलद्रूप झाला नाहीं. इ. स. १८३० सालीं—ह्मणजे महाराजांच्या १५ व्या वर्षीं—मेजर स्टुअर्ट ह्यांची व महाराजांची जी मुलाखत झाली, तिचें वर्णन त्यांनीं आपल्या खलित्यामध्यें येणेंप्रमाणें केलें आहे:—"महाराजांस ज्या वेळीं मीं विचारिलें कीं, "तुमची कशी काय हालहवाल आहे ?" त्या वेळीं त्यांनीं उत्तर दिलें कीं, "मी सुखी आहें; परंतु सर्व राज्याधिकार बाईसाहेबांच्या हातीं आहे." मीं त्यांस उत्तर दिलें कीं, "बरोबर आहे. तुमचें अद्यापि अल्पवय असल्यामुळें तुह्मीं राज्याधिकार आपल्या हातीं घेण्याची इच्छा करणें प्रशस्त नाहीं. तुह्मीं कोणाच्या तरी तंत्रानें वागलें पाहिजे. ह्या कामीं तुमच्यावर देखरेख करण्यास बाईसाहेब ह्याच फार योग्य आहेत. तुह्मांस बाईसाहेब ज्या रीतीनें वागवितात, त्यांत कांहीं तुह्मांस तक्रार करण्यासारखें असेल, तर मला सांगा. मी त्याचा योग्य बंदोबस्त करीन." परंतु महाराजांनीं ह्या प्रश्नाचें उत्तर "माझें बरें आहे, मला कांहीं सांगण्यासारखें नाहीं." अशा प्रकारचें उडवाउडवीचें दिलें. मग मीं त्यांस विचारिलें कीं, "तुमचें जर सर्व कांहीं ठीक आहे, व तुह्मांस बाईसाहेबांच्या विरुद्ध तक्रार करण्यास जागा नाहीं, तर तुह्मी नौकरचाकरांवर प्रसंगविशेषीं तरवारी उपसता, व लग्नाच्या वेळीं तर तुह्मीं त्यांच्यावर बाण सोडले, अशा प्रकारचें चमत्कारिक वर्तन कां केलें ? त्यामुळें लग्नप्रसंगीं एक मनुष्य ठार मेला, हें तुह्मांस माहीत नाहीं काय ?" (लग्नाच्या वेळीं महाराजांनीं बाण सोडल्यामुळें धारच्या पवारांचा एक नौकर जखमी होऊन मृत्यु पावला.) ह्या प्रश्नास महाराजांनीं अतिशय बेपरवाईनें उत्तर दिलें कीं, "भगवानानें जसें केलें तसें झालें !" त्यावर मीं त्यास असें सांगितलें

कीं, "महाराज, भगवानानें तुह्मांस तुमच्या निकृष्ट स्थितींतून एवढ्या ऐश्वर्यपदावर आणून ठेविलें, हे तुमच्यावर मोठे उपकार केले आहेत. ते दुसऱ्यास अपकार करण्याकरितां नव्हेत! तुह्मी जर अशा रीतीनें वागूं लागला, तर तुमच्याविषयीं सर्व लोकांचें मत फार वाईट होईल व तुह्मांस कोणी चांगलें ह्मणणार नाहीं." ह्यावर त्यांनीं उत्तर दिलें कीं, "मीं आतां तें सर्व सोडून दिलें आहे!" अर्थात् तशा प्रकारचें सर्व वर्तन महाराजांनीं सोडून दिलें, असा महाराजांच्या शब्दाचा अर्थ माझ्या मनांत येऊन, मीं त्यांस ह्मटलें कीं, "ही फार आनंदाची गोष्ट आहे." परंतु महाराजांनीं माझा हा चुकीचा समज फार वेळ राहूं दिला नाहीं! त्यांनीं लगेच स्पष्ट करून सांगितलें कीं, "तुह्मी समजलां तसा माझ्या शब्दांचा अर्थ नाहीं. माझा अर्थ असा कीं, मीं लोकमताकडे लक्ष्य देण्याचें मुळींच सोडून दिलें आहे. मला कोणाचीच जरूर नाहीं!"

हा मेजर स्टुअर्ट ह्यांच्या खलिता वाचून महाराज जनकोजीराव ह्यांचें वर्तन कोणाही सुज्ञ मनुष्यास चांगलें वाटणार नाहीं.

मेजर स्टुअर्ट ह्यांची इ. स. १८३० सालीं ग्वाल्हेरीहून बदली झाली. त्या वेळीं त्यांनीं ग्वाल्हेर सोडण्यापूर्वीं पुनः महाराजांची भेट घेतली व त्यांची कशी काय स्थिति आहे हें विचारिलें. त्या वेळीं त्यांनीं स्पष्ट सांगितलें कीं, "मी पूर्ण सुखी आहें." ह्या प्रसंगीं मेजर स्टुअर्ट ह्यांनीं महाराजांस चांगला उपदेश केला, व संस्थानचें राजकीय कामकाज चाललें असतांना बाईसाहेबांजवळ हजर राहणें किती हितावह आहे, तेंही सांगितलें. त्या वेळीं महाराजांनीं, "माझी तबियत बरी असते, तेव्हां बाईसाहेबांजवळ मी हजर असतों." असें उत्तर दिलें. ह्या सर्व संभाषणाचा सारांश मेजर स्टुअर्ट ह्यांनीं शेवटीं एका वाक्यांत असा काढिला आहे कीं, "एकंदरींत महाराजांनीं मजवर यत्किंचित्‌ही विश्वास न दाखवितां, किंवा आपलीं दुःखें मला न कळवितां, माझ्या

आपण होऊन केलेल्या मदतीचा स्वीकार न करून तिच्याकडे दुर्लक्ष्य केलें; व आपला उर्मटपणा व बेपरवाई स्पष्ट रीतीनें व्यक्त केली."

मेजर स्टुअर्ट ह्यांच्यासारख्या ग्वाल्हेर संस्थानाच्या खऱ्या हितचिंतक व निःपक्षपाती रेसिडेंटानें अल्पवयी महाराजांविषयीं आपला जो अभिप्राय व्यक्त केला आहे, त्यावरून महाराजांचें खरें वर्तन कशा प्रकारचें होतें, ह्याविषयीं नीट कल्पना करितां येते. अर्थात् अशा अज्ञान व विचारशून्य बालराजाच्या हातीं संस्थानच्या राज्यकारभाराचीं सूत्रें देणें ही गोष्ट, बायजाबाईसाहेबांसारख्या शहाण्या व राजकारणी बायकोस अप्रशस्त व अनर्थावह वाटावी, हें अगदीं साहजिक आहे. त्यामुळें अशा बालराजास त्यांनीं स्वातंत्र्य दिलें नाहीं, किंवा राज्याधिकार दिला नाहीं, ह्याबद्दल त्यांना दोष देणें रास्त नाहीं. परंतु खरा इतिहास व खरी वस्तुस्थिति माहीत नसल्यामुळें कांहीं इतिहासकारांचा हा गैरसमज झालेला आहे. असो.

मेजर स्टुअर्ट ह्यांनीं हा सर्व प्रकार वरिष्ठ सरकारास कळविला. परंतु, बायजाबाईसाहेब ह्या राज्यकारभार चालविण्यास खंबीर असल्यामुळें व त्या वेळीं एतद्देशीय संस्थानांतील अंतर्व्यवस्थेंत हात घालण्याचा वरिष्ठ सरकारचा हेतु (Policy) नसल्यामुळें, हा कलहाग्नि कांहीं कालपर्यंत तसाच धुमसत राहिला. संस्थानांतील कलहप्रिय व स्वार्थसाधु सरदारांचें व लष्करी अधिकाऱ्यांचें त्यास जोंपर्यंत साहाय्यरूपी तेल मिळालें नाहीं, व वरिष्ठ सरकारच्या अनुकूलतेचा वारा त्यास लागला नाहीं, तोंपर्यंत त्याच्या ज्वालांनीं पेट घेतली नाहीं. परंतु पुढें दोन्ही गोष्टी प्राप्त होतांच, त्याच्या ज्वाला प्रदीप्त होणार व त्यांत कोणाची तरी

1. Major Stewart's despatches quoted in Sutherland's Sketches. Page 191.

आहुति पडणार, हें भविष्य ठरल्यासारखेंच झालें. कर्नल सदरलंड नामक एका माहितगार युरोपियन गृहस्थानें त्यावेळच्या ग्वाल्हेरच्या स्थितीबद्दल जो लेख लिहिला आहे, त्यांत हें भविष्य ध्वनित केलें आहे:—"बायजाबाईसाहेब ह्या आमच्या साहाय्याशिवाय राज्यकारभार चालवीत आहेत, आणि आतांपर्यंत, बालराजानें संस्थानांतील आपल्या अनुयायी मंडळीसह बायजाबाईंच्या राज्यकर्तृत्वावर किंवा सामर्थ्यावर कांहीं छाप बसविली आहे, असें दिसत नाहीं. तथापि जसजसा तो वयानें मोठा होत जाईल व सज्ञान होईल, त्याप्रमाणें त्यास, जर साधारण महत्त्वाकांक्षा व मनुष्याचे उचित मनोविकार असतील, तर पुढेंमागें जी सर्व राजसत्ता त्याचीच होणार, तिचा कांहीं भाग हातीं घेण्याची इच्छा त्यास उत्पन्न झाल्यावांचून राहणार नाहीं. त्याचप्रमाणें, संस्थानच्या सरदार व मुत्सद्दी लोकांपैकीं कांहींना नेहमीं नवीन उदयास येणाऱ्या सूर्याप्रमाणें नूतन राजाची आवड अधिक असते, व कांहींना स्त्रीच्या राज्यकारभारापेक्षां पुरुषाचा राज्यकारभार अधिक पसंत वाटतो,असे सर्व लोक बालराजाचा पक्ष लवकरच स्वीकारतील. आणि असें झालें ह्मणजे त्यांच्या संयुक्त बळापुढें रीजंट राणीचें राज्य बिलकूल टिकणार नाहीं. खजिन्याचें आधिपत्य व संस्थानचीं इतर कित्येक साधनें ह्यांच्या योगानें बायजाबाईंच्या पक्षाची कांहीं दिवस सरशी होईल व त्यांस प्रतिपक्षाशीं थोडा वेळ टिकाव धरतां येईल. अशा वादामध्यें ब्रिटिश सरकार हें अगदीं अलिप्त राहील हेंच विशेष संभवनीय आहे. आह्मी कोणावरही मेहेरबानी न करितां, उभय पक्षांस जितकें ज्यास्त स्वातंत्र्य देऊं, तितकें त्या संस्थानचें हित होऊन, त्याची राज्यव्यवस्था अधिक राष्ट्रीय व अधिक कार्यसाधक होईल. व तेणेंकरून आह्मांस त्या संस्थानच्या राजकारणांत हात घालण्याची अवश्यकता तितकी कमी कमी वाटत

जाईल.[१]" परंतु कर्नल सदरलंड ह्यांच्या अनुमानाप्रमाणें ब्रिटिश सरकारच्या तटस्थपणाचा परिणाम ग्वाल्हेर संस्थानास हितावह न होतां, उलट अनर्थावह मात्र झाला, असें मिल्लप्रभृति इतिहासकारांचें मत आहे. अस्तु.

ग्वाल्हेरचे रेसिडेंट मेजर स्टुअर्ट ह्यांनीं ग्वाल्हेर येथील दरबारची स्थिति व बायजाबाईसाहेबांचा राज्यकारभार ह्यासंबंधाची माहिती सरकारास वेळोवेळीं कळविलीच होती. त्यांना बायजाबाईच्या राज्यव्यवस्थेंत बिलकुल उणीव वाटली नाहीं, व हिंदुस्थान सरकारासही त्यामध्यें

1. "From the period up to the present there has been little at Gwalior calling for the interference or notice of the British Government in the affairs of that principality. The Baeza Baee continues her administration without requiring our support, and the young Raja, if he has any adherents in the state, has so far failed to make any impression on her power. It may be supposed that as he advances in years and appoaches his man-hood, he must, if he has the ordinary ambition, and the proper feelings of a man, desire to exercise a portion of that power which sooner or later must be his own; that those of the chiefs of the state who are likely to worship the rising sun, as well as those who would prefer the Government of a man to that of a woman, will, at no very distant period, array themselves on his side; and that the Government of the Regent will fall before their united force. The command of treasury and the resources of the state must, for a time give a preponderance to her party, and may enable her to prolong the struggle. In such a contest it will be very possible for the British Government to stand aloof and the more we allow the parties to have a fair-field and no favor, the more shall we secure a national and efficient Government for that country, and the less will it hereafter be necessary for us to interfere in its affairs."

हात घालण्याची अवश्यकता वाटली नाहीं. मेजर स्टुअर्ट ह्यांची हैदराबादच्या रेसिडेंटाच्या जागीं इ. स. १८३० सालीं नेमणूक झाली. त्यांचे जागीं मि० क्याव्हेंडिश हे ग्वाल्हेर दरबारचे नवे रेसिडेंट होऊन आले. ह्यांचेंही बायजाबाईसाहेबांविषयीं प्रथम मन कलुषित झालेलें नव्हतें. त्यांना ग्वाल्हेरची राज्यव्यवस्था पसंत असून त्यांनीं बाईसाहेबांचें अनेक वेळां अभिनंदन केलें. परंतु पुढें, महाराज जनकोजीराव हे जसजसे मोठे होऊं लागले, तसतसें त्यांच्या पक्षास अधिक प्राबल्य येऊन हा कलह पेट घेत चालला. ह्याच वेळीं ब्रिटिश सरकारानें बायजाबाईसाहेब ह्यांस स्वतःचा शिक्का बंद करून महाराजांचा शिक्का चालविण्याचा आग्रह केला, व महाराजांचे सर्व प्रतिबंध कमी करून त्यांचें व ब्रिटिश रेसिडेंटाचें दळणवळण अधिक मोकळेपणाचें केलें. त्यामुळें महाराजांच्या पक्षांतील लोकांस चांगली फूस सांपडून, त्यांनीं महाराज व त्यांच्या मातुश्री ह्यांच्या तंट्याचें स्वरूप अधिक उग्र व भयानक केलें. त्यामुळें नवीन रेसिडेंट मि० क्याव्हेंडिश ह्यांस हें भांडण हिंदुस्थानचे गव्हरनर जनरल लॉर्ड उइल्यम बेंटिंक ह्यांच्यापुढें मांडणें भाग पडलें. लॉर्ड वुइल्यम बेंटिंक ह्यांनीं राजकारणाच्या हेतूनें ह्मणा, किंवा वस्तुस्थितीचें समक्ष ज्ञान करून घेण्याकरितां ह्मणा, ग्वाल्हेर येथें स्वतः येऊन, बायजाबाईसाहेब व जनकोजीराव ह्यांची भेट घेण्याचा निश्चय केला;व त्याप्रमाणें त्यांची स्वारी आपल्या पत्नीसहवर्तमान ग्वाल्हेर येथें ता. १८ डिसेंबर इ. स. १८३२ रोजीं येऊन दाखल झाली. खुद्द गव्हरनर जनरलसाहेब ह्यांची स्वारी ग्वाल्हेर येथें येणार असें समजतांच बायजाबाईसाहेब ह्यांस फार संतोष झाला, व त्यांनीं त्यांच्या स्वागताची उत्तम प्रकारची तयारी केली. बायजाबाईसाहेब ह्यांची व लॉर्ड उइल्यम बेंटिंक ह्यांची जी भेट झाली, तिचें सुंदर वर्णन त्या वेळीं हजर असलेल्या एका युरोपियन गृहस्थानें लिहिलें आहे. तेंच येथें सादर केलें ह्मणजे

त्या प्रसंगाचा हुबेहूब देखावा नेत्रांपुढें येऊन, बायजाबाईसाहेबांचें ऐश्वर्य व संपत्ति ह्यांचीही कल्पना करितां येईल. हें वर्णन पुढें लिहिल्याप्रमाणें आहेः—

" बियाना, डिसेंबर २० इ. स. १८३२—गव्हरनर जनरलसाहेब ग्वाल्हेरच्या महाराजांस परत भेट देण्यास गेले, त्या वेळीं महाराणी बायजाबाई आणि महाराज जनकोजीराव शिंदे हे नामदारसाहेबांस भेटण्याकरितां धोलपुरापर्यंत आले होते. त्या वेळीं त्यांचेबरोबर सर्व प्रकारचें सैन्य मिळून ३०,००० लोक होते. ह्या सैन्याचा तळ ग्वाल्हेरच्या सरहद्दीवर चंबळा नदीचे कांठीं पडला होता. आग्र्याच्या सरहद्दीवरील प्रांत, दोन किंवा तीन मैलपर्यंत, विपुल जलानें परिप्लुत झाल्यामुळें, आह्मांस त्या पलीकडे तळ देणें भाग पडलें होतें. मराठ्यांच्या लष्करापासून आमचा तळ लांब असल्यामुळें, व नामदार गव्हरनर जनरल ह्यांनीं दुपारीं तीन वाजतां कूच केल्यामुळें, मराठ्यांच्या लष्कराचा भव्य देखावा अवलोकन करण्यास मला संधि मिळाली नाहीं. ह्या समयीं मराठ्यांचें सैन्य नामदारसाहेबांच्या सन्मानार्थ लष्करी थाटानें जितकें सज्ज होतें, तितकें क्वचितच दृष्टीस पडेल. ह्या लष्कराच्या तळापासून नदीच्या कांठापर्यंत जाण्याचा जो रस्ता होता, तो फारच अरुंद होता. नदीच्या तीरावरील उच्चप्रदेशावर पायदळ पलटणींचे लोक हातामध्यें तरवारी व तोड्यांच्या बंदुकी घेऊन दोन मैलपर्यंत एकसारखे उभे राहिले होते. त्यांच्याकडून नदीच्या बाजूस खाली उतरत आलें आणि थोडें वळलें, ह्मणजे नीलवर्ण व स्वच्छ अशा चंबळा नदीच्या तीरावर, फारच सुंदर देखावा दृष्टीस पडत असे. तेथें १५ हजार सैन्याची दुतर्फा रांग लागलेली असून त्यांच्या पिच्छाडीस घोडेस्वारांच्या तरवारी चमकत होत्या. हे सर्व लोक नामदारसाहेबांस सलामी देण्याकरितां अगदीं तत्पर झाले होते. हा देखावा

फारच भव्य व अदृष्टपूर्व असा होता. रीतीप्रमाणें गव्हरनर जनरल-साहेबांच्या दरबारचा समारंभ झाला. महाराज जनकोजीराव हे शृंगारलेल्या हत्तीवर सोन्याच्या अंबारींत बसून गव्हरनर जनरलसाहेबांस अर्ध्या रस्त्यावर सामोरे आले होते. उभयतांची मुलाखत होतांच बंदुकीची फेर झडली. नंतर परस्परांचे मुजरे होऊन नामदारसाहेब आपल्या हत्तीवरून शिंदे सरकारच्या हत्तीवर आले. नंतर उभयतांच्या स्वाऱ्या दरबारच्या भव्य तंबूमध्यें दाखल झाल्या. हा तंबू ह्या प्रसंगा-करितां उत्तमप्रकारें शृंगारलेला होता. महाराणी बायजाबाईसाहेब ह्यांची व नामदारसाहेबांची भेट तंबूमध्यें चिकाचा पडदा लावून झाली. त्यांस नामदारसाहेबांनीं मोठ्या आदबीनें सलाम केला. नंतर त्यांचें व बायजाबाईसाहेबांचें, मि० म्याक्नॉटन ह्यांच्या मध्यस्थीनें, कांहीं वेळ संभाषण झालें. रीतीप्रमाणें नजरनजराणे, पानसुपारी व अत्तरगुलाब होऊन दरबार बरखास्त झाला.

दुसरे दिवशीं सकाळीं मराठ्यांचें सैन्य ग्वाल्हेरीकडे परत वळलें, व ना० गव्हरनर जनरल ह्यांची स्वारी एक दिवसानंतर—ह्मणजे ता. २१ डिसेंबर रोजीं कूच करिती झाली. त्यानंतर तोफखाना परत निघाला. चंबळा नदीचे ग्वाल्हेरच्या बाजूचे ओहोळ हे आग्र्याच्या बाजूपेक्षां अधिक बिकट असल्यामुळें त्यांतून सुरक्षितपणें तोफा नेणें जवळजवळ अशक्य होतें; ह्मणून ता. २१ रोजीं सर्व सैन्य पुढें पाठवून, तोफखाना स्वतंत्र रीतीनें न्यावा, असा विचार ठरला. आह्मी आल्यानंतर दुसरे दिवशीं महाराणी बायजाबाईसाहेब ह्यांनीं लेडी उइल्यम बेंटिंक ह्यांची भेट घेतली. एतद्देशीय स्त्रियांनीं युरोपियन स्त्रियांची भेट घेण्याची फारशी चाल नाहीं. परंतु बायजाबाईनीं लेडी उइल्यम बेंटिंक ह्यांची मुलाखत व्हावी अशी इच्छा व्यक्त केल्यामुळें तो योग घडून आला. प्रथमतः बायजाबाईसाहेब ह्यांनीं रीतीप्रमाणें त्यांना पेशवाईची भेट

दिली. त्या वेळीं त्यांच्याबरोबर त्यांची कन्या चिमणाबाई ( ही आपासाहेब पाटणकर ह्यांस दिली होती ) व इतर सरदारांच्या स्त्रिया गेल्या होत्या. युरोपियन स्त्रियांना ह्या भेटीचें फार कौतुक वाटून त्या, लेडी उइल्यम बेंटिंक ह्यांस, राजस्त्रियांच्या स्वागताचे कामीं मदत करण्याकरितां आल्या होत्या. युरोपियन स्त्रियांनीं चिमणाबाईचें सौंदर्य पाहून त्यापुढें आपलें रूप कांहींच नव्हे, असें प्रांजलपणें कबूल केलें. त्यांनीं, तिचें अप्रतिम लावण्य, तिचा गौरवर्ण, तिचे तेजस्वी व पाणीदार नेत्र आणि नाजूक व रेखलेले अवयव पाहून, इंग्लंडांतील प्रत्येक स्त्री तिचा हेवा करील, अशा प्रकारें तिच्या रूपाची फार फार प्रशंसा केली. ह्या वेळीं लेडी उइल्यम बेंटिंक ह्यांनीं महाराणीसाहेबांस कांहीं चिनी वस्तू व अलंकार नजर केले. हे त्यांच्या भेटीच्या अगोदर तीन चार तासपर्यंत सर्वांच्या प्रदर्शनार्थ मांडून ठेविले होते. ते फार सुंदर होते असें ह्मणतात. राणीसाहेब मेण्यांत बसून आल्या, त्या वेळीं त्यांच्याबरोबर साहा परिचारिका पायीं चालत होत्या. मेण्यावर लाल रंगाच्या मखमलीची भरजरी बुटेदार चादर पसरलेली होती. ती फार मूल्यवान् असून तिच्यासभोंवतीं मोत्यांचे गोंडे लोंबत होते. राणीसाहेबांच्या दासी व इतर स्त्रिया ह्यांनीं अतिशय उंची वस्त्रें व बहुमूल्य अलंकार परिधान केल्यामुळें त्यांच्याकडे पाहून दृष्टि दिपून जात असे.

दुसरे दिवशीं सकाळीं, महाराज जनकोजीराव शिंदे लॉर्ड उइल्यम बेंटिंक ह्यांस भेटण्याकरितां गेले होते. त्यांचा लवाजमा व थाट अगदीं अपूर्व होता. ते स्वतः एका शृंगारलेल्या हत्तीवर बसले होते. हत्तीच्या अंगावर भरजरीची झूल व गळ्यामध्यें सुवर्णाच्या माळा आणि गंडस्थळावर निरनिराळे अलंकार घातले होते. त्यामुळें तो प्रचंड प्राणी फार सुशोभित दिसत असून, आपल्या ऐश्वर्याचें प्रदर्शन करण्याकरितांच जणूं मंद गतीनें चालत आहे, असें वाटत होतें. महाराणी

बायजाबाईसाहेब ह्यांचे बंधु हिंदुराव घाटगे व जांवई आपासाहेब पाटणकर आणि दरबारचे इतर प्रमुख मानकरी व सरदार लोक महाराजांबरोबर मोठ्या थाटानें गजारूढ होऊन गेले होते. त्यांच्या वैभवानें शृंगाराभिरुचि दिपून जाऊन, ती बिचारी तेथून लोपली होती कीं काय, असें वाटत असे. महाराजांची व नामदारसाहेबांची मुलाखत होऊन कांहीं वेळ एकांत भेट झाली. हिंदुराव व आपासाहेब ह्यांचें व महाराजांचें अंतःकरणांतून रहस्य नसल्यामुळें, त्यांना नामदार साहेबांनीं महाराजांस खाजगी भेट दिल्याचें पाहून फार आश्चर्य वाटलें. त्यांचा व महाराजांचा एकांत तीन तासपर्यंत चालला होता. तो पाहून, महाराजांना कांहीं लहर येऊन त्यांनीं गव्हरनर जनरलसाहेबांस, आपणांस गादीवर बसविल्यावांचून सोडीत नाहीं, ह्मणून हट्ट धरून अडवून ठेविलें आहे कीं काय, अशी शंका घेण्यास कारण झालें. तसा कांहीं प्रकार झाला असता, तर महाराजांस तेव्हांच निरोप मिळून रणकंदनाचाच प्रसंग ठेपल्यावांचून राहाता ना. महाराणींचें सैन्य तयार होतेंच व आमचेंही सैन्य तयार होतेंच. त्या उभयतांपैकीं कोणाची तरी महाराजांच्या लोकांशीं चकमक उडाली असती. परंतु जनकोजीराव ह्यांस, महाराणीच्या सैन्याची व आपली लढाई झाली, व तींत आपण कैद झालों, तर आपणांस गव्हरनर जनरलसाहेबांकडून कांहीं मदत होणार नाहीं, असें कळून चुकलें होतें. त्यामुळें त्यांनीं अतिप्रसंग न करितां, तीन तासपर्यंत गव्हरनर जनरलसाहेबांजवळ, आपणांस राज्याधिकार मिळावा ह्मणून एकसारखी कर्मकथा चालविली होती. असो. ही भेट संपल्यानंतर दुपारीं लेडी उइल्यम ह्या आमच्या लष्करांतील सर्व आंग्ल स्त्रिया बरोबर घेऊन महाराणी बायजाबाईसाहेब ह्यांस भेट देण्याकरितां गेल्या. त्यांचा महाराणीसाहेबांच्या वतीनें चिमणाबाईनें उत्तम प्रकारें आदरसत्कार केला. चिमणाबाईचें आदरकौशल्य आणि रीतभात

पाहून आंग्ल स्त्रियांनीं तिच्या रूपाप्रमाणें ह्याही सद्गुणांची फार तारीफ केली. चिमणाबाईनें आपल्या मातुश्रींच्या वतीनें, मोठ्या प्रौढपणानें आणि चित्ताकर्षक रीतीनें, सर्वांचा आदरसत्कार व मानपान यथायोग्य केला. ह्या प्रसंगीं बायजाबाईसाहेबांनीं लेडी उइल्यम व आंग्ल स्त्रिया ह्यांना पुष्कळ मूल्यवान् वस्तू नजर केल्या. त्या सर्वांची माहिती चिमणाबाईनें आंग्ल स्त्रियांस विनम्र व गोड वाणीनें सादर केली. त्यामुळें त्या स्त्रिया अत्यंत प्रसन्न झाल्या, हें सांगावयास नकोच."

गव्हरनर जनरलसाहेबांनीं महाराज जनकोजीराव ह्यांस परत भेट दिली; त्याचप्रमाणें बायजाबाईसाहेब ह्यांसही परत भेट दिली. बायजाबाईसाहेबांनीं रीतीप्रमाणें चिकाच्या पड्यांतून नामदारसाहेबांची भेट घेतली. त्या वेळीं हिंदुराव घाटगे हे मराठी तऱ्हेचा बाणेदार पोषाख करून व बहुमूल्य रत्नालंकार धारण करून, नामदारसाहेबांच्या सत्कारार्थ तत्पर होते. बायजाबाईसाहेबांचें व नामदारसाहेबांचें राजकीय प्रकरणीं वगैरे बराच वेळ संभाषण झालें. नंतर त्यांनीं आदबीनें सलाम करून बायजाबाईसाहेबांचा निरोप घेतला.

गव्हरनर जनरल लॉर्ड उइल्यम बेंटिंक आणि महाराज जनकोजीराव शिंदे ह्यांची ज्या वेळीं भेट झाली, त्या वेळीं चीफ सेक्रेटरी मि० म्याक्नॉटन, ग्वाल्हेरचे रेसिडेंट मि० क्याव्हेंडिश आणि लखनौचे रेसिडेंट मेजर जॉन लो हे हजर होते. ह्या भेटीमध्यें जें संभाषण झालें, त्याचा सारांश ता. १८ डिसेंबर १८३२ च्या एका खलित्यामध्यें आला आहे. तो संक्षिप्त रीतीनें येथें दाखल करितों:—

"गव्हरनर जनरलसाहेबांनीं महाराजांस असें सांगितलें कीं, ज्याअर्थीं उभय सरकारांमध्यें स्नेहभाव वसत आहे, त्या अर्थीं महाराजांनीं मजवर पूर्ण विश्वास ठेवावा, व माझी काय मदत पाहिजे तें मला मोकळ्या अंतःकरणानें कळवावें. महाराजांनीं गव्हरनर जनरलसाहेबांच्या

ह्या कृपाळुपणाबद्दल त्यांचे आभार मानून आपली सर्व हकीकत सांगण्यास सुरवात केली. त्या हकीकतीचा मथितार्थ इतकाच होता कीं, आपण आतां प्रौढ झालों असून, शास्त्राप्रमाणें व शिंद्यांच्या घराण्याच्या पूर्वापार चालत आलेल्या चालीप्रमाणें राज्याचा अधिकार आपणांस मिळावा. नामदारसाहेबांनीं महाराजांची सर्व हकीकत ऐकून घेऊन, त्यांचें मागणें किती चुकीचें आहे हें त्यांस समजावून सांगितलें. ते ह्मणाले:—"राज्याचा अधिकार कोणाकडून घेण्यास अथवा कोणास देण्यास मला मुळींच अखत्यार नाहीं. कारण, शिंदे सरकारचें राज्य अगदीं स्वतंत्र आहे. ब्रिटिश सरकारानें कोणास मसनदीवर बसविलें नाहीं व कोणास तिच्यावरून ते काढणारही नाहींत. प्रस्तुत प्रसंगीं त्यांना आपल्या राज्यकारभाराचें धोरण बदलण्याचें प्रयोजन नाहीं." हे नामदारसाहेबांचे शब्द ऐकून महाराजांनीं असा प्रश्न विचारिला कीं, "मग मला दत्तक घेण्याचा हेतु काय?" नामदारसाहेबांनीं त्यांस उत्तर दिलें कीं, "तुह्मांस दत्तक घेण्याचा उद्देश, शिंद्यांच्या घराण्याचें नांव चालावें व वारसाबद्दल वादविवाद उत्पन्न होऊन पुढें विपरीत परिणाम होऊं नये, हा आहे. ब्रिटिश सरकारानें बायजाबाईकडून तुह्मांस अमकेच वर्षीं गादीवर बसवावें, असा करार करून घेतलेला नाहीं. बायजाबाईच्या कृपेनें तुमचें दत्तविधान होऊन तुह्मांस शिंद्यांच्या गादीच्या वारसाचा हक्क मिळाला, हें तुह्मीं आपलें मोठें भाग्य समजलें पाहिजे. ह्या उपकाराची फेड तुह्मीं अशा रीतीनें करूं नये." महाराजांनीं गव्हरनरजनरलसाहेबांच्या भाषणाचा प्रतिकूल कल पाहून पुनः असा प्रश्न विचारिला कीं, "आतां नाहीं, तर मग पुढें किती वर्षांनीं मला राज्याधिकार मिळेल?" त्यावर नामदारसाहेबांनीं "ह्या प्रश्नास आह्मी जबाब देऊं शकत नाहीं." असें चोख उत्तर दिलें. आणखी, त्यांना सामोपचारानें असें सांगितलें कीं, "महाराज, तुह्मी या गोष्टीचा नीट विचार करा. मेजर स्टुअर्ट हे

ज्या वेळीं ग्वाल्हेरचे रेसिडेंट होते, त्या वेळीं त्यांनीं महाराज दौलतराव शिंदे ह्यांस दत्तक घेण्याबद्दल वारंवार सूचना केली; परंतु त्यांनीं ती मान्य केली नाहीं. पुढें त्यांनीं मृत्यूपूर्वीं कांहीं महिने अगोदर, चांगलें अक्कलहुषारींत असतांना, आपल्यापश्चात् बायजाबाईनीं सर्व राज्यकारभार सांभाळावा, अशी इच्छा भरदरबारामध्यें प्रदर्शित केली. त्याप्रमाणें महाराज दौलतराव मृत्यु पावल्यानंतर सर्व राज्यसूत्रें बायजाबाईनीं धारण केलीं आहेत. गादीच्या वारसाबद्दल प्रश्न उपस्थित होऊन घोंटाळा होऊं नये, ह्मणून त्यांनीं तुह्मांस दत्तक घेतलें आहे. परंतु अमक्याच वर्षीं दत्तकावर सर्व राज्यभार सोंपवूं ह्मणून त्यांनीं ब्रिटिश सरकाराशीं करार केलेला नाहीं. सारांश, तुह्मी जे ह्या महापदावर चढला, त्याचें सर्व श्रेय बायजाबाईकडे आहे; व त्याचा संबंध ब्रिटिश सरकाराशीं मुळींच नाहीं. तुह्मांस राज्याधिकारी होण्याचा प्रसंग सुदैवानें लवकरच येईल; तोंपर्यंत तुह्मीं वाट पाहिली, तर बायजाबाईनीं तुमच्याखेरीज दुसऱ्या कोणास गादीचा वारस करूं नये एवढें मात्र आह्मी त्यांस सांगूं. ह्यावर तुह्मीं विश्वास ठेवावा. परंतु असें न करितां, जर तुह्मी दंगेधोपे करून बायजाबाईस राज्यावरून काढण्याचा प्रयत्न कराल, तर मग त्याचा जो बरावाईट परिणाम होईल, तो तुमचा तुह्मांस भोगावा लागेल. अशा गडबडींत जर तुमचा खून झाला, अथवा तुह्मी कैद झाला, तर ब्रिटिश सरकार तुमचा कैवार घेऊन बिलकूल मध्यस्थी करणार नाहीं, किंवा तुमच्या गादीच्या वारसापणाबद्दल हमी घेणार नाहीं." ह्याप्रमाणें गव्हरनरजनरलसाहेबांनीं महाराजांस स्पष्ट रीतीनें आपलें मत कळविलें व आणखीही योग्य उपदेश केला, व महाराजांनीं त्याप्रमाणें वर्तन करण्याचें मान्य केलें.

ह्या भेटीच्या वृत्तांतावरून बायजाबाईनीं सर्व राज्यकारभार चाल-

वावा व महाराजांनीं त्यांच्या आज्ञेंत राहावें, असा हिंदुस्थान सरकारचा हेतु स्पष्ट रीतीनें व्यक्त होतो. परंतु ह्याप्रमाणें महाराजांच्या हातून वर्तन घडलें नाहीं. त्यांनीं पुनः आपल्या कुटिल मंत्र्यांच्या नादीं लागून, त्यांच्या मसलतीप्रमाणें बायजाबाईच्या विरुद्ध कट उभारिला, आणि त्यांच्याविरुद्ध नानाप्रकारच्या कागाळ्या ग्वाल्हेरचे रेसिडेंट मि० क्याव्हेंडिश ह्यांचेमार्फत गव्हरनरजनरलसाहेबांकडे पाठविण्यास सुरवात केली. मि० क्याव्हेंडिश ह्यांचें मत महाराजांच्या विरुद्ध असून, त्यांना महाराजांच्या ह्या कृती पसंत होत्या, असें दिसत नाहीं. ता. २८ मार्च इ. स. १८३३ रोजीं, त्यांनीं महाराजांस जो खलिता पाठविला आहे, त्यांत त्यांनीं त्यांची कानउघाडणी करून गव्हरनरजनरलसाहे-बांच्या उपदेशाची त्यांना पुनः आठवण दिली आहे. एवढेंच नव्हे, तर "बायजाबाई ह्या सर्व राज्याच्या मालक आहेत व इंग्रजांस त्यांच्या राज्यकारभारांत हात घालण्याचा अधिकार पोहोंचत नाहीं. ह्याकरितां माझी तुह्मांस अशी शिफारस आहे कीं, तुह्मीं गव्हरनरजनरलसाहेबांच्या उपदेशाप्रमाणें व तुमच्या स्वतःच्या वचनाप्रमाणें वर्तन ठेवून, तुह्मीं बायजाबाईच्या आज्ञेंत वागावें व कांहीं तंटेबखेडे करूं नयेत. असा वर्तनक्रम तुह्मी स्वीकाराल, तर ब्रिटिश अधिकाऱ्यांस संतोष वाटेल; आणि जर तुह्मी दंगेधोपे कराल, तर—तुमची सध्याची स्थिति कांहींही असो—तुह्मी अधिक प्रतिबंधांत पडाल; आणि त्यांतून तुमची सुटका होणें अधिक कठीण पडेल. मग ब्रिटिश सरकार किंवा मी तुमच्या वतीनें त्यांत बिलकूल लक्ष्य घालणार नाहीं. ........ तुह्मांस जर कांहीं महत्त्वाची गोष्ट कळवावयाची असेल व ती जर गव्हरनरजनरल ह्यांस अद्यापि कळविली गेली नसेल, तर प्रथम मी ती बायजाबाईस कळवीन; व त्यांचा त्यासंबंधाचा अभिप्राय घेऊन, नंतर तुमचा खलिता पुढें रवाना करीन. कोणत्याही कारणास्तव, तुमचा खलिता किंवा खाजगी

पत्रव्यवहार बायजाबाईस कळविल्यावांचून मी पुढें रवाना करणार नाहीं. तुमच्या हें लक्ष्यांत असेलच कीं, तुमची भेट घेण्याबद्दल गव्हरनरजनरल-साहेबांनीं बायजाबाईची परवानगी प्रथम विचारली होती; व तुमच्या भेटीमध्यें जी हकीकत घडली, ती सर्व मागाहून त्यांस कळविली होती. त्यांच्या संमतीवांचून तुमचा व माझा किंवा गव्हरनरजनरलचा व तुमचा खाजगी पत्रव्यवहार होणें अगदीं अशक्य आहे. बाईसाहेबांनीं तुह्मांस जास्त ममतेनें वागविण्याबद्दल मीं त्यांस सांगावें ह्मणून तुह्मीं जें लिहिलें आहे, त्याबद्दल माझें असें सांगणें आहे कीं, तुह्मी जर स्वतःच बाईसाहेबांस आपल्या वर्तनानें संतुष्ट कराल, तर तुह्मांस त्या फार चांगल्या रीतीनें वागवितील. तुह्मी अयोग्य तक्रारी करीत राहाल व भलतेसलते विचार मनांत वागवाल, तर तुमचीं संकटें कमी न होतां, उलट अधिक वाढतील; व आह्मी तुमच्याकरितां बिलकूल मध्यस्थी करणार नाहीं. तात्पर्य, तुह्मीं बायजाबाईस संतुष्ट करण्याचा प्रयत्न केला पाहिजे; व गव्हरनरजनरलसाहेबांचे शब्द सदोदित नेत्रासमोर ठेविले पाहिजेत[1]."

ह्याप्रमाणें महाराज जनकोजीराव शिंदे ह्यांस बायजाबाईसाहेबांच्या मर्जीप्रमाणें व आज्ञेबरहुकूम वागण्याबद्दल ग्वाल्हेरचे रेसिडेंट मि. क्याव्हेंडिश ह्यांनींही स्पष्ट रीतीनें कळविलें. ह्यावरून गव्हरनरजनरल व ग्वाल्हेरचे रेसिडेंट ह्यांस महाराज जनकोजीराव ह्यांचें वर्तन पसंत नसून, त्याचा त्यांनीं वारंवार कडक शब्दांनीं कसा निषेध केला होता, हें दिसून येतें. अर्थात् या सर्व हकीकतीवरून ग्वाल्हेर येथील तंट्याचें मूळकारण काय व त्याचा अधिक दोष कोणाकडे येतो, हें चतुर वाचकांस सहज ताडितां येईल. महाराज जनकोजीराव ह्यांचें अल्पवय व

---

1. Letter from the Hon'ble Mr. Cavendish to Junkoo Raw Scindiah, in reply to one received from the Maharaja, dated 28th March 1833.

अपरिपक्वबुद्धि असल्यामुळें, ग्वाल्हेर दरबारांतील कुटिल व कलहप्रिय लोकांच्या ते ताब्यांत जाऊन, त्यांच्या ओंजळीनें पाणी पिऊं लागले, ह्यांत विशेष आश्चर्य नाहीं. तथापि, त्यांच्या ह्या दुर्वर्तनानें हा कलह अधिक विकोपास गेला व त्याचा परिणाम बाईसाहेबांस विनाकारण भोगावा लागला, असें ह्मणण्यास हरकत नाहीं. 'एका हातानें टाळी वाजत नाहीं' ह्या व्यवहारांतील ह्मणीप्रमाणें महाराजांच्या दुर्वर्तनामुळें बायजाबाईसाहेबांसही संताप व उद्वेग येऊन, त्यांच्याही हातून क्वचित् प्रमाद घडले असतील; परंतु दोषाचा अधिक वांटा त्यांच्याकडे येतो, असें उपलब्ध माहितीवरून तरी निदान ह्मणतां येत नाहीं.





# भाग ७ वा.

## ग्वाल्हेर येथील राज्यक्रांति
## व
## बायजाबाईसाहेबांचा वनवास.



महाराज जनकोजीराव व बायजाबाईसाहेब ह्यांच्यामधील कलह मिटविण्याबद्दल बाह्यात्कारें तरी निदान ग्वाल्हेरचे रेसिडेंट मि० क्याव्हेंडिश ह्यांनीं पुष्कळ खटपट केली. परंतु तिचा कांहींएक उपयोग न होतां, त्यांच्यामधील वितुष्ट अधिकच वाढत गेलें; आणि ता. १० जुलई इ. स. १८३३ रोजीं ग्वाल्हेर येथें उघड रीतीनें बंड झालें. महाराज जनकोजीराव ह्यांनीं ग्वाल्हेर येथील 'वरुण' व 'बहादुर' हे दोन कंपू अगोदरपासून आपल्याकडे अनुकूल करून घेतले होते, व त्यांचे अधिकारी जे शूर पुरभय्ये लोक होते त्यांच्याशीं वचनप्रमाण पक्कें करून, गादीवर बसल्यानंतर त्यांस मोठमोठे अधिकार देण्याचें मान्य केलें होतें. त्याचप्रमाणें महाराजांनीं कर्नल जेकब ह्यांस अनुकूल करून त्यांच्या ताब्यांतील कंपू आपल्या मदतीस घेण्याचा प्रयत्न केला होता. परंतु कर्नल जेकब हे स्वतः अनुकूल न होतां, त्यांचें सैन्य मात्र फितलें होतें. ह्याप्रमाणें सैन्याच्या मदतीची चांगली सिद्धता झाली असें पाहून, महाराजांनीं बायजाबाईसाहेबांस राजवाड्यांत कैद करून स्वतःच्या नांवानें द्वाही फिरविण्याचा निश्चय केला. ता. ८ जुलई इ. स. १८३३ रोजीं ते सहज हवा खाण्याचें निमित्त करून कर्नल जेकब ह्यांच्या कंपूमध्यें गेले; व तेथून इशारत करून कांहीं तरी सैन्याची हालचाल करणार, तों त्यांच्या आगमनाची

बातमी कर्नल जेकब ह्यांनीं बायजाबाईंस कळविली; व महाराजांच्या हेतूप्रमाणें सैन्यानें कांहीं गडबड करूं नये ह्मणून सक्त ताकीद दिली. अर्थात् महाराजांचा हा बेत विसकटल्यामुळें ते निराश झाले; व त्या दिवशींची सर्व रात्र राजवाड्याबाहेर घालवून ते सकाळीं रेसिडेन्सीमध्यें गेले. परंतु रेसिडेंटसाहेबांची व त्यांची भेट झाली नाहीं. तेव्हां ते एका लिंबाच्या झाडाखालीं एकसारखें धरणें घेऊन बसले. पुढें रेसिडेंटसाहेब तेथें आले व त्यांनीं त्यांस आपल्या बंगल्यामध्यें नेलें. तेथें त्यांचें बराच वेळ संभाषण झालें. परंतु रेसिडेंटांकडून त्यांना कांहीं मदत मिळाली नाहीं. तेव्हां शेवटीं ते निराश होऊन परत राजवाड्यांत गेले. राजवाड्यामध्यें त्यांच्या गुप्त मसलतीची बातमी कळली होती; ह्मणून तिच्यावर पांघरूण घालण्याच्या उद्देशानें त्यांनीं बायजाबाईसाहेबांची भेट घेतली, व त्यांची माफी मागून झालेली चुकी पोटांत घालावी अशी त्यांची विनवणी केली; व पुनः असें करणार नाहीं ह्मणून त्यांच्याजवळ शपथ घेतली. परंतु त्यांचें हें सर्व वर्तन मायावी होतें, असें लवकरच दिसून आलें.

महाराज जनकोजीराव बायजाबाईसाहेबांच्या जवळ शपथक्रिया करून आपल्या महालांत गेले, त्याच रात्रीं, हुकूमसिंग नामक एक पलटणीवरचा नाईक अगोदर ठरलेल्या गुप्त संकेताप्रमाणें राजवाड्यांत चोरून गेला; व त्यानें जनकोजीरावांच्या महालामध्यें शिडीवरून चढून जाऊन त्यांस अचानक उचलून खालीं आणिलें. इकडे वरुण व बहादुर ह्या दोन पलटणी फितल्या असून, त्यांनीं महाराजांस हस्तगत करून त्यांच्या नांवानें द्वाही फिरविण्याचा व बायजाबाईंस कैद करण्याचा संकल्प केला होता. त्याप्रमाणें त्यांनीं महाराजांस हस्तगत करून फुलबागेमध्यें नेलें; आणि त्या बायजाबाईंस कैद करण्याच्या प्रयत्नास लागल्या. बायजाबाईसाहेबांचे बंधु हिंदुराव

ह्यांनीं महाराजांच्या चळवळीची गुप्त बातमी ठेविली होती. त्यांना महाराज राजवाड्यांतून पसार झाल्याचें वृत्त समजतांच, त्यांनीं बायजा-बाईसाहेबांवर अरिष्ट येणार असें मनांत आणून त्यांस सूचना केली. त्या वेळीं बायजाबाईसाहेब ह्या बाळाबाईच्या महालांत बसल्या होत्या. त्यांस इशारत पोहोंचतांच त्या, राजवाड्यासभोंवतालच्या सर्व सैन्याची गाफिलगिरी लक्ष्यांत घेऊन, अतिशय गुप्त रीतीनें हिंदुरावांच्या वाड्यांत निघून गेल्या. नंतर त्यांनीं निरनिराळ्या सरदार लोकांस हजर होण्या-बद्दल हुकूम पाठविले; परंतु कर्नल आलेक्झांडर ह्याच्याशिवाय तेथें एकही सरदार आला नाहीं. नंतर त्या, हिंदुराव घाटगे, आपासाहेब पाटणकर आणि आलेक्झांडरचे ७०० शिपाई ह्यांस बरोबर घेऊन मेण्यांत बसून रेसिडेन्सीकडे गेल्या. त्या वेळीं सर्व रस्त्यांची नाकेबंदी फितुर झालेल्या सैन्यानें केली होती, आणि बायजाबाईस पकडण्याकरितां चार पलटणी आणि पंचवीस तोफा तयार करून ठेविल्या होत्या. एवढ्या मोठ्या सैन्याची दृष्टि चुकवून आपला बचाव करणें फार कठीण काम होतें. परंतु बाईसाहेबांनीं मोठ्या युक्तीनें विरुद्ध पक्षाच्या हातावर तुरी देऊन आपलें संरक्षण केलें, ही फार प्रशंसनीय गोष्ट आहे. सर्व सैन्य खवळलेलें असतांना व शत्रुवर्ग आपणांस कैद करण्यास टपला असतांना त्यांच्या तावडींतून निसटून जाणें हें कृत्य सामान्य नव्हे.

बायजाबाईसाहेबांनीं रेसिडेंटांकडे अगोदर आपला हलकारा पाठ-वून आपल्या भेटीस येण्याचा उद्देश त्यांस कळविला; व सैन्याची सर्व स्थितिही जाहीर केली. रेसिडेंट मि० क्याव्हेंडिश ह्यांनीं बायजा-बाईचा निरोप पोहोंचतांच, आपले असिस्टंट क्याप्टन रॉस ह्यांस महाराजांकडे पाठवून, फितुर झालेल्या सैन्यास आंवरून धरण्याबद्दल व बायजाबाईस रेसिडेन्सीमध्यें येण्यास कोणत्याही प्रकारचा अड-थळा न करण्याबद्दल ताकीद केली. बायजाबाईस सुरक्षितपणें रेसि-

डेन्सीमध्यें येऊं दिलें, व सैन्याची कांहीं चलबिचल झाली नाहीं, तर त्यापासून जनकोजीराव ह्यांस फायदा होईल, असें मधाचें बोटही रेसिडेंटसाहेबांनीं लाविलें होतें. बायजाबाईचें रेसिडेन्सीमध्यें जाणें ह्याचा अर्थ राज्यावरील आपला सर्व हक्क सोडून देणें, असाच महाराजांनीं समजावा, अशी रेसिडेंटसाहेबांनीं महाराजांजवळ ग्वाही भरली होती असें ह्मणतात. परंतु अशा बिकट प्रसंगीं देखील केवळ आत्मसंरक्षणाकरितां बायजाबाईंनीं रेसिडेंटांजवळ राज्याचा बेदावा कधींही लिहून दिला नसता, असें त्यावेळच्या एका माहितगाराचें मत आहे.[1] अस्तु.

बायजाबाई रेसिडेन्सीमध्यें आल्या व तेथें तंबूमध्यें येऊन राहिल्या. त्यांना कैद करण्याचा महाराजांच्या सैन्याचा निश्चय असल्यामुळें त्यानें ता. ११ रोजीं पुनः बंड केलें व रेसिडेन्सीवर हल्ला करण्याचा बेत केला. ह्या हल्ल्यास भिऊन ह्मणा, किंवा लष्करी लोक हट्टास पेटले होते त्यांस संतुष्ट करण्याकरितां ह्मणा, किंवा कांहीं नाजूक राजकारणाच्या अंतस्थ उद्देशानें ह्मणा; परंतु मि० क्याव्हेंडिश ह्यांनीं सैन्याच्या वरिष्ठ अधिकाऱ्यांची भेट घेऊन, महाराज जनकोजीराव ह्यांस गादीवर बसविण्याचें त्यांस अभिवचन दिलें; आणि महाराणी बायजाबाईसाहेब ह्यांस ग्वाल्हेरीहून दूर पाठविण्याचें कबूल केलें. त्याप्रमाणें ता. १३ जुलई इ. स. १८३३ रोजीं त्यांनीं महाराज जनकोजीराव ह्यांस

---

1 "It is, however, asserted, and I can scarcely doubt the truth, that the Resident positively pledged himself to the Rajah, that he should consider the Rajah's allowing her escape to the residency as a virtual resignation of her claims; but I can assure you from personal information, that the Baiza bai never would have yielded her claims even situated as she was, for any promises of protection that the Resident could have offered."—

—*India Gazette. November 13, 1833.*

सिंहासनारूढ करून त्यांच्या नांवानें द्वाही फिरविली. व बायजाबाई ह्यांस प्रतिबंधांत ठेवून त्यांना ग्वाल्हेरच्या सरहद्दीबाहेर पाठविण्याचा निश्चय केला.

बायजाबाई रेसिडेन्सीमध्यें गेल्या व त्यांनीं रेसिडेंट मि० क्याव्हेंडिश ह्यांची भेट घेतली. परंतु त्यांस तेथील सर्व प्रकार एकदम विलक्षण दिसून आला. आजपर्यंतचा बायजाबाईचा व ब्रिटिश सरकारचा संबंध फार स्नेहभावाचा असून, हरएक बाबतींत ब्रिटिश रेसिडेंट ह्यांनीं बायजाबाईचा पक्ष घेऊन त्यांस साहाय्य केलें होतें. त्याप्रमाणें पाहिलें असतां, ब्रिटिश रेसिडेंटानें ह्या आणीबाणीच्या प्रसंगीं बायजाबाईचा पक्ष घेऊन त्यांस मदत करणें योग्य होतें. परंतु तसा कांहींच प्रकार न होतां, रेसिडेंटांनीं बायजाबाईस ग्वाल्हेरच्या गादीवर तुळसीपत्र ठेवून गंगातीरीं हरी हरी करीत बसण्याचा उपदेश करावा, व ज्या तरुण व अविवेकी महाराजांच्या कृती ब्रिटिश रेसिडेंटांस कधींही रुचल्या नव्हत्या, त्यांस एकदम गादीवर बसविण्यास त्यांची मनोदेवता प्रसन्न व्हावी, हा काय अपूर्व चमत्कार आहे हें सांगतां येत नाहीं. हिंदुस्थान सरकारांनीं हा वेळपर्यंत बायजाबाईसाहेब जें करतील तें प्रमाण समजून तटस्थ वृत्ति धारण केली होती; व ग्वाल्हेर संस्थानच्या राजकारणांत हात घालावयाचा नाहीं असा त्यांचा निश्चय होता. परंतु त्यांची ही तटस्थ वृत्ति (जीस इंग्रजीमध्यें Non-interference Policy ह्मणतात ती) एकदम बदलण्याचें काय प्रयोजन झालें असावें तें समजत नाहीं. तात्पर्य, ग्वाल्हेर येथें तरुण महाराजांच्या फुसलावणीनें जें बंड झालें, त्याचा परिणाम राज्यक्रांति हा होऊन, महाराणी बायजाबाईसाहेब ह्यांस राज्याधिकारास मुकावें लागलें; व महाराज जनकोजीराव शिंदे ह्यांच्या इच्छेप्रमाणें त्यांस गादी मिळाली. ह्या राज्यक्रांतीमध्यें आंग्ल राजनीतीचें स्वरूप एकदम कां बदललें, हें ऐंद्रजालिक गूढ

समजणें फार कठीण आहे. तथापि, वामन पंडितांनीं ह्मटल्याप्रमाणें:—

श्लोक.

केव्हां सत्य वदे वदे अनृतही केव्हां वदे गोडही ।
केव्हां अप्रियही दयालुहि असे केव्हां करी घातही ॥
जोडी अर्थहि जे यथेष्ट समयीं कीं वेंचही आदरी ।
ऐशी हे नृपनीति भासत असे वारांगनेचेपरी ॥ १ ॥

राजनीति ही चंचल व वारांगनेप्रमाणें बहुरूप धारण करणारी असल्यामुळें ती स्वार्थ साधण्याकरितां एकदम बदलली असल्यास त्यांत आश्चर्य मानण्याचेंही कारण नाहीं.[1]

---

१. शिंद्यांच्या दरबारचे सर्जन डा॰ होप ह्यांनीं ह्या प्रसंगीं इंग्लिश राजनीतीचें धोरण दर्शविलें आहे, त्यावरून इंग्रज मुत्सद्यांच्या मनांत सुप्राप्त संधीचा कांहीं तरी चांगला फायदा करून घेऊन, मुंबईपासून आड्यापर्यंतचा प्रांत ब्रिटिश राज्यास जोडून टाकावा असा हेतु होता, असें ध्वनित होतें. ते लिहितात:—

"**** Secret deliberations were there (in the Council of Calcutta) being held, with a view to discover what profit could be made out of the troubles of this weak but most faithful young prince......A demi-official letter was written to the resident, by the Chief Secretary of the Foreign Department, desiring him to learn, at a private interview, by way of a feeler if the Maharaja, encircled as he was by serious troubles—troubles mainly caused by our Government—would like to resign; assigning over the country to the British Government, and receiving a handsome pension, which would be paid out of his own revenues. There can be very little doubt that this demi-official document was of the genus *mystic*, and that no copy of it can now be found among the archives pertaining to India. Mr. Cavendish, than no Englishman ever attained a greater ascendancy over the minds of the natives with whom he had concern, declined to make such a suggestion, and his answer

बायजाबाई रेसिडेन्सीमध्यें आल्यानंतर, ब्रिटिश रेसिडेंट मि० क्याव्हेंडिश ह्यांनीं त्यांस ग्वाल्हेर सोडून बाहेर जाल, तर महाराज जनकोजीराव ह्यांचेकडून तुह्मांस कांहीं उपद्रव होणार नाही, असें अभिवचन दिलें; व त्यांना आपखुषीनें किंवा खुषीच्या सक्तीनें ग्वाल्हेर संस्थानच्या बाहेर पाठविलें. बायजाबाईसाहेब ह्यांजवर ह्या वेळीं महत्संकट आल्यामुळें त्यांना नाइलाजास्तव ब्रिटिश रेसिडेंटाचें ह्मणणें कबूल करावें लागलें, व तत्काळ त्या ग्वाल्हेर सोडून प्रथमतः सहा मैल अंतरावर कसोली ह्मणून गांव आहे तेथें गेल्या; व तेथून धोलपुरास गेल्या. धोलपूर येथें त्यांनीं कांहीं दिवस मुक्काम केला व ब्रिटिश सरकारास विनंतिपत्रें पाठवून आपली दाद घ्यावी ह्मणून विनंति केली. परंतु तिचा कांहींएक उपयोग झाला नाहीं. उलट, त्या परत ग्वाल्हेरीस येऊन कांहीं गडबड करतील ह्मणून त्यांस आग्र्यास दूर अंतरावर पाठविलें. धोलपुराहून त्या गेल्या, त्या वेळीं त्यांचेजवळ ५००० पाय-

---

threw a damp upon the hopes of the annexationists......When his refusal to put the question of the pension reached Calcutta, and it was known then that all tumult had passed away, intense was the displeasure in all quarters......Presently another demi-official letter arrived; this time from the Deputy Secretary of the Foreign Department–a '*mystic*' one we may be quite sure–strongly expostulating with Mr. Cavendish upon his proceeding, and concluding with this significant remark:—'you have thus allowed a favourable chance to escape of connecting the Agra to the Bombay Presidency.' Of course the Resident's doom was fixed, though not just then declared. A few months afterwards, the Governor-General gratified his feelings of resentment by removing Mr. Cavendish to another native court."

—*The House of Scindiea. Page.* 27-28.

दळ व १००० घोडेस्वार होते. आग्र्यास गेल्यानंतर बायजाबाईसाहेब ह्या रिकाबागंजामध्यें बिद्दीचंद्र शेट ह्यांच्या वाड्यांत राहिल्या होत्या. ग्वाल्हेरीहून आग्र्यास जाईतोंपर्यंत त्यांचे प्रवासामध्यें फार हाल झाले व ब्रिटिश सरकारच्या गैरमर्जीचीं कटु फलेंही अनुभवण्याचे त्यांस अनेक प्रसंग आले.

बायजाबाईसाहेब ग्वाल्हेरीहून गेल्यानंतर ब्रिटिश रेसिडेंट मि० क्याव्हेंडिश ह्यांनीं महाराज जनकोजीराव शिंदे ह्यांस राज्यारूढ करून सर्व मुखत्यारी दिली. महाराज जनकोजीराव हे ग्वाल्हेरच्या सैन्याच्या प्रमुख अधिकाऱ्यांच्या सर्वस्वीं आधीन होऊन त्यांच्या तंत्रानें वागूं लागले. त्यामुळें ते अधिकारी फार प्रमत्त होऊन, ग्वाल्हेरचें राज्य ह्मणजे केवळ लष्करी लोकांचें साम्राज्य झालें. महाराजांनीं नारोपंत आपटे ह्यांस दिवाणगिरीचीं वस्त्रें दिलीं, व रामराव फाळके, बळवंत-सिंग मुनशी, मुल्लाजी शेट, उदाजी खडके, भाऊ पोतनीस वगैरे लोकांस दरबारांतील अधिकाराचीं कामें दिलीं. परंतु त्यांची एकंदर कारकीर्द अस्वस्थतेची व बेबंदशाहीची होऊन राज्यामध्यें एकसारखे तंटेबखेडे व दगंधोपे चालले होते. महाराजांनीं बायजाबाईच्या वेळचे खजिन्याचे प्रमुख अधिपति मणीरामशेट ह्यांस कैद केलें व त्यांचा फार छल केला; त्याचप्रमाणें बायजाबाईंच्या लोकांचाही फार छल केला. तात्पर्य, बायजाबाईंच्या पश्चात् ग्वाल्हेर येथें बिलकूल शांतता न राहून प्रजा फार असंतुष्ट झाली. ह्या वेळीं ग्वाल्हेर दरबारांतील सर्व राजका-रणांवर एकसारखी नजर ठेवण्यास मि० क्याव्हेंडिश ह्यांच्यासारखे खबरदार रेसिडेंट होते, ह्मणून रक्तपातासारखे भयंकर अनर्थ गुदरले नाहींत, हें भाग्यच समजलें पाहिजे.

ग्वाल्हेर सोडल्यापासून बायजाबाईंच्या पाठीमागें एकसारखें दुर्दैव लागलें होतें. आग्र्यास गेल्यानंतर त्यांची एकुलतीएक मुलगी चिमणा-

बाईसाहेब ही ता. १४ आक्टोबर इ. स. १८३३ रोजीं बाळंत होऊन मृत्यु पावली. तिच्या मृत्यूनें बायजाबाईंवर दुःखाचा डोंगर कोसळल्यासारखें झालें. ही मुलगी फार सुस्वरूप व सुस्वभावी अशी होती. बायजाबाईंची हिजवर अत्यंत प्रीति असून, ती केवळ त्यांना जीव कीं प्राण वाटत असे. अशा मुलीच्या मृत्यूनें त्यांची स्थिति अतिशय करुणास्पद व हृदयद्रावक व्हावी हें साहजिक आहे. स्वातंत्र्यहीन व राज्यहीन होऊन त्यांत आणखी प्रियकर अपत्याचा विरह व्हावा, ह्यापेक्षां अधिक दुःखाची गोष्ट कोणती आहे? दुर्दैवानें दुःखपरंपरा सुरू झाली ह्मणजे ती मनुष्याचा कसा छल करिते, ह्याचें उदाहरण ह्या अभागी राजस्त्रीच्या अनुभवावरून घेण्यासारखें आहे. कवि मोरोपंत ह्यांनीं एके ठिकाणीं ह्मटलें आहे:—

आर्या.

**अनुकूल दैव असतां न समर्थ करावयासि हानि यम ।**
**होतां तें प्रतिकूल प्रबलहि दुर्बलचि होय हा नियम ॥**

हें अक्षरशः खरें आहे.

बायजाबाईसाहेबांनीं आग्र्याहून ब्रिटिश रेसिडेंट व हिंदुस्थान सरकार ह्यांना आपलीं दुःखें कळवून, त्यांनीं राज्याधिकार परत द्यावा अशाबद्दल वारंवार खलितें पाठविले; परंतु त्यांचा कांहीं उपयोग झाला नाहीं. उलट, त्यांचें आग्र्यास राहणें ग्वाल्हेरच्या सरहद्दीनजीक असल्यामुळें त्यांच्या गुप्त कटानें ग्वाल्हेर संस्थानास अपाय पोहोंचेल, ह्मणून त्यांची रवानगी आग्र्यापासून दूर अशा फत्तेगड गांवीं केली. व त्याप्रमाणें त्यांस कांहीं दिवस फत्तेगड ऊर्फ फरुकाबाद येथें एका निळीच्या कारखान्यामध्यें राहण्याचा प्रसंग आला. त्यावेळच्या त्यांच्या स्थितीबद्दल 'दिल्ली गॅझेट' 'मुफसल आखबार' वगैरे पत्रांत जे लेख प्रसिद्ध झाले आहेत, त्यांत त्यांची शोचनीय स्थिति व हालअपेष्टा ह्यांचें वर्णन

केलेलें दृष्टीस पडतें. फत्तेगड येथून बायजाबाईंनीं, श्रीभागीरथीच्या तीरीं शृंगीरामपूर क्षेत्रीं राहाण्याबद्दल आपला मानस गव्हरनरजनरलसाहेबांस कळविला, परंतु तीही त्यांची विनंति मान्य झाली नाहीं. बायजाबाई-साहेब ह्या इ. स. १८३५ सालच्या अखेरपर्यंत फत्तेगड येथेंच होत्या. नंतर कोर्ट ऑफ डायरेक्टर ह्यांनीं त्यांना काशीस किंवा दक्षिणेंत जाण्याबद्दल सक्तीचा हुकूम पाठविला; व तो अमलांत आणण्यास त्यांस एक महिन्याची मुदत दिली. त्याप्रमाणें त्यांचें निघणें न झाल्यामुळें त्यांस क्याप्टन रॉस ह्यांनीं लष्करी साहाय्यानें फरुकाबादेहून अलहाबादेस आणिलें.

नंतर कांहीं दिवस बायजाबाईसाहेबांनीं अलहाबाद येथें व बनारस येथें वास केला. पुढें इ. स. १८४० सालीं हिंदुस्थान सरकारनें मुंबई सरकारच्या परवानगीनें त्यांस गोदावरी नदीच्या कांठीं नासिक येथें राहण्याची मोकळीक दिली व चार लक्ष रुपये पेनशन करून दिलें. त्याप्रमाणें बायजाबाईसाहेब दक्षिणेंत येऊन नासिक येथें राहिल्या. इ. स. १८४० पासून इ. स. १८४५ पर्यंत त्यांचें वास्तव्य दक्षिणेंतच होतें. मध्यंतरीं ता. ७ फेब्रुवारी इ. स. १८४३ रोजीं महाराज जनकोजीराव शिंदे हे मृत्यु पावले. मृत्युसमयीं त्यांची इच्छा बायजाबाईसाहेब ह्यांस भेटावें अशी फार होती. परंतु त्यांस ब्रिटिश सरकारची परवानगी न मिळाल्यामुळें तो योग घडून आला नाहीं. मृत्यूपूर्वीं महाराजांस आपल्या वर्तनाचा पश्चात्ताप होऊन, बायजाबाईसाहेबांची माफी मागावी व आपला राज्यकारभार पुनः त्यांचे स्वाधीन करावा, असाही सुविचार उत्पन्न झाला होता, असें ह्मणतात.

महाराज जनकोजीराव ह्यांस औरस संतती नसल्यामुळें ब्रिटिश सरकारच्या परवानगीनें दरबारचे मुत्सद्दी कृष्णराव मामासाहेब कदम ह्यांनीं त्यांच्या अल्पवयी महाराणी ताराबाई ह्यांचे मांडीवर शिंद्यांच्या

वंशजांपैकीं हणमंतराव ह्यांचा मुलगा भगीरथराव ह्यांस ता. १९ फेब्रुवारी इ. स. १८४३ ह्मणजे माघ वद्य ५ शके १७६४ रोजीं दत्तक देऊन त्यांचें नांव महाराज जयाजीराव असें ठेविलें, व राज्यकारभार आपल्या हातीं घेतला. परंतु पुढें मामासाहेब व दादासाहेब खाजगीवाले ह्या दरबारांतील प्रमुख पुढाऱ्यांचा बेबनाव होऊन सर्वत्र घोंटाळा झाला; व राज्यामध्यें अशांतता उत्पन्न होऊन ग्वाल्हेर दरबार व इंग्रज सरकार ह्यांच्यामध्येंही तेढ उत्पन्न झाली. अखेर हिंदुस्थानचे गव्हरनरजनरल ह्यांस ग्वाल्हेर दरबारांतील राजकारणाचे घोंटाळे नाहींसे करण्याकरितां ग्वाल्हेर येथें स्वतः येण्याचा प्रसंग आला. त्याप्रमाणें त्यांची स्वारी ग्वाल्हेरजवळ हिंगोणा येथें आली. तेथें त्यांच्याशीं तडजोड करण्याकरितां दरबारच्या वतीनें बापू शितोळे हे गेले होते. परंतु सुलभ रीतीनें व सरळपणानें ह्या राजकारणाचा निकाल न लागतां, शिंद्यांचें सैन्य व इंग्रजांचें सैन्य ह्यांची महाराजपूर व पनियार येथें लढाई झाली.

महाराजपूर व पनियार येथें शिंद्यांच्या पक्षास अपयश आल्यानंतर, गव्हरनरजनरलसाहेबांनीं महाराज जयाजीराव शिंदे ह्यांस आपल्या ताब्यांत घेऊन, त्यांस ता. १३ जानेवारी इ. स. १८४४ रोजीं पुनः गादीवर बसविलें; व ते अज्ञान आहेत तोंपर्यंत त्यांचा राज्यकारभार पाहण्याकरितां रामराव फाळके, देवराव जाधव, मुनशी राजे बळवंतराव बहादुर, उदाजीराव घाटगे, मुल्लाजी शेट आणि नारायणराव भाऊ पोतनीस ह्या सरदारांचें मंत्रिमंडळ नेमिलें. ह्या मंत्रिमंडळाशीं तह करून, शिंदे सरकारानें सैन्याच्या खर्चाकरितां १८ लक्षांचा मुलूख कंपनी सरकाराकडे नेमून द्यावा, व ग्वाल्हेर संस्थानांत फक्त ६००० स्वार, ३००० पायदळ, ३२ तोफा आणि २०० गोलंदाज इतकें सैन्य ठेवावें वगैरे महत्वाचे मुद्दे ठरविले. ह्याप्रमाणें तह झाल्यानंतर ग्वाल्हेर येथें शांतता स्थापित झाली व संस्थानचा राज्यकारभार इ.

स. १८५३ पर्यंत मंत्रिमंडळाचे विद्यमानें चालला. नंतर महाराज जयाजीराव शिंदे हे वयांत आले, व त्यांस हिंदुस्थान सरकारानें सर्व राज्याची मुखत्यारी दिली.

येणेंप्रमाणें स्थिरस्थावर झाल्यानंतर बायजाबाईसाहेब ह्या पुनः उत्तर हिंदुस्थानांत गेल्या, त्या मग अखेरपर्यंत तिकडेच राहिल्या. महाराज जयाजीराव शिंदे ह्यांनीं आपल्या वृद्ध आजीबाईचा परामर्ष उत्तम रीतीनें घेऊन, त्यांस जनकोजीरावांच्या कारकीर्दींत जीं दुःखें भोगावीं लागलीं, त्यांचा विसर पडेल अशा रीतीनें प्रेमादरपूर्वक वागविलें, हें त्यांस अत्यंत भूषणावह होय. बायजाबाईनीं आपली नात जयाराजा ही खानविलकर घराण्यांत दिली होती; तिची कन्या चिमणाराजा ही जयाजीराव शिंदे ह्यांस देऊन ह्या उभयतांशीं वात्सल्यभावाचें वर्तन केलें. बायजाबाईसाहेब ह्या जयाजीराव महाराजांच्या कारकीर्दींत उज्जनी व लष्कर येथेंच राहत असत. ब्रिटिश सरकारानेंही इ. स. १८४४ नंतर त्यांचे सर्व प्रतिबंध दूर करून, त्यांना पूर्ण स्वातंत्र्य दिलें होतें. त्याचें फळ त्यांस इ. स. १८५७ सालीं फार उत्तम प्रकारचें मिळालें.





## भाग ८ वा.

### बायजाबाईसाहेबांच्या कांहीं गोष्टी.

बायजाबाईसाहेबांच्या राजकीय चरित्राविषयीं ह्मणजे त्यांच्या राज्यकारभाराविषयीं जी माहिती उपलब्ध झाली आहे, ती स्वतंत्र भागांत निवेदन केली आहे. आतां त्यांच्या खाजगी चरित्राविषयीं—ह्मणजे स्वभाव, दिनचर्या, वर्तनक्रम, औदार्य वगैरे गोष्टींविषयीं दोन शब्द सांगणें जरूर आहे. बायजाबाईसाहेब ह्यांची दिनचर्या किंवा रोजनिशी लिहून ठेविलेली अद्यापि उपलब्ध झालेली नाहीं. तेव्हां त्यांच्या खाजगी चरित्राबद्दल पाश्चिमात्य लोकांनीं आपल्या प्रवासवृत्तांतामध्यें जी माहिती लिहिली आहे व जे उल्लेख नमूद केले आहेत, त्यांच्यावर सर्वस्वीं अवलंबून राहणें भाग आहे. अशा प्रकारचे पाश्चिमात्य ग्रंथकारांचे लेख व ग्वाल्हेर दरबारांतील माहितगार व जुन्या लोकांच्या मुखांतून ऐकलेल्या आख्यायिका ह्यांच्या आधारानें हा भाग तयार केला आहे.

#### स्वरूप.

बायजाबाईसाहेब ह्या फार सौंदर्यवती होत्या अशी ख्याति आहे. ह्यांच्या लावण्यास लुब्ध होऊन दौलतराव शिंदे ह्यांनीं तत्प्राप्त्यर्थ शेवटच्या बाजीरावास गादीवर बसविलें, व त्यांचे वडील सर्जेराव घाटगे ह्यांस आपली दिवाणगिरी दिली, ही गोष्ट मागें सांगितलीच आहे. ह्यांच्या रूपगुणसंपन्नतेसंबंधानें एका एतद्देशीय ग्रंथकारानें "ही शहाणी, सद्गुणी, सुशील तशीच लावण्यरूपवती होती" असें वर्णन केलें आहे. कित्येक आंग्ल स्त्रियांनींही ह्यांच्या स्वरूपाचें व दरबाराचें प्रसंगानुरूप जें वर्णन लिहिलें आहे, त्यांत बरीच विस्तृत माहिती दिली आहे.

मिसेस फेनी पार्क्स नामक एका आंग्ल युवतीनें बायजाबाईसाहेबांची ता. १२ एप्रिल इ. स. १८३५ रोजीं फत्तेगड येथें भेट घेतली. त्या भेटीच्या वर्णनांत त्यांच्या स्वरूपाबद्दल पुढें लिहिल्याप्रमाणें उल्लेख केला आहेः—"महाराणीसाहेब ह्या भरगच्चीच्या गादीवर आपली नात गजराजासाहेब हिला घेऊन बसल्या होत्या. त्यांच्यासभोंवतीं त्यांच्या परिचारिका उभ्या होत्या; आणि शिंदे सरकारची तरवार त्यांच्या गादीवर त्यांच्या पायाजवळ ठेविली होती. आह्मी त्यांच्याजवळ जातांच, आमचा आदरसत्कार करण्याकरितां त्या उठून उभ्या राहिल्या, व आपल्यासन्निध त्यांनीं आह्मांस जागा घेतली. बायजाबाईसाहेब ह्या बऱ्याच वृद्ध झाल्या असून त्यांचे केश शुभ्र झाले आहेत; व त्यांचें शरीर किंचित् स्थूल झालें आहे. त्या आपल्या तारुण्यामध्यें फारच सुंदर असल्या पाहिजेत. त्यांचें हास्य अतिशय मधुर असून त्यांचें बोलणेंचालणें विशेष चित्ताकर्षक आहे. त्यांचे हातपाय लहान असून, फार नाजूक व सुंदर आहेत. त्यांची मुखचर्या फार शांत आणि निष्कपट असून, त्यांच्या मुद्रेवर जें स्वातंत्र्य आणि जी प्रगल्भता दिसत होती, तिची मला फार प्रशंसा केल्यावांचून राहवत नाहीं. हे गुण अफू खाऊन सदैव सुस्त व निद्रावश झालेल्या मुसलमान स्त्रियांच्या चेहऱ्यावर मला दिसून आले नाहींत."[1]

---

1. "We found her Highness Baiza Baie seated on her guddee of embroidered cloth with her grand-daughter the Gaja Rajah Sahib at her side; the ladies, her attendants, were standing around her; and the sword of Scindia was on the guddee, at her feet. She rose to receive and embrace us, and desired us to be seated near her. The Baiza Baie is rather an old woman, with grey hair and *en bon point*. She must have been pretty in her youth; her smile is remarkably sweet, and her manners particularly pleasing; her hands and feet are very small and beautifully formed......Her countenance is very mild and open; there is a freedom and independence in her air that I greatly admire, so unlike that of the sleeping, languid, opium-eating Mussalmanees."

दुसरी आंग्ल स्त्री धि ऑनरेबल एमिली ईडन हिनें ता. ७ डिसेंबर इ. स. १८३७ रोजीं अलहाबाद मुक्कामीं हिंदुस्थानचे गव्हरनरजनरल लॉर्ड ऑक्लंड ह्यांचेबरोबर बायजाबाईसाहेबांची भेट घेतली. त्या वेळीं तिनें "बायजाबाई ह्या वृद्ध असून दिसण्यांत हुशार आहेत, व त्यांचे चेहऱ्यावर सौंदर्याचा अंश अद्यापि कायम आहे" असें वर्णन केलें आहे. ह्यानंतर इ. स. १८५८ सालीं मिसेस ड्युबर्ली नामक दुसऱ्या एका आंग्ल युवतीनें बायजाबाईची भेट घेतली होती. त्या प्रसंगीं तिनें त्यांच्याबद्दल असा उल्लेख केला आहे:—"बायजाबाईसाहेब ह्या पडद्याजवळ उच्च स्थानीं बसल्या होत्या. त्यांच्या साधेपणामुळें व त्यांच्या प्रौढ व गंभीरवर्तनामुळें माझें लक्ष्य चटकन् त्यांच्याकडे गेलें. त्यांचे नेत्र अद्यापि विलक्षण तेजस्वी दिसतात; त्यांकडे पाहून, प्रकाशामध्यें द्राक्षार्क धरिला असतां त्याची जी चमक दृष्टीस पडते, तिचें मला स्मरण झालें. त्यांचें वय ७० वर्षांपेक्षां अधिक आहे; परंतु त्यांच्या जास्वल्य आणि राजकारण-प्रचुर तारुण्यावस्थेंत त्यांच्या ठिकाणीं जो उत्साह होता, तो अद्यापि कायम आहे." ज्या अर्थी आंग्ल स्त्रियांनीं बायजाबाईसाहेबांच्या उतारवयामध्यें देखील त्यांच्या स्वरूपाबद्दल इतके चांगले उद्गार काढिले आहेत, त्या अर्थी तारुण्यावस्थेंत तें अप्रतिम असलें पाहिजे हें उघड आहे.

1. "She is a clever-looking little old woman, with remains of beauty." —*Up the country.* Vol. 11 Page 65.

2. "The Bhae-sa-bhae sat in the place of honour next the purdah, and arrested my attention at once, both by the simplicity of her toilette and the great dignity and self-possession of her deportment. The lustre of her still glorious eyes reminded me of the light which shines through port-wine when held against the light. She is over seventy years of age, but apparently as energetic as in the days of her fiery and intriguing youth." —*Mrs. Duberly.*

## पोषाख व राहणी.

बायजाबाईसाहेब ह्यांचा पोषाख व राहण्याची तऱ्हा फार साधी असे. दौलतराव शिंदे वारल्यानंतर त्यांनीं केव्हांही अलंकार धारण केले नाहींत. त्या मोठ्या पतिनिष्ठ होत्या व त्यांच्यावर त्यांच्या पतीचें प्रेमही पराकाष्ठेचें होतें. ब्रौटन नामक एका लष्करी अधिकाऱ्यानें आपल्या पुस्तकांत असें लिहिलें आहे कीं, "सर्जेरावांचा भयंकर रीतीनें खून झाल्याचें वृत्त बायजाबाईस ज्या वेळीं समजलें, त्या वेळीं त्या दुःखसागरांत बुडून गेल्या. त्या प्रसंगीं खुद्द दौलतराव शिंदे ह्यांनीं त्यांचें सांत्वन केलें व त्यांचे अश्रु स्वतः आपल्या हातांनीं पुशिले." ह्यावरून त्यांच्या पतिप्रेमाची कल्पना करितां येईल. अर्थात् अशा प्रियकर पतीचा वियोग झाल्यामुळें बायजाबाईसाहेबांस आजन्म दुःख व्हावें हें साहजिक आहे. त्यांनीं हिंदुस्थानांतील साध्वी व सुशील स्त्रियांप्रमाणें आपल्या पतीच्या पश्चात् आपले सौभाग्यालंकार व सर्व राजविलास सोडून दिले होते, आणि राज्याधिकाराची परिसमाप्ति झाल्यानंतर त्यांनीं आपलें सर्व लक्ष्य पारमार्थिक कृत्यांत घातलें होतें. त्या फक्त साधीं वस्त्रें परिधान करीत असत; आणि जमिनीवर निजत असत. मिसेस फेनी पार्क्स ह्या बाईनें ह्या गोष्टीचादेखील उल्लेख आपल्या प्रवासवृत्तामध्यें केला आहे. "बायजाबाई ह्या अगदीं साधें रेशमी वस्त्र नेसल्या होत्या. त्यांच्या हातांत सोन्याच्या साध्या पाटल्या मात्र होत्या. त्याशिवाय त्यांच्या अंगावर एकही अलंकार नव्हता. वैधव्यदशा प्राप्त झाल्यापासून त्यांनीं रत्नालंकारांस स्पर्श केला नाहीं. त्यांनीं अनेक नेमधर्म व उपासतापास स्वीकारिले होते. त्या सदोदित जमिनीवर निजत असत. त्यामुळें त्यांस संधिवाताची विकृति झाली. तेव्हांपासून त्यांच्या अंगाखालीं जाड्याभरड्या कापडाची गादी असे. परंतु त्या कधींही पलंगावर निजल्या नाहींत."

## स्वभाव.

सर्जेराव घाटगे यांचा स्वभाव क्रूर व तामसी असल्यामुळें त्यांच्याप्रमाणेंच त्यांच्या कन्येचा स्वभाव असेल, असें समजून पुष्कळ लोक बायजाबाईस क्रूर व जुलमी राजस्त्रियांच्या मालिकेंत गोंवितात. परंतु वास्तविक त्यांचा स्वभाव तशा प्रकारचा नव्हता. त्या 'मानोहि महतां धनम्' ह्या कोटींतल्या असल्यामुळें फार मानी व पाणीदार होत्या. त्यामुळें त्यांच्या वृत्तीमध्यें थोडासा तापटपणा आला होता. त्याचप्रमाणें त्यांची कदर प्रखर असल्यामुळें त्या विशेष करारी व दृढनिश्चयी अशा भासत होत्या. परंतु सर्जेरावांचे दुर्गुण त्यांचे अंगांत वसत होते असें दिसत नाहीं. मिल्लसाहेबांनीं बायजाबाईच्या राज्यकारभाराविषयीं लिहितांना, "ती स्वभावानें कडक होती, तथापि क्रूर किंवा खुनशी नव्हती." ह्मणून त्यांच्या स्वभावाचें जें वर्णन केलें आहे, तेंच खरें आहे. त्यांना मानहानि किंवा उपमर्द सहन होत नसे. त्याबद्दल मात्र त्या कडक शिक्षा देत असत. परंतु, विनाकारण अनाथाचा छल करणें, किंवा अन्यायानें प्रजेस पीडा देणें, वगैरे प्रकार त्यांचे हातून कधीं घडल्याचें आढळून येत नाहीं. एवढेंच नव्हे, तर प्रजेस सुख देण्याविषयीं व गरीब लोकांवर उपकार करण्याविषयीं त्या सदोदित दक्ष असत.

## औदार्य.

बायजाबाईसाहेब ह्यांच्याजवळ द्रव्य विपुल होतें व कांहीं अंशीं तेंच त्यांच्या त्रासास मुख्य कारण झालें होतें. तथापि त्यांनीं आपल्या द्रव्याचा पुष्कळ चांगल्या रीतीनें व्यय केला. त्यांनीं काशीपासून रामेश्वरापर्यंत तीर्थयात्रा केल्या व अनेक ठिकाणीं बहुत दानधर्म केला. काशी येथें त्यांनीं एक सुंदर घाट बांधिला आहे, व पंढरपूर मुक्कामीं श्रीद्वारकाधीशाचें मंदिर बांधिलें आहे. काशी येथील बायजाबाईचा घाट अवलोकन

करून मिसेस फेनी पार्क्स ह्यांनीं असें लिहिलें आहे कीं, "बायजाबाईंचा घाट पाहण्यापूर्वीं मला असें वाटत होतें कीं, चिमाजीआपा पेशव्यांचा घाट सर्वांत उत्तम आहे. परंतु बायजाबाई जो घाट बांधीत आहेत, तो पाहिला ह्मणजे त्याच्यापुढें पहिल्याचें सौंदर्य लुप्त होतें. ह्या घाटाचा आकार इतका विस्तृत, इतका सुंदर, इतका साधा आणि इतका प्रमाणशुद्ध आहे कीं, तो पाहून मला फार हर्ष झाला. काशींतील सर्व घाटांमध्यें हा घाट अतिशय सुंदर आहे ह्यांत शंकाच नाहीं." ह्या घाटाकरितां बायजाबाईंनीं ३७ लक्ष रुपये खर्च करण्याचा संकल्प केला होता; परंतु त्यांच्या द्रव्यावर मध्यंतरीं विघ्नें आल्यामुळें त्यांच्या हेतूप्रमाणें काम झालें नाहीं. पंढरपूर येथील द्वारकाधीशाचें मंदिरही असेंच सुंदर आहे. ह्यासही सुमारें दोन लक्ष रुपये खर्च झाला. हें देऊळ इ. स. १८४९ सालीं बांधण्यांत आलें. काशी, पंढरपूर वगैरे क्षेत्रीं बायजाबाईसाहेबांनीं अन्नछत्रें स्थापन केलीं होतीं, व तेथील देवालयांस देणग्या व उत्पन्नें पुष्कळ दिलीं होतीं. त्यांच्या दानधर्माची व देवस्थानांस दिलेल्या वर्षासनांची बरोबर माहिती मिळाली नाहीं. तथापि त्यांचें औदार्य थोर असून त्यांनीं बहुत धर्मकृत्यें केलीं व सर्व जनांवर उपकार केले, असें स्थूलमानानें ह्मणण्यास हरकत नाहीं.

## आवड.

बायजाबाईसाहेबांस घोड्यावर बसण्याचा फार षोक असे. मि० फेनी पार्क्सबाई ह्यांनीं बायजाबाईंचे बसण्याचे घोडे पाहिले होते. त्यांना घोड्यावर बसण्याचा नाद विशेष असून त्या अश्वपरीक्षेंत फार निपुण होत्या, असें त्यांनीं वर्णन केलें आहे. त्यांचा घोड्यावर बसून फेरफटका करण्याचा नित्यक्रम असे. कोणी आंग्ल स्त्रिया त्यांस भेटण्यास गेल्या, ह्मणजे त्यांना घोड्यावर बसतां येतें कीं नाहीं, ह्याची चौकशी केल्यावांचून त्या राहत नसत; एवढेंच नव्हे, तर त्या त्यांची परीक्षाही घेत

असत. त्याचप्रमाणें युद्धवार्ता विचारण्यांत त्यांना नेहमीं आनंद वाटत असे. मिसेस ड्युबर्ली नामक एका आंग्ल स्त्रीस त्यांनीं रशियांतील युद्धाच्या गोष्टी विचारिल्या होत्या. त्यांना आपण घोड्यावर बसण्यांत पटाईत आहों हें सांगण्यांत फार भूषण वाटत असे. नेहमीं त्या वेलस्ली साहेबांच्या वेळच्या युद्धाच्या गोष्टी सांगत; आणि रणांगणांतून घोड्यावर बसून आपण कसें निसटून आलों, तें मोठ्या कौतुकानें व गर्वानें निवेदन करीत.[१] त्यांनीं आपल्या जवळच्या सर्व दासींना व सरदारांच्या स्त्रियांना घोड्यावर बसण्यास शिकविलें होतें, व बायकांच्या घोडेस्वारांची एक स्वतंत्र पलटणही तयार केली होती.

बायजाबाईच्या आवडीबद्दल मिसेस फेनी पार्क्स ह्यांच्या प्रवासवृत्तामध्यें एक मौजेचा उल्लेख आहे. ही आंग्ल स्त्री ज्या वेळीं इंग्लंडास परत गेली, त्या वेळीं बायजाबाईनीं तिला आपल्या आवडीच्या तीन वस्तू इंग्लंडाहून पाठविण्याबद्दल सांगितलें होतें. त्या येणेंप्रमाणें:– १ एक अतिशय उमदी व अस्सल जातीची आरबी घोडी. २ एक अगदीं चिमुकलें–चेंडूएवढें, सफेत रंगाचें, लाल डोळ्यांचें व लांब केंसाचें कुत्रें. आणि ३ एक वाद्य वाजविणारी कळसूत्री बाहुली!

---

१ बायजाबाईसाहेब ह्या घोड्यावर बसण्यांत पटाईत असून त्यांनीं समरांगण पाहिलें होतें असा उल्लेख दोन आंग्ल स्त्रियांनीं केला आहे. मिसेस फेनी पार्क्स ह्यांनीं पुढील लेख लिहिला आहे:–

"The ladies relate, with great pride, that in one battle, her Highness rode at the head of her troops, with a lance in her hand, and her infant in her arms!"

मिसेस ड्युबर्ली ह्यांनीं खुद्द बायजाबाईच्या तोंडचेच पुढील उद्गार दिले आहेत:—

"I, too, have ridden at a battle: I rode when Wellesley Saib drove us from the field, with nothing but the saddles on which we sat."

## आदरातिथ्य.

बायजाबाई ह्या मनानें उदार असून आदरसत्कार करण्यांत फार तत्पर असत. ह्यांनीं लॉर्ड वुइल्यम बेंटिंक व लॉर्ड ऑक्लंड ह्या गव्हरनर-जनरलसाहेबांच्या भेटी घेतल्या होत्या, व त्यांचा आदरसत्कार उत्तम प्रकारचा केला होता. त्या सर्व युरोपियन लोकांशीं फार चांगल्या रीतीनें वागत, आणि त्यांचा सत्कार करण्यांत औदार्य दाखवीत. त्यांच्या पाहुणचारानें संतुष्ट झाला नाहीं, असा एकही युरोपियन गृहस्थ सांपडणें विरळा. बायजाबाईसाहेबांचें हें आदरकौशल्य पाहून युरोपियन लोक त्यांची फार तारीफ करीत असत.

## स्वाभिमान व उपचारप्रियता.

बायजाबाईसाहेब ह्या फार तेजस्वी व अभिमानी असून त्यांस मानपान विशेष आवडत असे व त्यांत यत्किंचित् देखील अंतर पडलेलें त्यांस खपत नसे. त्यामुळें त्यांच्या दरबारी लोकांस ह्याबद्दल फार काळजी बाळगावी लागत असे. त्यांत कोठें न्यून पडलें तर बाईसाहेबांकडून कडक शिक्षा होत असे. ह्या त्यांच्या सन्मानप्रियतेमुळें ग्वाल्हेर दरबारचीं शिस्त फार कडक व विशेष आदबशीर झाली होती. त्यामुळें एतद्देशीय लोकांस व युरोपियन लोकांस त्याबद्दल फार जपावें लागत असे. त्यांच्या दरबारचे शिष्टाचार ह्मणजे एकप्रकारची प्रतिष्ठित शिक्षाच होऊन राहिली होती. युरोपियन लोकांनीं देखील बूट काढून त्यांच्या दरबारांत गेलें पाहिजे, असा त्यांचा सक्त नियम असे. परंतु तो शिंद्यांच्या स्वातंत्र्याच्या उतरत्या कलेप्रमाणें पुढें नाहींसा होत चालला. ह्या उपचारप्रियतेमुळें बायजाबाईसाहेबांच्या दरबारांत नेहमीं चमत्कारिक गोष्टी घडत असत. हिंदुस्थानचे मुख्य सेनाधिपति लॉर्ड कोंबरमियर हे इ. स. १८२९ सालीं ग्वाल्हेर येथें आले. त्या वेळीं

हिंदु दरबारच्या चालीप्रमाणें त्यांनीं बूट काढून आलें पाहिजे, असा आग्रह बाईसाहेबांच्या दरबारी मंडळीनें केला. परंतु लॉर्ड कोंबरमियर ह्यांचे दुभाषे मेजर मेकन ह्यांनीं, "जे सन्मान आह्मी इंग्लंडच्या राजाच्या दरबारीं अमलांत आणितों, तेच आह्मी येथें करूं. त्यापेक्षां अधिक उपचार आह्मी करणार नाहीं" असें उत्तर दिलें. हें उत्तर बायजाबाईसाहेबांस व त्यांच्या दरबारी मंडळीस रुचलें नाहीं. त्यांचें ह्मणणें असें पडलें कीं, "भिन्न भिन्न देशांत सन्मानाच्या रीति वेगवेगळ्या आहेत. तेव्हां आमच्या दरबारांत ज्या असतील त्या तुह्मीं पाळल्या पाहिजेत." परंतु ही गोष्ट लॉर्ड कोंबरमियर ह्यांच्या पक्षानें मान्य केली नाहीं. अखेर होय नाहीं करितां करितां, दरबारचा समारंभ व भेटी वगैरे झाल्या. ह्या दरबारामध्यें बायजाबाईसाहेबांनीं सर्व युरोपियन लोकांस बुटांसह येऊं दिलें. परंतु आपल्या चालीप्रमाणें दरबारामध्यें खुर्च्या न मांडितां, रुजाम्यावर गालिचे घालून, मराठी तऱ्हेची बिछायत मांडली. त्यामुळें तंग विजारी घातलेल्या ह्या आंग्ल वीरांस तिच्यावर बसणें फार कठीण पडलें. ह्यामुळें जो प्रकार घडला तो वर्णन करणें कठीण आहे!! तात्पर्य, बायजाबाईसाहेबांच्या स्वाभिमानामुळें व उपचारप्रियतेमुळें ग्वाल्हेर येथें त्या कालीं अशा गोष्टीं वारंवार घडत असत.

---

१ ह्या गोष्टीचा उल्लेख लॉर्ड कोंबरमियर ह्यांच्या चरित्रांत देखील आलेला आहे. तो येणेंप्रमाणें:—

"The neighbourhood of this city was reached on the 2nd of January, 1829, when a halt took place for the purpose of settling the etiquette to be observed on this occasion. There were great difficulties in the way of coming to an arrangement, for the capital had never before been visited by a personage of such high rank as Lord Combermere. All the artifices of

## अपमानाबद्दल शिक्षा.

महाराजपुरची लढाई झाल्यानंतर बायजाबाईसाहेब नासिकाहून ग्वाल्हेरीस गेल्या. नंतर बरेच दिवस त्या लष्करामध्यें फुलबागेंत राहत असत. त्यांच्या तैनातीकरितां तेथें कांटिन्जन्ट फौजेपैकीं थोडेसे लोक (a guard of honour) व त्यावरील एक नेटिव अधिकारी असे ठेवण्यांत आले होते. त्यांनीं बायजाबाईंच्या स्वारीबरोबर हरहमेषा राहावें व त्यांची स्वारी कोठें बाहेर जाईल त्या वेळीं त्यांस सलामी द्यावी, असें त्यांच्याकडे काम होतें. एके प्रसंगीं बाईसाहेबांच्या स्वारीची प्रतीक्षा करीत, हे लष्करी लोक फुलबागेसमोरील मैदानांत उभे राहिले; परंतु त्यांच्या स्वारीस वेळ लागल्यामुळें, त्यांच्यावरील सुभेदारसाहेब कंटाळले, आणि विश्रांतीकरितां एका खुर्चीवर जाऊन बसले. बायजाबाईसाहेबांनीं चिकाच्या पडद्यांतून ही गोष्ट पाहिली; व आपली स्वारी निघण्याचें शिंग झालें असतांना, हे सुभेदारसाहेब बंदूक घेऊन सलामी देण्याकरितां तत्पर

---

what may be termed 'gentleman ushers' diplomacy were exerted to induce the Commander-in-Chief to take off his shoes when within a certain distance of the throne; but Major Macan, the Persian interpreter, declared that neither Lord Combermere nor any other English gentleman would submit to any other forms than those required at the court of his own Sovereign. After much argument the point was yielded, and Lord Combermere and his staff went, as one of the latter aptly termed it, "booted and spurred like soldiers." The Mahratta, however, had his revenge, for the only seats at the grand durbar were saddle-cloths–articles of furniture characteristic of the warlike camp-life of the nation–on which the English officers, with tightly–strapped trousers and long sharp spurs, found it impossible to contrive a comfortable posture."

—*Memoirs and Correspondence of Viscount Combermere.*
*Vol. II. Page* 197.

असावयाचें सोडून, आपल्यासमक्ष खुर्चीवर बसले, हें त्यांस पसंत पडलें नाहीं. त्यांनीं लगेच तीच खुर्ची त्यांच्या डोक्यावर आपटण्याचा हुकूम दिला ! ही गोष्ट एका एस्कॉर्ट ऑफिसरनें लिहिली आहे.

## राजकारणचातुर्य किंवा मुत्सद्दीपणा.

बायजाबाईसाहेबांच्या ठिकाणीं राजकारणचातुर्य किंवा मुत्सद्दीपणा हा गुण पूर्णपणें वसत असे. ह्या गुणाची उणीव मोठमोठ्या राजांमध्यें देखील असते, परंतु ती ह्या राजस्त्रीच्या ठिकाणीं बिलकूल नव्हती. ह्या गुणावरून ह्या स्त्रीचें बुद्धिवैभव व स्वाभाविक शहाणपण हें दिसून येतें. ह्याच विशिष्ट गुणामुळें ही स्त्री राज्यकारभार वाहण्यास पूर्णपणें पात्र व समर्थ झाली होती. हिच्या राजकारणचातुर्याच्या अनेक गोष्टी प्रसिद्ध आहेत. त्यांपैकीं ग्वाल्हेर दरबारचे पूर्ण माहितगार युरोपियन गृहस्थ डा० होप ह्यांनीं जी गोष्ट आपल्या पुस्तकांत दिली आहे, ती येथें सादर करण्यासारखी आहे. ती येणेंप्रमाणें:—

"[1]ह्या स्त्रीच्या हातीं ग्वाल्हेरचा सर्व राज्यकारभार असतांना, ब्रह्मी

1. "It was during the regency of this lady that our wars with the Burmese and the usurper of Bhurtpoor took place—wars which cleared the treasury of Calcutta of the immense surplus cash which the frugal administration of the Marquis of Hastings had amassed. To get money somewhere and somehow was a necessity which the Governor-General, Lord Amherst, felt, admitted of no delay. The king of Oude could not be applied to again. He had lent a few millions five or six, and had been paid off with a strip of territory taken from Nepaul. 'Suppose' said a Calcutta magnate, 'we try what Scindea will do. The Mahrattas are a singularly penurious race, and the coffers of their chief are believed to be well filled with rupees–two or may be three crores buried in the palace; and who can say that the Baiza Bye would be indif-

लोकांशीं व भरतपूरची गादी अन्यायानें बळकावणाऱ्या राजाशीं आमचीं अनेक युद्धें झालीं. ह्या युद्धांमुळें मार्किस ऑफ हेस्टिंग्ज ह्या गव्हरनर-

---

ferent to the *eclât* of lending the great Company Bahadoor a paltry million ?' The shrewd idea was acted on. Colonel Stewart, a very able diplomatist, was the Resident at the Court of Gwalior, and to him was confidentially entrusted the delicate task of pumping–we beg parden for the vulgarism–her Royal Highness. Now, we do not doubt that some extremely watchful game-keeper has caught a weasel very fast asleep, although the fact is not recorded in any known work on Natural History; but we very much question if any Resident at her court ever found the Baiza Bye napping. She was a true Asiatic woman, 'and something more;'—crafty, false, intriguing, vigilant; 'the something more' being that she had not, it was said, a single amiable weakness. By some means or other, this artful personage got scent of the intention to borrow, and naturally enough became awakened to a sense of the danger. She hastily dispatched a favourite, one Dada Khasgeewalla–of whom we shall hear more by and by–to the Colonel, to ask him if he thought, her troops being mutinous on account of not getting their pay, the British Government could be pursuaded to lend her a million ? Here was a singular coincidence certainly, and one that took the wind completely out of the sails of the gallant Resident. We may suppose, without drawing largely on the imagination, that Colonel Stewart wrote to his lordship, Lord Ahmerst, expressing his deep concern and surprise–we *know* that Dada did surprise him–to find that her Highness herself was in great want of money. 'Indeed, her minister has just been here to ask me if the British Government could lend her a million !' "

—*House of Scindea. Page 19–20.*

जनरलसाहेबांच्या काटकसरीच्या कारकीर्दीमध्यें कलकत्त्याच्या खजिन्यांत जो अतिशय द्रव्यसंचय झाला होता, तो सर्व संपून गेला. त्यामुळें गव्हर्नरजनरल लॉर्ड आह्मर्स्ट ह्यांस कोठून तरी व कसें तरी द्रव्य लवकर मिळविलें पाहिजे, अशी जरूरी वाटूं लागली. अयोध्येच्या नबाबाजवळून पैसा मागतां येईना. त्यानें ५०।६० लक्ष रुपये नुकतेच उसने दिले होते, व त्याबद्दल नेपाळ संस्थानांकडून मिळालेला थोडासा प्रांत त्यास मोबदला दिला होता. तेव्हां कलकत्त्याच्या एका लोहचुंबकाच्या (द्रव्याकर्षण करणाऱ्या गव्हरनरजनरलसाहेबांच्या) मनांत अशी कल्पना आली कीं, आपण शिंद्यांकडून काय मिळतें तें पहावें. मराठे लोक हे फार कृपण आहेत, व त्यांचे यजमान शिंदे सरकार ह्यांच्या खजिन्यांत दोन तीन कोटी रुपये पुरून ठेविलेले आहेत, असें ह्मणतात. तेव्हां बायजाबाई ह्या कंपनी सरकारास दहापांच लक्ष रुपये कशावरून सहज देणार नाहींत? ह्याप्रमाणें गव्हरनरजनरलसाहेबांच्या मनांत विचार आला; व तो त्यांनीं युक्तीनें सिद्धीस नेण्याचा प्रयत्न केला. ह्या वेळीं शिंद्याच्या दरबारीं कर्नल स्टुअर्ट हे फार हुशार व राजकारणी गृहस्थ रेसिडेंट होते. त्यांच्याकडे महाराणी बायजाबाईसाहेबांकडून हें द्रव्य उकळण्याचें नाजूक काम गुप्त रीतीनें सोंपविण्यांत आलें.

प्राणिशास्त्रावरील कोणत्याही प्रसिद्ध ग्रंथामध्यें विसल नांवाचा प्राणी झोंपी गेल्याचा कोठें उल्लेख सांपडत नाहीं; परंतु एखाद्या दक्ष पारध्यास तें गाढ निद्रेंत असलेलें कदाचित् सांपडलें असेल, असेंही आपण खरें समजूं; परंतु बायजाबाई कधीं निद्रित असलेली एकाही रेसिडेंटास आढळून आली असेल किंवा नाहीं, ह्याची मात्र शंका आहे. कारण, ती डोळ्यांमध्यें तेल घालून रेसिडेन्सीमधील गुप्त राजकारणें एकसारखी पाहत असे.

बायजाबाईमध्यें आशिया खंडांतील लोकांचे सर्व गुण वसत होते. एवढेंच नव्हे, तर तिच्यामध्यें आणखी कांहीं विशेष गुण होता. ती फार

धूर्त, मायावी, मनसवेबाज, दक्ष अशी होतीच—परंतु तिच्यामध्यें आणखी विशेष गुण असा होता कीं, तिला मोह पाडून फसविण्यासारखें तिच्यामध्यें एकही व्यंग नव्हतें. ह्या वस्ताद स्त्रीला आपल्याकडून सरकार उसने पैसे घेणार ही गुप्त बातमी कळली; आणि स्वाभाविकपणें, आपल्या खजिन्यावर संकट येणार ह्मणून तिला भीतिही उत्पन्न झाली. तेव्हां तिनें एक नामी युक्ति योजिली. तिनें आपले खाजगी कारभारी दादा खाजगीवाले ह्यांस बोलाविलें; आणि रेसिडेंटसाहेब आपल्याकडे पैसे मागण्याकरितां येण्यापूर्वींच, त्यांस रेसिडेंटसाहेबांकडे पाठविलें; आणि त्यांच्याकडून त्यांस असें विचारविलें कीं, "आमचें सैन्य पगार न मिळाल्यामुळें अगदीं बेदिल होऊन दंगा करण्याच्या बेतांत आहे, ह्याकरितां ब्रिटिश सरकाराकडून आह्मांस दहा लक्ष रुपये आपण मेहेरबानी करून कर्ज देववाल काय ?" हा प्रश्न ऐकून रेसिडेंटसाहेब मनांतल्यामनांत थिजून गेले. अर्थात् ग्वाल्हेरच्या खजिन्यांत जर पैसे नाहींत व तेथील सैन्याच्या पगाराची अशी रड आहे, तर इंग्रज सरकारास कोठून पैसे मिळणार ? अशाप्रकारें दोन्ही गोष्टींचा हा चमत्कारिक मेळ बसलेला पाहून, रेसिडेंट कर्नल स्टुअर्ट हे निरुत्तर झाले; व त्यांनीं मोठ्या दिलगिरीनें व विस्मयानें हिंदुस्थान सरकारास असें कळविलें, "महाराणी बायजाबाईसाहेब ह्यांनाच पैशाची फार जरूर आहे. त्यांचा खाजगी कारभारी मजकडे येऊन त्यानेंच मला असा प्रश्न विचारिला आहे कीं, ब्रिटिश सरकाराकडून आह्मांस दहा लक्ष रुपये उसने मिळतील काय ?"

हें पत्र गेल्यानंतर काय घडलें असेल हें कल्पनेनें कोणासही सहज ताडितां येईल. ज्या अर्थीं बायजाबाई ह्याच द्रव्याच्या अडचणींत असून, ग्वाल्हेर येथील फौजेचा पगार तुंबला आहे व ती फौज बिथरली आहे, त्या अर्थीं तेथून पैशाची अपेक्षा करणें योग्य नाहीं, असें समजून गव्हरनरजनरलसाहेबांस तो विचार सोडून देणें भाग पडलें असेल हें

साहजिक आहे. तात्पर्य, अशा रीतीनें बायजाबाईसाहेबांनीं आपली मुत्सद्दीगिरी चालवून ग्वाल्हेरच्या खजिन्यावर आलेलें संकट दूर केलें.

## चातुर्य.

बायजाबाईसाहेबांच्या चातुर्याच्या व शहाणपणाच्या गोष्टी अनेक प्रसिद्ध आहेत. त्यांपैकीं मौजेची एक गोष्ट येथें दाखल करितों. बायजाबाईसाहेबांच्या हातीं ग्वाल्हेरचा सर्व राज्यकारभार असतांना एके वेळीं त्यांनीं तुळसीच्या लग्नाचा टोलेजंग समारंभ केला; आणि शिंदे घराण्यांतील पुरुषांच्या लग्नास जसा खर्च येतो, तसा प्रचंड खर्च केला. तुळसीच्या लग्नास असा मनस्वी खर्च झालेला पाहून, त्यांचे दिवाण बापूजी रघुनाथ ह्यांनीं त्यांच्याजवळ नापसंती दर्शविली. बाईसाहेबांनीं त्यांस कांहींएक उत्तर न देतां, ती गोष्ट लक्ष्यांत ठेवून, लग्नसमारंभ उत्तम प्रकारें साजरा केला. नंतर एके दिवशीं त्यांनीं शिंद्यांच्या घराण्यांतील चालीप्रमाणे लग्नाप्रीत्यर्थ नजरनजराणे व अहेर स्वीकारण्याचा दरबार भरविला; व त्यास सर्व सरदार, शिलेदार, मुत्सद्दी, वगैरेंनीं हजर राहून रीतीप्रमाणें लग्नाचे अहेर करावेत, असा हुकूम सोडिला. त्या दिवशीं बाईसाहेब स्वतः दरबारांत आल्या, व त्यांनीं आपल्या गादीजवळ राधाकृष्णांच्या मूर्ती मांडून त्यांच्यापुढें सर्व नजरनजराणा व आहेर ठेवविला. अशा मंगल प्रसंगीं नजरनजराणे व अहेर करणें सर्व लोकांस अगदीं योग्य वाटून त्यांनीं मोठ्या संतोषानें ते केले. येणेंप्रमाणें दरबार झाल्यानंतर बाईसाहेबांनीं दिवाणास बोलावून आणून एकंदर नजरनजराण्यांची वगैरे जमा काय झाली तें विचारलें. दिवाणांनीं खर्चापेक्षां जमेची रक्कम अधिक झाल्याचें सांगितलें; आणि बाईसाहेबांच्या शहाणपणाची तारीफ करून आपला शब्द परत घेतला.

## जुन्या चालीरीतींविषयीं अभिमान.

बायजाबाईसाहेबांस आपल्या हिंदु चालीरीतींचा व शिंद्यांच्या दरबारां-

तील जुन्या पद्धतींचा फार अभिमान असे, व त्या पाळण्याविषयीं त्या फार दक्ष असत. एके प्रसंगीं महाराज जयाजीराव शिंदे बायजाबाईसाहेबांस भेटण्याकरितां मुद्दाम उज्जनीस गेले. त्यांच्याबरोबर लवाजमा अगदीं बाताबेताचा असून त्यांचा सर्व पोषाख इंग्रजी नमुन्याचा—बूट पाटलुणीचा—होता. महाराज प्रवासाच्या श्रमानें थकून गेले होते; ह्मणून ते त्याच पोषाखानिशीं बाईसाहेबांस भेटण्याकरितां एकदम राजवाड्यांत गेले. तेव्हां त्यांनीं, महाराजांचा पोषाख वगैरे शिंदे सरकारास शोभण्यासारखा नाहीं व राजकीय इतमाम त्यांच्याबरोबर नाहीं असें पाहून, महाराजांची भेट घेतली नाहीं; आणि असा निरोप पाठविला कीं, "चाबुकस्वारास मी भेटत नाहीं. महाराज शिंदे मला भेटण्यास येतील, तेव्हां त्यानं त्यांजबरोबर यावें. शिंदे सरकार इतमामावांचून कधींही येणार नाहींत." नंतर महाराज जयाजीराव हे आपल्या दरबारी चालीप्रमाणें भालदार चोपदार ललकारत, सर्व लवाजमा व स्वारीचीं राजचिन्हें बरोबर घेऊन, मोठ्या थाटानें बाईसाहेबांस भेटण्यास गेले. नंतर बाईसाहेबांनीं त्यांची भेट घेऊन स्वागतपूर्वक त्यांचा गौरव केला. ह्या दिवसापासून महाराज जयाजीराव शिंदे ह्यांनीं आपल्या स्वदेशी रीतिरिवाजांत कधींही अंतर पडूं दिलें नाहीं असें ह्मणतात.

## बायजाबाईसाहेबांचे बंधु.

बायजाबाईसाहेबांचे बंधु जयसिंगराव ऊर्फ हिंदुराव बाबा घाटगे ह्यांची थोडीशी माहिती बायजाबाईसाहेबांच्या कारकीर्दीच्या पांचव्या भागांत दिली आहे. तथापि त्यांचा संबंध बायजाबाईसाहेबांच्या जीवनचरित्रांत विशेष असल्यामुळें त्यांच्याबद्दल आणखी थोडी माहिती सादर करणें अवश्य आहे. हिंदुराव बाबा घाटगे हे बायजाबाईसाहेबांच्या हातीं सर्व राज्यसूत्रें असतांना त्यांचे मुख्य मसलतदार होते, व त्यांचें बायजाबाईसाहेबांच्या दरबारीं विशेष वजन होतें. पुढें बायजाबाई-

साहेबांच्या हातून राज्यकारभार जाऊन त्यांस स्थलांतर करावें लागलें, त्या वेळीं हे त्यांच्याबरोबर गेले होते. पुढें फत्तेगड येथून इ. स. १८३५ मध्यें बायजाबाईसाहेबांस अलहाबादेस आणिल्यानंतर, ह्यांस इंग्रज सरकारानें पेनशन करून दिल्लीस ठेविलें. दिल्ली येथें हिंदुराव बाबांचा वाडा प्रसिद्ध असून त्यांची युरोपियन लोकांत विशेष चाहा असे. हिंदुराव बाबा रूपानें बायजाबाईसारखे सुंदर नव्हते. त्यांची एक मोठी तसबीर दिल्ली येथील पदार्थसंग्रहालयामध्यें ठेविलेली आहे; तिच्यावरून त्यांच्या स्वरूपाची कल्पना करितां येते. 'कलकत्ता रिव्ह्यू' मधील एका लेखकानें असें लिहिलें आहे कीं, "[1]मालकम साहेबांनीं कृष्णाकुमारीच्या सौंदर्याची कल्पना तिच्या भावाच्या सुस्वरूप मुद्रेवरून बसविली आहे. त्याप्रमाणें पाहूं जातां, दिल्ली येथील पदार्थसंग्रहालयामध्यें असलेल्या हिंदुरावांच्या तसबिरीवरून बायजाबाईचें स्वरूप मोठें सुंदर होतें असें मानितां येत नाहीं. त्या तसबिरीवरून, हिंदुरावांचे नेत्र तेवढे पाणीदार असून, त्यांचें शरीर कृष्णवर्ण व स्थूल असावें असें दिसून येतें." परंतु बायजाबाईसाहेबांसंबंधानें हें अनुमान चुकीचें आहे. हिंदुराव जरी विशेष सुस्वरूप नव्हते, तरी बायजाबाईसाहेब ह्या सुस्वरूप होत्या, ह्याबद्दल मुळींच शंका नाहीं. हिंदुराव बाबांबद्दल क्याप्टन मुंडी व मेजर आर्चर ह्या दोन

---

1. "If Malcolm inferred Kishen Komari to have been beautiful from the comely features of her brother, one may conclude Baiza Baiee to have had little pretensions to a good physiognomy, judging from the portrait of her brother, which hangs on the walls of the Delhi museum. In that portrait, Hindoo Rao appears to have been a stout gentleman of the regular swarthy colour, but with a pair of very animated eyes."—*Calcutta Review*.

लष्करी अधिकाऱ्यांनीं, इ. स. १८२९ मध्यें, लॉर्ड कोंबरमियर ह्यांच्या भेटीच्या प्रसंगानुरोधानें जे लेख लिहिले आहेत, ते विशेष अनुकूल नाहींत. त्यावरून युरोपियन लोकांस प्रिय होण्यासारखें मार्दव त्या वेळीं ह्यांच्या ठिकाणीं होतें असें दिसत नाहीं. मराठी तऱ्हेची ऐट, स्वाभिमान आणि स्वातंत्र्य हे गुण ह्यांच्या ठिकाणीं विशेष होते. 'एशियाटिक जर्नल' मधील एका लेखकानें, इ. स. १८२७ सालीं दौलतरावांचें मृत्युवृत्त लिहितांना, असें लिहिलें आहे कीं, "बायजाबाईसाहेबांचे बंधु हिंदुराव ह्यांचें दौलतरावांवर अखेर अखेर फार वजन होतें. हे बाणेदार मराठ्याची एक हुबेहूब प्रतिमा होते; आणि ह्यांना जर संधि प्राप्त झाली असती, तर हे प्रतिशिवाजीच निघाले असते." हिंदुरावांची ऐट व बाणेदारपणा बायजाबाईसाहेबांचें स्वातंत्र्य नष्ट झाल्यावर आपोआप नाहींसा झाला होता. इंग्रज सरकारानें ह्यांस पेनशन करून देऊन दिल्लीस ठेविल्यानंतर हे युरोपियन लोकांचे प्रिय भक्त बनले होते. ह्यांच्याबद्दल बीलसाहेबांनीं असें लिहिलें आहे कीं "हे हिंदुस्थानांतील इंग्रज लोकांचे चाहते असून त्यांस ते फार प्रिय झाले होते.[2]"

ह्यावरून हे नेहमीं युरोपियन लोकांत मिळून मिसळून वागत असत; व त्यांना प्रिय झाले होते असें दिसून येतें. इंग्रजांचें प्राबल्य व त्यांची युद्धसामग्री पाहून त्यांच्यापुढें कोणाचा टिकाव लागणार नाहीं अशी हिंदुरावांची पुढें पुढें समजूत झाली होती. ह्याबद्दल एक मौजेची आख्यायिका एका युरोपियन गृहस्थानें लिहिली आहे. ती येणेंप्रमाणें:—इ. स. १८३८ मध्यें फेरोजपूर मुक्कामीं इंग्रज व शीख लोक ह्यांचा कांहीं

1. "Her brother, Hindu Rao, had latterly very great influence with Scindhia; he was a fine specimen of a turbulent Mahratta, and with opportunity, might have been a second Shivajee."—*Asiatic Journal.* (1827)

2. "He was fond of the society of Englishmen in India, among whom he was very popular."

राजकीय गोष्टींसंबंधानें विचार करण्याकरितां दरबार भरला होता. त्या वेळीं गव्हरनरजनरल लॉर्ड ऑक्लंड हे इंग्रजांच्या बाजूनें व महाराज रणजितसिंग हे शीख लोकांच्या वतीनें आले होते. त्यांमध्यें हिंदुरावही एक सभासद होते. ते, गव्हरनरजनरल व महाराज रणजितसिंग ह्यांच्या भेटीच्या वेळीं एकदम पुढें जाऊन बसले. त्या वेळीं एका शीख सरदारानें त्यांस प्रश्न विचारिला कीं, "आपण इंग्रज सरकाराचे एक पेनशनरच आहांत ना?" त्या वेळीं हिंदुरावांनीं असें खोंचदार उत्तर दिलें कीं, "होय, मी इंग्रजांचा पेनशनर आहें; व आपणही आमच्यासारखे लवकरच व्हाल!" हें उत्तर ऐकून तो स्वाभिमानी शीख सरदार मनांतल्यामनांत ओशाळा झाला.

हिंदुराव बाबा इ. स. १८५६ मध्यें मृत्यु पावले. पुढें इ. स. १८५७ सालीं दिल्ली येथें बंड झालें. त्या वेळीं हिंदुरावांचा वाडा ही एक युद्धांतील माऱ्याची जागा होऊन राहिली होती. येथें फार घनघोर युद्ध झालें. त्यावरून दिल्ली येथील बंडाच्या इतिहासांत हिंदुरावांच्या वाड्याचें नांव प्रसिद्धीस आलें. त्यामुळें हिंदुराव हेही बंडवाले होते असा युरोपियन लोकांचा समज होऊन, पुष्कळ ग्रंथकारांनीं त्यांस पुनः जीवंत करून लढावयास लाविलें आहे!! परंतु तें सर्व चुकीचें आहे. हिंदुराव बाबा ह्यांनीं कागल येथें बांधलेला राजवाडा व किल्ला अद्यापि अस्तित्वांत आहे; व त्यांचे वंशज श्रीमंत पिराजीराव बापूसाहेब घाटगे सर्जेराव वजारत-मा-आब हे तेथील जहागिरीचा उपभोग घेत आहेत.





# भाग ९ वा.

## कसोटीचा प्रसंग.

बायजाबाईसाहेब दक्षिणेंतून आल्यानंतर बहुतकरून ग्वाल्हेरीस राहत होत्या. त्यांचा वृद्धापकाळ झाला होता; तथापि त्यांचें शरीर तेजःपुंज असून त्यांच्या शक्ती विगलित झाल्या नव्हत्या. त्यांचा उत्साह व त्यांची ताकद कायम असून, त्यांचा घोड्यावर बसण्याचा नित्यक्रम अव्याहत चालू होता. मित आहार, नियमित व्यायाम, व्यवस्थित वर्तन आणि सत्कार्यीं कालक्षेप असा बायजाबाई-साहेबांचा आयुष्यक्रम असल्यामुळें त्यांचें आरोग्य कायम राहिलें होतें. त्यांचें सत्तर वर्षांचें वय झालें होतें, तथापि त्यांची स्मरण-शक्ति खंबीर असून त्यांचीं सर्व नैमित्तिक कृत्यें अगदीं व्यवस्थितपणानें चालत असत. त्यांस इंग्रज सरकाराकडून दोन लक्ष व शिंदे सरकाराकडून चार लक्ष मिळून एकंदर सहा लक्ष रुपये पेनशन मि-ळत असे. ह्या पेनशनाची त्या स्वतः उत्तम व्यवस्था ठेवीत अ-सत. त्यांचा इतमाम, त्यांचा शागीर्दपेशा, आणि त्यांचा दानधर्म त्यांच्या वैभवास व मोठेपणास शोभेल असाच होता. तथापि त्यांच्या दक्षतेमुळें त्यांस कधींही कर्ज न होतां, उलट त्यांच्या संग्रहीं द्रव्यसंचय फार मोठा झाला होता. उत्तरोत्तर त्यांचें मन ऐहिक व्यवहार व राजकारणें ह्यांपासून पराङ्मुख होऊन, कथापुराण व ईश्वर-भक्ति ह्यांच्याकडे विशेष लागलें होतें. तथापि, ग्वाल्हेरच्या राजका-रणांत त्यांनीं आपलें अद्वितीय बुद्धिचातुर्य पूर्वीं व्यक्त केलें असल्यामुळें त्यांच्या शहाणपणाविषयीं व त्यांच्या राजकारस्थानपटुत्वाविषयीं शिंदे

सरकारच्या दरबारांत व इंग्रजी दरबारांत त्यांचा लौकिक अद्यापि गाजत होता. खुद्द महाराज जयाजीराव शिंदे हे प्रसंगविशेषीं त्यांची सल्लामसलत घेत असत; व त्यांच्या शहाणपणाची फार तारीफ करीत असत. अशा रीतीनें बायजाबाईसाहेबांचा ग्वाल्हेर येथें शांतपणानें व प्रतिष्ठितपणानें कालक्षेप चालला होता. तों मध्यंतरीं, इ. स. १८५७ सालचें बंड उद्भवलें. त्यानें त्यांचा, ग्वाल्हेर संस्थानचा, किंबहुना सर्व हिंदुस्थानाचा शांतपणा भंग केला.

इ. स. १८५७ सालीं ग्वाल्हेर येथें जें भयंकर बंड झालें, त्याचा वृत्तांत सर्वश्रुतच आहे. ह्या बंडाच्या योगानें ग्वाल्हेर येथें कांहीं वेळ राज्यक्रांति झाली. व खुद्द महाराज जयाजीराव शिंदे ह्यांस आपल्या सर्व कुटुंबीय मंडळीसुद्धां आपली राजधानी सोडावी लागली. त्यांच्या पश्चात् श्रीमंत रावसाहेब पेशवे, झांशीच्या राणी लक्ष्मीबाईसाहेब, व तात्या टोपे ह्यांनीं ग्वाल्हेर सर करून तेथें नवीन राज्याची संस्थापना केली. ह्या विकट प्रसंगीं महाराज जयाजीराव शिंदे, महाराणी बायजाबाईसाहेब, आणि दिवाण दिनकरराव ह्यांनीं जें वर्तन केलें, तें फार शहाणपणाचें व धूर्ततेचें होतें. त्यामुळेंच ब्रिटिश राज्यसत्तेचा विजय होऊन ती पुनः संस्थापित झाली, असें ह्मणण्यास मुळींच हरकत नाहीं. ह्या अत्युत्कृष्ट वर्तनाबद्दल महाराज जयाजीराव शिंदे व दिवाण दिनकरराव ह्यांची सर्वत्र प्रशंसा झाली आहे; व ती योग्य आहे. तथापि, ह्या प्रसंगीं महाराणी बायजाबाईसाहेब ह्यांनीं जें वर्तन केलें, तें फार उदारपणाचें व थोर मनाचें असून, तें अधिक स्तुतियोग्य होतें, असें ह्मटल्यावांचून आमच्यानें राहवत नाहीं. महाराज शिंदे सरकार व दिवाण दिनकरराव ह्यांनीं सर्व लोकमताचा प्रवाह झुगारून देऊन, केवळ "ब्रिटिश सरकारचा स्नेह व त्यांचा न्यायीपणा" ह्यांकडे दृष्टि दिली, आणि आपल्या कुलास चिरभूषणावह अशीच गोष्ट केली. ह्यांत त्यांचें दूरदर्शित्व, चातुर्य आणि

प्रामाणिकपणा हे गुण व्यक्त झाले, हें सर्व ठीक झालें. परंतु ह्यापेक्षांही बायजाबाईसाहेबांच्या वर्तनांत अधिक प्रशंसनीय आणि अधिक तेजस्वी असा गुण दिसून आला. तो त्यांचें मानसिक औदार्य हा होय. बायजाबाई-साहेबांचा व ब्रिटिश सरकाराचा पूर्वीचा राजकीय संबंध लक्ष्यांत घेतला, तर त्यांनीं ब्रिटिश सरकाराशीं जें वर्तन केलें, त्यांत केवळ मनुष्य-स्वभावास भूषणप्रद होणारी अशी साधुवृत्ति दर्शविली, असें ह्मटलें असतां खचित अतिशयोक्ति होणार नाहीं. दुसऱ्यानें कितीही अपकार केले, तरी ते विसरून, त्याच्यावर पुनः उपकार करणें, ही साधुरीति होय, असें कोण ह्मणणार नाहीं?

बायजाबाईसाहेब व ब्रिटिश सरकार ह्यांच्यामध्यें मागें जीं अनेक राजकारणें झालीं, त्यांच्या बरेवाईटपणाबद्दल चर्चा करण्याचें प्रयोजन नाहीं. शिवाय, त्या राजकीय गोष्टी असल्यामुळें त्यांतील सत्य प्रकार प्रकाशांत येणें शक्य नाहीं. तथापि, स्थूल मानानें इतकें ह्मणतां येईल कीं, हीं सर्व राजकारणें न्यायी व दयाळू राजनीतीच्या विरुद्ध असून त्यांच्यायोगानें बायजाबाईसाहेबांच्या मनांतील ब्रिटिश सरकाराविषयींचा प्रेमभाव नाहींसा होणें अगदीं साहजिक होतें. बायजाबाईसाहेब ह्या फार महत्वाकांक्षी व राजव्यवहारचतुर अशा स्त्रीमालिकेंत अग्रस्थानीं शोभणाऱ्या असून, त्यांस ग्वाल्हेरचा राज्यकारभार चालविण्याची फार उमेद होती. गव्हरनरजनरल लॉर्ड आह्मर्स्ट ह्यांनीं दौलतराव शिंद्यांच्या इच्छेप्रमाणें बायजाबाईसाहेबांच्या हातीं सर्व राज्यकारभार सोंपविला होता; व त्यांचे अनुयायी लॉर्ड उइल्यम बेंटिंक ह्यांनीं त्यांस स्वतंत्र रीतीनें राज्यकारभार चालविण्याबद्दल कुल आखत्यार दिला होता. असें असून, इ. स. १८३३ सालीं त्यांना एकाएकीं अधिकारच्युत केलें, ही गोष्ट ह्या स्वाभिमानी राजस्त्रीस बिलकूल आवडली

नाहीं. तथापि तिनें कोणत्याही प्रकारें अविचाराचें वर्तन न करितां, आलेलें संकट निमूटपणें सहन केलें. त्या वेळीं तिनें युद्धाचा प्रसंग आणिला असता, तर तसें करणें तिला अशक्य नव्हतें. परंतु इंग्रजांचें सैन्यबल व साधनप्राचुर्य ह्यांचा तिला अनुभव असल्यामुळें तिनें तसा कोणताही अविचार मनांत आणिला नाहीं. परंतु तिच्या दुर्दैवानें, ब्रिटिश अधिकाऱ्यांस संशयपिशाचिकेनें पछाडल्यामुळें, तिला अत्यंत त्रास व विपत्ति हीं सोसावीं लागलीं, त्यास उपाय नाहीं!

बायजाबाईसाहेबांस ब्रिटिश अधिकाऱ्यांच्या अवकृपेमुळें जे क्लेश व जे ताप सहन करावे लागले, त्यांचें वर्णन बाईसाहेबांची प्रत्यक्ष भेट घेतलेल्या आंग्ल स्त्रियांनीं वेळोवेळीं आपल्या ग्रंथांत दाखल केलें आहे. तें वाचलें ह्मणजे त्यांच्या अनुकंपनीय स्थितीबद्दल मनांत करुणा उत्पन्न झाल्यावांचून राहत नाहीं. मिसेस फेनी पार्क्स ह्या आंग्ल स्त्रीनें ता. ९ जून इ. स. १८३६ रोजीं अलहाबाद येथें बायजाबाईसाहेबांची भेट घेतली होती. त्या भेटीची नोंद आपल्या रोजनिशीमध्यें लिहितांना तिनें पुढील उद्गार काढिले आहेतः—"बायजाबाईसाहेबांस फार क्रूरपणानें व अन्यायानें वागविलें जात आहे. ज्या महाराणीनें ग्वाल्हेर संस्थानचा राज्यकारभार चालविला, तिला राहावयास येथें छप्पर देखील नाहीं. पर्जन्यकालास सुरवात झाली असून, तिला सक्तीनें तंबूमध्यें राहावयास लाविलें आहे; व तिच्या मर्जीविरुद्ध तिला राजकीय कैदी करून येथें ठेविलें आहे."

---

1. "Surely she is treated cruelly and unjustly—she who once reigned in Gwalior has now no roof to shelter her: the rains have set in; she is forced to live in tents, and is kept here against her will,—a state prisoner, in fact."—*Wanderings of a Pilgrim.* Vol. II. page 51.

अशा प्रकारें हाल अपेष्टा बायजाबाईसाहेबांस फारच सहन कराव्या लागल्या; एवढेंच नव्हे, तर त्यांच्या काशी येथील राजवाड्यांतून ३७॥ लक्ष रुपये ब्रिटिश अधिकाऱ्यांनीं जबरदस्तीनें जप्त केले व इंग्रजी खजिन्यांत नेऊन सुरक्षित ठेविले ![1] अशा रीतीनें त्यांस इंग्रज अधिकाऱ्यांनीं अप्रेमभावानें वागविलें. ह्या कष्टमय स्थितीबद्दल त्यांनीं हिंदुस्थानचे गव्हरनरजनरल ह्यांस वेळोवेळीं अर्ज पाठविले; व दुःखानें संतप्त होऊन, पुष्कळ झणझणित शब्दांनीं त्यांच्या हृदयास द्रव आणण्याचा प्रयत्न केला; परंतु त्यांस ह्या राजस्त्रीबद्दल दया आल्याचें दिसत नाहीं. एका अर्जामध्यें त्यांनीं खुद्द गव्हरनरजनरलसाहेबांस असें लिहिलें होतें कीं, "लॉर्डसाहेब, आपण माझे संरक्षक असतांना मला अशा प्रकारच्या विपत्तियातना भोगाव्या लागल्या आहेत, ही फार आश्चर्याची गोष्ट आहे. ह्याबद्दल इतकेंच मानणें भाग पडतें कीं,

---

१. काशी येथील बायजाबाईसाहेबांचा खजिना जप्त केल्याचा उल्लेख मिसेस फेनी पार्क्स ह्यांनीं केला आहे. ह्या बाई काशी येथील बायजाबाईसाहेबांचा वाडा पाहण्याकरितां गेल्या होत्या. ज्या वेळीं त्यांनीं त्यांच्या खजिन्याच्या पेट्या पाहिल्या त्या वेळीं त्यांस त्यांतील अठरा हजार मोहरा कंपनी सरकारानें नेल्या असें समजून आलें. त्या लिहितात;—

"The Mahratta, who did the honours on the part of her Highness, took me into one of the rooms, and showed me the two chests of cast-iron, which formerly contained about eighteen thousand gold mohurs. The government took that money from the Bai by force, and put it into their treasury. Her Highness refused to give up the keys, and also refused her sanction to the removal of the money from her house; the locks of the iron chests were driven in, and the tops broken open; the rupees were in bags in the room; the total of the money removed amounted to thirty-seven lakhs."—*Page 63.*

हें केवळ आपल्यासारख्यास फार लज्जास्पद आहे!" बायजाबाईसाहेबांच्या ह्या स्पष्ट लिहिण्यानें गव्हरनरजनरलसाहेबांच्या मनावर कांहींएक परिणाम झाला नाहीं. त्यांनीं त्यांस एवढेंच उत्तर पाठविलें कीं, "मनुष्याच्या आयुष्यांत अशा प्रकारचीं स्थित्यंतरें हीं असावयाचींच. त्यावांचून कोणी सुटलें नाहीं. ह्याकरितां ईश्वरेच्छा समजून, शांतपणानें, नशीबीं काय असेल तें सोसिलें पाहिजे!"

ह्या सर्व गोष्टी बंडाच्या पूर्वीं कित्येक वर्षें घडलेल्या होत्या. तथापि बायजाबाईसाहेब ह्या कोणी सामान्य मनुष्य असत्या, तर त्यांच्या मनांत त्या वज्रलेपाप्रमाणें घट्ट बसून त्यांनीं स्नेहभावाचा तेथें कधींही प्रवेश होऊं दिला नसता. किंबहुना, बंडासारखी चांगली संधि प्राप्त होतांच, त्यांनीं दुखविलेल्या वाघिणीप्रमाणें चवताळून जाऊन त्यांचा सूड घेतला असता. परंतु अशा अप्रिय व अनिष्ट गोष्टी देखील सर्व विसरून जाऊन, बायजाबाईसाहेबांनीं ह्या बिकट प्रसंगीं सार्वभौम प्रभूस उत्कृष्ट साहाय्य केलें, आणि सुवर्णाच्या कोंदणांत तेजस्वी रत्नाप्रमाणें चमकणारें आपल्या सुशील हृदयांतील प्रशंसनीय औदार्य सर्व जगास विश्रुत केलें. ह्याबद्दल ह्या राजस्त्रीचें जेवढें अभिनंदन करावें तेवढें थोडेंच आहे.

---

1. "The Bai, in her correspondence with the Governor-General, always unhesitatingly asserted that he had confirmed her in the Regency, and authorised her to continue in the management of the State. "It is very extra-ordinary" she remarks, "that while your Lordship is my protector, such injuries have been inflicted on me, a circumstance which cannot but be considered a cause of shame to yourself." The only answer she received was the remark that no station in life was exempt from vicissitudes, and an exhortation to bear her with resignation."—*Mill's History of India.*

इ. स. १८५७ च्या बंडामध्यें बायजाबाईसाहेब ह्या इंग्रजांच्या विरुद्ध होऊन बंडवाल्यांचा पक्ष स्वीकारतील कीं काय, अशी इंग्रज अधिकाऱ्यांस अतिशय भीति वाटत होती. त्यामुळें त्यांनीं त्यांच्यावर एकसारखी नजर ठेविली होती. ह्या संबंधानें मरे साहेबांच्या "हिंदुस्थानांतील बंड" नामक ग्रंथामध्यें पुढील मजकूर लिहिला आहे[1]:—

"ह्याप्रमाणें चोहोंकडून एकत्र जमलेल्या व निरनिराळ्या हेतूनें प्रोत्साहित झालेल्या बंडवाल्या सैन्यानें महाराज शिंदे सरकार ह्यांस

---

1. "Thus did a body of rebels, collect from different quarters, and actuated by different motives, expel the Maharaja Scindia from the throne of Gwalior, and install a government avowedly and bitterly hostile to him and to the British with whom he was in alliance. Throughout twelve months events at Gwalior, the more experienced of the Company's officers frequently directed their attention to a certain member of Scindia's family, in doubt whether treachery might have been exhibited in that quarter. This was a princess, advanced in life, whose influence at Gwalior was known to be considerable, and whose experience of the checkered politics of Indian princedom had extended over a very lengthened period. She was known as the Baiza Baiee of Gwalior. Sixty years before the mutiny began, she was the beauty of the Deccan, the young bride of the victorious Dowlat Rao Scindia of 1797; and she lived through all the vicissitudes of those sixty years. During thirty years of married life she exercised great influence over her husband and the Court of Gwalior, exhibiting more energy of purpose than is wont among eastern women. In 1827 Scindia died without a legitimate son; and the widow, in accordance with Indian custom adopted a kinsman of the late Maharaja to be the new Scindia. The Baiza Baiee as regent, and Mugut Rao as expectant Rajah, had many quarrels during the next seven years; these ended, in

ग्वाल्हेरच्या गादीवरून पळवून लाविलें; आणि शिंदे सरकार व त्यांचे दोस्त ब्रिटिश सरकार ह्यांच्या विरुद्ध नवीन राज्य संस्थापित केलें. ह्या बंडवाल्यांच्या कारकीर्दीमध्यें बारा महिनेपर्यंत कंपनी सरकारचे जुने व अनुभवी कामगार, शिंदे घराण्यांतील एका विवक्षित माणसाकडे राजद्रोहाचा प्रवेश होईल कीं काय, अशी शंका बाळगून, त्याकडे एकसारखें लक्ष्य लावून बसले होते. हें माणूस ह्मणजे वयानें वृद्ध असलेल्या

1834, in the installation of the young man as Rajah, and in the retirement of the widowed princess to Dholpur. Tumults continued: for the princess was considered the more skilful ruler of the two, and many of the Mahrattas of Gwalior wished her to continue as regent. Whether from justice, or from motives of cold policy, the British Government sided with Scindia against the Baiza Baiee; and she was ordered to take up her abode in some district beyond the limits of the Gwalior territory. In 1843, when Mukut Rao Scindia died, this territory came more closely than before under British influence; a new Scindia was chosen, with the consent of the Governor-General, from among the relations of the deceased Maharaja; and with this new Scindia the aged Baiza Baiee appears to have resided until the time of the mutiny. Nothing unfavourable was known against this venerable lady, but when it was considered that she was a woman of great energy, and that many other native princesses of great energy—such as the Ranee of Jhansi and the Begum of Oude—had thrown their influence in the scale against the English, it was deemed proper to watch her movements. And this the more especially, as she had some cause to complain of the English policy in the Mahratta Dominions in past years. Although watched, however, nothing appeared to justify suspicion of her complicity with the rebels."

—*The Revolt in India, Page* 509.

महाराणी बायजाबाईसाहेब ह्या होत. ह्यांचें ग्वाल्हेर येथें चांगलें वजन असून त्यांचें नांव सर्वत्र महशूर झालें होतें. बंड होण्यापूर्वीं साठ वर्षें, 'दक्षिणची सौंदर्यलतिका' ह्मणून त्यांची प्रसिद्धि असून, इ. स. १७९७ सालच्या विजयी दौलतराव शिंद्यांच्या त्या पत्नी होत्या. त्यांनीं साठ वर्षेंपर्यंत आपल्या आयुष्यांतील विविध स्थित्यंतरांचा अनुभव घेतला होता. व लग्न झाल्यानंतर तीस वर्षेंपर्यंत आपल्या यजमानावर व ग्वाल्हेरच्या दरबारावर वर्चस्व चालवून, पूर्वेकडील स्त्रियांचे ठिकाणीं सामान्यतः जी कार्यक्षमता दृष्टीस पडते, त्यापेक्षां अधिक कार्यक्षमता दाखविली होती. इ. स. १८२७ मध्यें दौलतराव शिंदे हे निपुत्रिक मरण पावले. त्यांच्या पश्चात् हिंदु चाली प्रमाणें बायजाबाईसाहेबांनीं शिंद्यांच्या कुलांतला एक मुलगा दत्तक घेतला, आणि त्यास गादीचा धनी केलें. बायजाबाईसाहेब ह्या मुख्य राज्यसूत्रचालक व मुकुटराव हे भावी राजे असे बनल्यानंतर, त्यांच्यामध्यें सात वर्षेंपर्यंत अनेक तंटेबखेडे झाले. शेवटीं, इ. स. १८३४ सालीं, मुकुटरावांस गादी मिळाली, वबायजाबाईसाहेबांस राज्यत्याग करून धोलपुरास जाणें भाग पडलें. तथापि, बायजाबाईसाहेब ह्या मुकुटरावांपेक्षां राज्यकारभार करण्यांत अधिक चतुर आहेत, अशी लोकांची समजूत असल्यामुळें कलह चालू झाला; व ग्वाल्हेरच्या पुष्कळ मराठे सरदारांस त्यांनींच राज्यकारभार करावा हें पसंत वाटूं लागलें. न्यायाकरितां ह्मणा, अथवा राजधोरणाच्या कांहीं विशिष्ट हेतूकरितां ह्मणा, परंतु ब्रिटिश सरकारानें बायजाबाईसाहेबांच्या विरुद्ध पक्ष स्वीकारिला; आणि त्यांनीं त्यांस ग्वाल्हेर संस्थानच्या हद्दीबाहेर दूर ठिकाणीं राहावें असा हुकूम फर्माविला. इ. स. १८४३ मध्यें मुकुटराव शिंदे मृत्यु पावलें, व ग्वाल्हेर संस्थानावर ब्रिटिश सरकारचें वर्चस्व अधिक स्थापित झालें. तेव्हां त्यांनीं कैलासवासी महाराजांच्या घराण्यांपैकीं एक नवीन मुलगा पसंत करून त्यास शिंद्यांच्या गादीवर बसविलें. ह्या नवीन शिंदे सरकाराजवळ ह्या वृद्ध महाराणी बंडाचा

प्रादुर्भाव होईपर्यंत राहिल्या होत्या, असें दिसून येतें. ह्या सन्मान्य बाईसाहेबांच्या विरुद्ध चकार शब्द काढण्यास मुळींच जागा नव्हती; परंतु ज्या वेळीं बंड उद्भवलें, व झांशीची राणी, अयोध्येची बेगम ह्यांच्यासारख्या कर्तृत्वशाली स्त्रिया इंग्रजांच्या विरुद्ध पक्षास मिळाल्या, व बायजाबाईसाहेब ह्याही त्यांच्याप्रमाणें कर्तृत्वशाली आहेत हें जेव्हां इंग्रज मुत्सद्यांच्या लक्ष्यांत आलें, तेव्हां त्यांच्या हालचालीवर नजर ठेवणें त्यांस अत्यंत अवश्य वाटूं लागलें. त्यांतूनही, कांहीं वर्षांपूर्वीं, ग्वाल्हेर संस्थानांतील इंग्रजांच्या राजकीय वर्तनाविरुद्ध तक्रार करण्यास बायजाबाईसाहेबांस कांहीं सबळ कारण झालें असल्यामुळें, त्यांच्यावर सक्त नजर ठेवणें अधिक जरूर झालें. परंतु कितीही सूक्ष्म दृष्टीनें निरीक्षण केलें, तरी बायजाबाईसाहेबांचा बंडवाल्यांशीं संबंध होता, असा संशय घेण्यासारखी एकही गोष्ट त्यांच्या वर्तनांत आढळून आली नाहीं."

ह्याप्रमाणें बायजाबाईसाहेबांसंबंधानें युरोपियन लोकांस जी शंका वाटत होती, ती त्यांच्या निर्मल वर्तनानें अगदीं वृथा ठरली; एवढेंच नव्हे, तर त्यांच्याकडून इंग्रज लोकांस व खुद्द महाराज जयाजीराव शिंदे ह्यांस अनपेक्षित परंतु अप्रतिम असें साहाय्य मिळालें.

बायजाबाईसाहेब ह्यांच्या शहाणपणाचा व इभ्रतीचा लौकिक महाराष्ट्रांत व उत्तर हिंदुस्थानांत सर्वत्र पसरलेला असल्यामुळें, ह्या बंडाच्या प्रसंगीं त्यांचें नांव पुढें करून, आपला पक्ष लोकप्रिय करण्याचा प्रयत्न बंडवाल्यांचे पुढारी रावसाहेब पेशवे, तात्या टोपेप्रभृति पुरुषांनीं केला होता. इतकेंच नव्हे,तर बायजाबाईसाहेबांस अनुकूल करून घेण्याकरितां, त्यांनीं आपला वकील रामचंद्रशास्त्री हा त्यांच्याकडे पाठविला होता. बायजाबाईसाहेब अनुकूल झाल्या, तर त्यांचें अपार द्रव्यभांडार प्राप्त करून घेण्याची, व त्यांच्या सत्कीर्तीचा व वजनाचा लोकचित्ताकर्षणाचे कामीं विद्युल्लतेप्रमाणें उपयोग करण्याची, बंडवाल्यांस फार फार आशा होती. परंतु बायजाबाईसाहेब ह्यांनीं, ह्या प्रसंगीं आपल्या मनाची लोकोत्तर निश्चलता व्यक्त

करून, बंडवाल्यांच्या कोणत्याही विनवणीचा किंवा भुलथापीचा त्यावर परिणाम होऊं दिला नाहीं. पूर्ववयांत त्यांना स्वतंत्र राज्यकारभार चालविण्याची महत्वाकांक्षा होती; व तत्प्रीत्यर्थ त्यांनीं प्रयत्नही केला होता. परंतु ह्या वेळीं अविचारी बंडवाल्यांचें प्रभुत्व स्वीकारण्याची किंवा साम्राज्यवैभव उपभोगण्याची त्यांस इच्छा नव्हती. त्यांच्या ठिकाणीं युक्तायुक्त व कार्याकार्य जाणण्याची शक्ति चांगली असल्यामुळें त्यांनीं बंडवाल्यांचा पक्ष स्वीकारिला नाहीं. एवढेंच नव्हे, तर बंडवाल्यांचीं सर्व पत्रें त्यांनीं इंग्रज अधिकाऱ्यांकडे पाठविलीं. बंडवाले लोकांनीं ग्वाल्हेर प्रांतांतील प्रजेस व संस्थानच्या कामगार लोकांस अनुकूल करून घेण्याकरितां बायजाबाईसाहेबांच्या नांवाचा बळेंच उपयोग केला; व त्यांच्याकडून आपणांस पूर्ण अभयवचन असल्याचीं पत्रें आलीं आहेत, अशी खोटी गप्पही उठविली. परंतु त्यांत तथ्यांश बिलकूल नव्हता, हें निराळें सांगवयास नकोच.

१ ग्वाल्हेरचे पोलिटिकल एजंट मेजर म्याक्फर्सन ह्यांच्या चरित्रांत, खुद्द रावसाहेब पेशवे ह्यांनीं आमेन येथील शिंद्याच्या मुलकी कामगाराजवळ बायजाबाईसाहेबांचीं पत्रें आल्याबद्दल व शिंदे सरकारचें आपणास उत्तेजन असल्याबद्दल खोटी वल्गना केल्याचा उल्लेख आहे:—

"About Amaen were posted, when the rebels crossed, 400 of Scindia's foot, 150 horse, and 4 guns. Scindia's Civil Officer told the Rao Saheb, 'It is the order of the Maharajah and the Dewan that you retire.' 'And who,' replied the Rao Saheb, 'are you? A ten-ruppee underling of a Soobah, drunk with bhang! And who are the Maharajah and DinkarRao? Christians! We are the Rao and Peishwa. Scindia is our slipper-bearer. We gave him his kingdom. His army has joined us. We have letters from the Baiza Baiee, Scindia himself encourages us. Tantia Topeh has visited Gwalior and ascertained all. He having completed everything I am for the Lushkar. Would you fight with us? All is mine'. Scindia's detachment did not attempt resistance."

—*Memorials of Service in India. Page.* 333.

बायजाबाईसाहेबांनीं ह्या प्रसंगीं महाराज जयाजीराव शिंदे व दिवाण दिनकरराव ह्यांच्या मसलतीप्रमाणें वागून, युरोपियन लोकांचें व त्यांच्या स्त्रियांचें संरक्षण करण्याचे कामीं चांगली मदत केली. इ. स. १८५७ च्या मे महिन्यांत, ग्वाल्हेर येथील सैन्यानें ज्या वेळीं बंडाचा झेंडा उभारला, व आपलें रुद्रस्वरूप व्यक्त करून रेसिडेन्सीवर हल्ला केला, त्या वेळीं महाराज जयाजीराव शिंदे ह्यांनीं रेसिडेन्सीमधील युरोपियन लोक व त्यांचीं बायकामुलें ह्यांस आपल्या राजवाड्यांत नेऊन तेथें त्यांचे जीव बचावले. त्या समयीं बायजाबाईसाहेब व शिंदे सरकारच्या महाराणी ह्या उभयतांनीं त्यांस अभय देऊन त्यांची भीति दूर केली; व आपल्या खास मुतपाकखान्यांतून उत्तम उत्तम पक्कान्नें व निरनिराळे पदार्थ पाठवून त्यांच्या जेवणखाणाची उत्तम व्यवस्था केली. ही गोष्ट मेजर म्याक्फर्सन ह्यांनीं ता. १० फेब्रुवारी इ. स. १८५८ रोजीं आग्र्याहून पाठविलेल्या रिपोर्टामध्यें दाखल केली आहे. ह्या वेळीं बायजाबाईसाहेबांनीं जी मदत केली, तिची प्रशंसा करावी तेवढी थोडी आहे.

ह्यानंतर ग्वाल्हेर येथें बंडवाल्यांचें प्राबल्य विशेष झालें, व शिंदे सरकारचें सर्व सैन्य फितलें जाऊन युरोपियन लोकांचे जीव सुरक्षित राहण्याची आशा नाहींशी झाली. तेव्हां महाराज जयाजीराव शिंदे व दिवाण दिनकरराव ह्यांनीं त्यांस सुरक्षितपणें आग्रा येथें पोहोंचविलें. पुढें कांहीं दिवसांनीं ग्वाल्हेरची स्थिति अतिशय भयंकर झाली, व बंडवाल्यांनीं सर्व दिशा व्यापून टाकिल्या. त्या वेळीं चतुर दिवाण दिनकरराव ह्यांनीं फार शहाणपणानें राज्यसूत्रें चालवून, ह्या बंडवाल्या सैन्यास तेथेंच थोपवून ठेविलें. त्यामुळें आग्रा येथील किल्ल्याचा आश्रय करून राहिलेल्या सर्व युरोपियन लोकांचें रक्षण झालें. इ. स. १८५८ च्या मे महिन्यांत, बंडवाल्यांचे पुढारी तात्या टोपे, रावसाहेब पेशवे, झांशीची राणी, बांदेवाले नबाब हे ग्वाल्हेरीवर चालून आले, व त्यांनीं शिंदे सर-

कारच्या सैन्याशीं लढाई करून ग्वाल्हेर सर केली. ह्या वेळीं महाराज जयाजीराव शिंदे व दिवाण दिनकरराव ह्यांना इंग्रज सरकारच्या आश्रयास आग्र्यास पळून जाणें भाग पडलें. ह्या भयंकर प्रसंगीं बायजाबाईसाहेब ह्या ग्वाल्हेरीस होत्या. त्यांना सर्व ग्वाल्हेरचें राज्य अर्पण करण्याचें बंडवाल्यांनीं आमिष दाखविलें; परंतु बाईसाहेबांच्या दृढ निश्चयापुढें त्यांचा अगदीं निरुपाय झाला. बंडवाल्यांचे अध्वर्यु रावसाहेब पेशवे ह्यांचा, शिंदे सरकार पळून गेल्यामुळें, पराकाष्ठेचा निरुत्साह झाला; आणि तशांत, बायजाबाईसाहेब अनुकूल होत नाहींत, हें पाहून तर त्यांचा सर्व मनोरथ ढासळून पडला.

बायजाबाईसाहेब ह्यांनीं रावसाहेब पेशवे ह्यांचीं सर्व पत्रें मध्यहिंदुस्थानचे पोलिटिकल एजंट सर रॉबर्ट ह्यामिल्टन ह्यांच्याकडे पाठविलीं; आणि आपण आपल्या खास तैनातींतील लोकांसह महाराज शिंदे सरकाराप्रमाणें इंग्रज सैन्यास जाऊन सामील झाल्या. शिंदे सरकारच्या सर्व राजस्त्रिया बंडवाल्यांनीं ग्वाल्हेर सर केल्यानंतर नरवरास गेल्या. त्या वेळीं प्रथमतः, बायजाबाईसाहेब त्यांच्याबरोबर गेल्या कीं काय, हें बरोबर समजत नाहीं. तथापि सर ह्यू रोज ग्वाल्हेरीवर चालून आले, त्या वेळीं ह्या त्यांच्या सैन्याबरोबर होत्या, असा पुरावा सांपडतो. बंडवाल्यांच्या आटोक्यांतून ज्या वेळीं ह्या राजस्त्रिया निसटून गेल्या, त्या वेळीं बायजाबाईसाहेबांची नात गजराजा हिनें अलौकिक शौर्य व धैर्य व्यक्त केलें. ही स्त्री बायजाबाईसाहेबांच्या शिक्षेमध्यें घोड्यावर बसण्यांत व तरवार चालविण्यांत तरबेज झाली असून हिच्या अंगीं शौर्यगुण चांगला वसत होता. ग्वाल्हेर येथें बंडवाल्यांची धामधूम चालली असतांना, बायजाबाईसाहेबांच्या राजवाड्यामध्यें, शिंदे सरकारावर कांहीं बिकट प्रसंग गुदरल्याची वार्ता आली. त्या वेळीं गजराजासाहेब ही घोड्यावर स्वार होऊन व हातामध्यें नंगी समशेर घेऊन, शिंदे सरकारच्या राजवाड्यांत बंडवाल्यांच्या

गर्दीतून एकसारखी धांवत गेली; व बंडवाल्यांनीं तोफा व बंदुकी ह्यांचा मारा चालविला असतांना, त्यांतून प्रवेश करून, महाराजांचा शोध करूं लागली. तेथें महाराज सुखरूपपणें आग्र्यास गेले अशी जेव्हां तिची खात्री झाली, तेव्हां ती त्या गर्दीतून तशीच परत आली. तिचें धारिष्ट व शौर्य पाहून सर्व लोकांस परमावधीचें आश्चर्य वाटलें. असो. येणेंप्रमाणें खुद्द शिंदे सरकार व त्यांच्या सर्व राजस्त्रिया बंडवाल्यांस अनुकूल न होतां, त्यांच्या तावडींतून निसटून सुरक्षितपणें ग्वाल्हेर राजधानीच्या बाहेर गेल्या.

शिंदे सरकार ग्वाल्हेरीहून निघून गेल्यानंतर बंडवाल्यांनीं ता. १ जून इ. स. १८५८ पासून अठरा दिवसपर्यंत तेथें आपलें साम्राज्य चालविलें. त्या अवधीमध्यें त्यांनीं तेथें जी बेबंदबादशाही स्थापन केली, तिचें वर्णन झांशीच्या राणीच्या चरित्रांत सादर केलें आहे. ह्यास्तव त्याची पुनरुक्ति करण्याचें येथें प्रयोजन नाहीं. ता. १८ जून इ. स. १८५८ रोजीं सर ह्यू रोज ह्यांचें सैन्य ग्वाल्हेरीवर चालून आलें, व त्यांचा व बंडवाल्यांचा घनघोर रणसंग्राम होऊन त्यांत विरुद्ध पक्षाकडील रणशूर सेनानायिका झांशीची राणी लक्ष्मीबाई ही धारातीर्थीं पतन पावली; आणि बंडवाल्यांची वाताहत होऊन ग्वाल्हेरनगरी इंग्रज सेनापतीच्या ताब्यांत आली. नंतर तेथें ता. १९ रोजीं, सर ह्यू रोज, सर रॉबर्ट ह्यामिल्टन, व मेजर म्याक्फर्सनप्रभृति विजयी योद्ध्यांनीं अलिजाबहादरांच्या लष्कर राजधानींत प्रवेश केला, आणि आपले दोस्त परम विश्वासू महाराज जयाजीराव शिंदे ह्यांना गादीवर बसविण्याचा विजयोत्साहपूर्वक प्रचंड समारंभ केला. ग्वाल्हेरचें विजयवृत्त ऐकून गव्हरनरजनरल लॉर्ड क्यानिंग ह्यांस अत्यंत हर्ष झाला. त्यांनीं शिंदे सरकारास राज्यारूढ करण्याबद्दल पूर्ण परवानगी दिली; आणि हें आनंदकारक वर्तमान सर्व हिंदुस्थानभर कळवून, प्रत्येक शहरीं शिंदे सरकारास

सन्मानपूर्वक व जयघोषसूचक तोफांची सलामी द्यावी ह्मणून आज्ञा फर्माविली. त्यामुळें सर्वत्र विजयोत्सव होऊन आनंदीआनंद झाला. शिंदे सरकारच्या ' फुलबाग ' येथील प्रासादामध्यें रोषनाई, मेजवान्या व दरबार ह्यांचा थाट उडाला, व शिंदे सरकारच्या अप्रतिम साहाय्याबद्दल सर्व ब्रिटिश अधिकाऱ्यांनीं त्यांचे फार फार धन्यवाद गायिले. ह्या प्रसंगीं बायजाबाईसाहेब ह्यांचाही योग्य गौरव करण्यांत आला, हें निराळें सांगावयाचें प्रयोजन नाहीं. महाराज जयाजीराव व बायजाबाईसाहेब ह्यांचा समावेश ' शिंदे सरकार ' ह्या एकाच नांवांत होतो.

शिंदे सरकारच्या कृपासाहाय्याबद्दल आग्रा येथील दरबारामध्यें हिंदुस्थानचे गव्हरनरजनरल लॉर्ड क्यानिंग ह्यांनीं ता. २ डिसेंबर इ. स. १८५९ रोजीं त्यांचा फार सत्कार केला; व त्यांचे कृतज्ञतापूर्वक अत्यंत आभार मानून त्यांस दत्तकाची परवानगी दिली, व त्यांच्यावर अनेक प्रकारच्या मेहेरबान्या करून त्यांस तीन लक्षांचा मुलख बक्षीस दिला. ह्या प्रसंगीं त्यांनीं आपल्या भाषणामध्यें, "**शिंद्यांचें राज[illegible]ष्ठ व प्रतापशाली घराणें हें अक्षय्य नांदत राहून त्याचा सदैव उत्कर्ष व्हावा अशी सार्वभौम ब्रिटिश सरकारची अंतःकरणपूर्वक इच्छा आहे, अशी महाराज शिंदे सरकार व त्यांचे प्रजाजन ह्यांनीं खात्री बाळगावी**" असें आश्वासन दिलें. ह्यांतील प्रत्येक शब्दच काय, परंतु प्रत्येक अक्षर देखील बहुमूल्य रत्नाच्या किंमतीचें असून, त्याची योग्यता वरील जहागिरीपेक्षांही अधिक आहे, असें ह्मटल्यावांचून आमच्यानें राहवत नाहीं. इ. स. १८५७ च्या बंडामध्यें शिंद्यांच्या घराण्यानें ब्रिटिश सरकारावर केलेले उपकार जसे यावच्चंद्रदिवाकरौ विसरण्यासारखे नाहींत, तसे हे शब्दही

---

1. "Your Highness and all your Highness' subjects may be sure that it is the earnest desire of the paramount power that the loyal and princely house of Scindhia shall be perpetuated and flourish."

यावच्चंद्रदिवाकरौ विसरले जाणार नाहींत अशी आशा आहे. ह्याच प्रसंगीं गव्हरनरजनरलसाहेबांनीं, शिंदे सरकारचे दिवाण दिनकरराव ह्यांच्या अप्रतिम राजनिष्ठेबद्दल व अद्वितीय साहाय्याबद्दल त्यांचा योग्य नामनिर्देश करून त्यांचा उत्कृष्ट रीतीनें सन्मान केला; आणि त्यांच्या संबंधानें असे उद्गार काढिले कीं, "अशा संकटप्रसंगीं आपल्या राज्यकर्त्यांची सेवा करणारा आपल्यासारखा स्वामिनिष्ठ, धैर्यवान् आणि शहाणा दिवाण क्वचितच अवतीर्ण झाला असेल." हे धन्यवाद दिवाण दिनकरराव ह्यांस व त्यांच्या यजमानांस सारखेच भूषणावह होत ह्यांत शंका नाहीं.

असो. ह्याप्रमाणें महाराज शिंदे सरकार ह्यांनीं व त्यांच्या पितामही श्रीमती बायजाबाईसाहेब ह्यांनीं इंग्रज सरकारास अत्युत्कृष्ट साहाय्य केलें, त्याचें उत्तम सार्थक झालें. ह्या साहाय्यामुळें इंग्रजी राज्यावर आलेलें भयंकर संकट दूर होऊन तें चिरस्थायी झालें, ही गोष्ट निर्विवाद आहे. महाराज जयाजीराव शिंदे ह्यांच्या अनुकूलतेमुळें इंग्रजी राज्य बचावलें गेलें, ही गोष्ट इंग्रज ग्रंथकारांनीं प्रांजलपणें कबूल केली आहे. ग्वाल्हेरचे रेसिडेंट मेजर म्याक्फर्सन ह्यांनीं "शिंदे सरकार विरुद्ध पक्षास सामील झाले असते, तर बंडास काय स्वरूप प्राप्त झालें असतें, ह्याची कल्पना करवत नाहीं." असे स्पष्ट उद्गार काढिले आहेत. त्याचप्रमाणें मध्यहिंदुस्थानचे पोलिटिकल एजंट सर रॉबर्ट ह्यामिल्टन ह्यांनीं ता. २६ एप्रिल १८५८ च्या एका खलित्यामध्यें बायजाबाईसाहेबांचा नामनिर्देश करून असें लिहिलें आहे कीं, "पेशव्यांच्या पक्षानें, होळकर, बायजाबाईसाहेब आणि शिंदे ह्या तिघांच्या नांवांचा उपयोग करून, लोकांमध्यें असंतोष उत्पन्न करण्याचे कामीं व राजद्रोह वाढ-

---

1. "I believe that seldom has a ruler been served in troubled times by a more faithful, fearless and able minister than yourself."

विण्याचे कामीं शक्य तितका प्रयत्न केला. परंतु ह्या प्रत्येकाच्या ब्रिटिश सरकाराविषयींच्या खऱ्या भक्तीमुळें त्यास यश न येऊन, तो हताश: झाला. ह्या त्रयीपैकीं एकानें जरी पेशव्यांचा पक्ष स्वीकारिला असता, तरी आह्मांस किती अडचणी प्राप्त झाल्या असत्या, त्याची कल्पना करवत नाहीं. तसें झालें असतें, तर ठाकूर लोक व जमीनदार लोक लगेच त्यांस मिळाले असते; आणि प्रत्येक गांव उघडपणें आमच्या विरुद्ध होऊन पदोपदीं आह्मांस विघ्न आलें असतें. शेवटीं आमचा विजय झाला असता ह्याबद्दल कोणास शंका नाहीं; परंतु एतद्देशीय संस्थानिक आमच्या विरुद्ध होऊन पुष्कळ दिवसपर्यंत हिंदुस्थानांत एकसारखें युद्ध चाललें असतें, तर त्या योगानें युरोपखंडामध्यें देखील अनेक भानगडी उत्पन्न झाल्या असत्या; आणि आह्मांस जी नेटिव्ह सैन्याची फायदेशीर व महत्त्वाची मदत मिळाली, ती नाहींशी झाली असती."

1. "* * * It cannot be denied that nothing has been left undone by the Peishwa's party, in the Deccan especially, to use his Highness' name with that of the Baiza Baee and Sindiah to create distrust and excite sedition. * * * * What has really foiled them has been the personal fidelity of Holker, Sindiah and Baiza Baee. Had any one of these declared for the Peishwa, our difficulties would have been beyond conception; the smaller Thakoors and rural chiefs would have instantly joined the standard of their sovereign; every village would have been openly hostile; and every impediment thrown in our way. That we should have ultimately conquered no one will doubt; but a protracted war in India, with native sovereigns against us, might have led to complications in Europe, and withdrawn from us that support from native mercenaries which has been so advantageous and important."

—*Letter from Sir R. Hamilton to G. F. Edminstone Esqr., Secretary to the Government of India. Parliamentary Papers A. D.* 1860.

सर राबर्ट ह्यामिल्टन ह्यांच्यासारख्या चतुर मुत्सद्यांच्या लेखणींतून हे शब्द निघाले असल्यामुळें त्यांची योग्यता किती आहे, हें निराळें सांगण्याचें प्रयोजन नाहीं. ह्यावरून बायजाबाईसाहेबांनीं ह्या प्रसंगीं ब्रिटिश सरकाराशीं जें दोस्तीचें व एकनिष्ठपणाचें वर्तन केलें, तें त्यांस किती महत्त्वाचें व कल्याणप्रद झालें, हें आपोआप सिद्ध होतें. अर्थात् बायजाबाईसाहेबांचा व ब्रिटिश सरकारचा मागील राजकीय संबंध आणि प्रस्तुतचें त्यांचें सोज्वल व सप्रेम वर्तन ह्यांची तुलना केली, ह्मणजे ह्या वयोवृद्ध, सुशील, आणि सत्वस्थ राजस्त्रीसंबंधानें, मोरोपंतांच्या वाणीनें,

आर्या.

**सुजनातें सुखवाया सुयशें वरिती परासुता राजे ।**
**निवविति चंदन गंधें छेदूं देती परा सुतारा जे ॥ १ ॥**

किंवा, सुभाषितकारांच्या वाणीनें,

**सुजनो न याति विकृतिं परहितनिरतो विनाशकालेऽपि ।**
**छेदेऽपि चन्दनतरुः सुरभयति मुखं कुठारस्य ॥ १ ॥**

असें ह्मटल्यावांचून राहवत नाहीं.





# भाग १० वा.



## शेवट.



बंडाची परिसमाप्ति होऊन सर्वत्र शांतता झाल्यानंतर महाराणी बायजाबाईसाहेब ह्या ग्वाल्हेर मुक्कामींच महाराज जयाजीराव शिंदे ह्यांच्याजवळ राहिल्या होत्या. बायजाबाईसाहेबांचें वय पाऊणशें वर्षांपर्यंत पोहोंचलें असून, दिवसेंदिवस वार्धक्याचा अंमल त्यांच्या शरीरावर सृष्टिधर्माप्रमाणें जास्त जास्त येत चालला होता. तथापि त्यांचा नित्यक्रम, पूजाअर्चा, कथापुराण वगैरे सर्व गोष्टी सुयंत्रित चालल्या होत्या. दिवसेंदिवस त्यांची देहयष्टि शक्तिहीन होत चालल्यामुळें त्यांचा घोड्यावर बसण्याचा व्यासंग कमी झाला होता. महाराज जयाजीराव शिंदे ह्यांची ह्या वृद्ध व पूज्य महाराणीवर केवळ मातेप्रमाणें भक्ति असून, त्यांनीं त्यांच्या शुश्रूषेंत किंवा सन्मानांत यत्किंचितही अंतर पडूं दिलें नाहीं. महाराज जयाजीराव हे बायजाबाईसाहेबांची वारंवार भेट घेत असत व त्यांच्याशीं दोन प्रेमळ शब्द बोलून त्यांच्या मनास समाधान देत असत. अशा रीतीनें बंडानंतर सुमारें तीन चार वर्षें लोटलीं.

पुढें बायजाबाईसाहेबांची प्रकृति पिकल्या पानाप्रमाणें अगदीं क्षीण होत जाऊन इ. स. १८६३ च्या मे महिन्यांत त्या फारच अशक्त झाल्या, व त्यांचा काल अगदीं समीप आल्याचीं चिन्हें दिसूं लागलीं. त्यामुळें महाराज जयाजीराव ह्यांस विशेष चिंता उत्पन्न होऊन, त्यांच्या

आयुर्वृद्धीकरितां त्यांनीं दैवी व मानवी उपाय सुरू केले; व तत्प्रीत्यर्थ पुष्कळ द्रव्य खर्च करण्याचा संकल्प केला. ह्या समयाची हकीकत ता. ८ जून इ. स. १८६३ च्या ' ज्ञानप्रकाश ' वर्तमानपत्रांत प्रसिद्ध झाली आहे. ती वाचली ह्मणजे बायजाबाईसाहेबांच्या अंतकालीं महाराज जयाजीराव ह्यांनीं त्यांच्याविषयीं आपली भक्ति कशी व्यक्त केली, हें दिसून येतें. ती हकीकत येणेंप्रमाणें:—

" श्रीमंत बायजाबाईसाहेब शिंदे यांस कितीएक दिवस दुखणें लागून त्यांची प्रकृति हल्लीं फारच बिघडली आहे. वैद्य व हकीम, अनुष्ठानें करणारे भट, ग्रहांची पीडा घालविणारे जोशी, देवऋषी, पंचाक्षरी वगैरे लोकांचा रोजगार पिकून हजारों रुपयांची त्यांस प्राप्ति होत आहे. श्रीमंत शिंदे सरकार व त्यांचें कारभारीमंडळ बाईसाहेबांच्या शुश्रूषेंत व काळजींत निमग्न झाल्यामुळें आठ दहा दिवस दरबार नाहींसें झालें आहे. बाईसाहेबांची प्रकृति अत्यावस्थ झालेली पाहून अलिजाबहादुर जयाजीराव यांणीं सर्वांसमक्ष त्यांस विनंति केली कीं, "आपण मनास वाटेल तितका दानधर्म करावा. या कामांत जो पैसा लागेल तो खजिन्यांतून मागून घ्यावा." व त्याच वेळेस महाराजांनीं एक लाख रुपये आणून दाखल केले; आणि असेंही सांगितलें कीं, "उज्जन परगणा आपला आहे. हा आपण कोणास बक्षीस देण्यास इच्छित असल्यास तसें करावें. त्यांत माझा नकार नाहीं. मी सर्वस्वीं आपला अंकित आहें." हें भाषण ऐकून बाईसाहेबांस मोठा गहिंवर आला; आणि मोठ्या ममतेनें त्यांनीं महाराजांचे मुखावरून हात फिरवून सांगितलें कीं, तुह्मांस जसें नीट दिसेल तसें करावें. श्रीमंत चिमणाराजा-शिंदे सरकारचें कुटुंब-यांचे नांवानें सर्व मालमत्ता व उज्जनी परगणा देण्याचा आपला मानस बाईसाहेबांनीं प्रकट करून, त्या गोष्टीस कांहीं अंशीं इंग्रज सरकारची मंजुरी जरूर असल्याकारणानें, मेजर मीडसाहेब मध्य-

हिंदुस्थानचे एजंट यांजकडे वकील रवाना केले. आजी व नातू यांचें हें वास्तविक प्रेम पाहून फार संतोष वाटतो. ”

ह्याप्रमाणें बायजाबाईसाहेब ह्यांच्या अस्वस्थतेचें वर्तमान सर्वत्र प्रसिद्ध होतांच, त्यांचा समाचार घेण्याकरितां त्यांच्या परिचयाचे व त्यांच्याविषयीं पूज्यबुद्धि बाळगणारे अनेक लहानमोठे लोक ग्वाल्हेरीस आले. इंदूरचे महाराज तुकोजीराव होळकर ह्यांची बायजाबाईसाहेबांविषयीं फार पूज्यबुद्धि असल्यामुळें, त्यांनीं त्यांच्या अस्वस्थेतेचें वृत्त ऐकतांच, आपले बंधु काशीराव दादा ह्यांस मुद्दाम ग्वाल्हेरीस बाईसाहेबांच्या समाचाराकरितां पाठविलें. त्याचप्रमाणें ग्वाल्हेर येथील रेसिडेंट व इतर युरोपियन लोक बाईसाहेबांच्या समाचाराकरितां येऊं लागले. ह्याप्रमाणें बायजाबाईसाहेबांविषयीं जिकडेतिकडे सहानुभूति व्यक्त होऊन, त्यांच्या प्रकृतीस आराम पडावा अशी इच्छा सर्वत्र दिसूं लागली. त्या इच्छाप्रभावानें ह्मणा, किंवा औषधिगुणामुळें ह्मणा, परंतु बाईसाहेबांस मध्यंतरीं आठ पंधरा दिवस चांगला आराम पडला. हें पाहून महाराज जयाजीराव शिंदे ह्यांस व अखिल नागरिक जनांस अत्यंत आनंद झाला. त्याच संधीस शिंदे सरकारास पुत्ररत्न प्राप्त होऊन तो आनंद द्विगुणित झाला. त्यामुळें महाराजांनीं गंगा दशहाराचा उत्सव फार थाटानें केला; व मुद्दाम ब्रह्मवर्तास जाऊन तेथें ब्राह्मणभोजनें व सुवर्णदानें केलीं. ह्याप्रमाणें मध्यंतरीं कांहीं दिवस बाईसाहेबांबद्दल पुनः आशा उत्पन्न झाली. परंतु ती आशा अगदीं अल्पकालिक होऊन कविकुलगुरु कालिदास ह्यांच्या उक्तीप्रमाणें ‘मरणं प्रकृतिः शरीरिणाम्’ ह्मणजे जन्मास आलेला प्राणि हा हें नाशवंत जग सोडून जावयाचाच, ह्या नियमाप्रमाणें, बायजाबाईसाहेब ह्यांच्या निधनकालाचा प्रसंग लवकरच प्राप्त झाला. ता. २७ जून इ. स. १८६३ रोजीं, ही ग्वाल्हेरच्या इतिहासांत एकसारखी गाजत असलेली राजकारस्थानी व शहाणी

स्त्री हा नश्वर देह सोडून कैलासपदीं गेली. ह्या दिवशीं हिंदुलोकांचा अत्यंत पवित्र व पुण्यकर असा महाएकादशीचा (ह्मणजे आषाढ शुद्ध एकादशी शके १७८६ हा) दिवस होता. त्या दिवशीं अत्यंत समाधानानें ही राजस्त्री मृत्यु पावली. त्यामुळें सर्व प्रजाजन दुःखानें फार हळहळले. त्यांच्या मृत्यूबद्दल दुःखप्रदर्शनार्थ ग्वाल्हेर येथील झांशीबाजार तीन दिवस बंद ठेवण्यांत आला होता.

महाराणी बायजाबाईसाहेब ह्यांच्या मृत्यूनें महाराज जयाजीराव ह्यांस फार दुःख झालें. त्यांनीं आपल्या घराण्याच्या व ह्या राजस्त्रीच्या मोठेपणास साजेल अशा रीतीनें त्यांचा अंत्यविधि केला. महाराजांनीं बाई-साहेबांच्या इच्छेप्रमाणें बहुत दानधर्म केला, व त्यांच्या उत्तरकार्याचे दिवशीं हिंदुस्थानांतील सर्व क्षेत्रांमध्यें एक लक्ष ब्राह्मणभोजन घातलें. त्याचें स्मरण क्षेत्रोक्षेत्रीं अद्यापि जागृत आहे. ह्याप्रमाणें ह्या स्त्रीच्या पुण्याईनें तिचा शेवट उत्तम प्रकारचा झाला. महाराज जयाजीराव शिंदे ह्यांनीं बायजाबाईसाहेबांची ग्वाल्हेर येथें छत्री बांधिली असून, तत्प्रीत्यर्थ कांहीं कायमचें उत्पन्नही करून दिलें आहे. ही छत्री कै० दौलतराव शिंदे ह्यांचे छत्रीजवळ असून, तेथें बायजाबाईसाहेबांची उत्तम शिल्पकाराकडून तयार केलेली संगमरवरी दगडाची मूर्ति स्थापन केली आहे. तिची पूजा-अर्चा व वार्षिक उत्सव अद्यापि चालत आहे. ह्याशिवाय पंढरपूर येथेंही द्वारकाधीशाच्या देवालयामध्यें बायजाबाईसाहेबांची एक मूर्ति असून तिच्याही पूजानैवेद्य वगैरे नित्यखर्चाबद्दल शिंदे सरकाराकडून स्वतंत्र उत्पन्न व वर्षासन अद्यापि चालत आहे. ह्याप्रमाणें ही स्त्री मृत्युपश्चात् देखील सर्वांच्या पूजेस व वंदनास पात्र झाली आहे.

महाराणी बायजाबाईसाहेब ह्यांची कीर्ति हिंदुस्थानामध्यें सर्वत्र पसर-लेली असून, जुन्या व वृद्ध लोकांच्या तोंडून त्यांचें वर्णन ऐकूं येतें. परंतु त्यांच्या खऱ्या चरित्राच्या किंवा इतिहासग्रंथाच्या अभावामुळें त्यांचें

यश दंतकथांच्या योगानें मंद मंद होत चाललें आहे. तथापि, कांहीं पाश्चिमात्य ग्रंथकारांनीं व रसिक विद्वानांनीं त्यांच्याबद्दल जे उद्गार काढिले आहेत, ते त्यांची खरी योग्यता व्यक्त करीत आहेत. ग्वाल्हेरचे जुने रेसिडेंट मेजर स्टुअर्ट ह्यांनीं बाईसाहेबांच्या राज्यकारभाराची प्रशंसा केली असून, दौलतराव शिंद्यांनीं त्यांच्याबद्दल "शहाणी बायको" (a woman of sense) ह्मणून जे उद्गार काढिले होते, त्याचा वेळोवेळीं मोठ्या कौतुकानें उल्लेख केला आहे. शिंद्यांच्या दरबारचे दुसरे रेसिडेंट मेजर सदरलंड ह्यांनीं त्यांच्यासंबंधानें "चतुर व स्वाभिमानी बायको" ह्मणून त्यांची स्तुति केली आहे. शिंद्यांच्या दरबारचे युरोपियन डाक्टर मि० होप ह्यांनीं, "त्या काळची फार नामांकित स्त्री" ह्मणून आनंदभरानें त्यांचा गौरव केला आहे. मिसेस ड्युबर्ली नामक आंग्ल युवतीनें, "बायजाबाई ही फार कार्यक्षम व साहसी असून हिंदुस्थानांतील फार प्रख्यात स्त्री आहे" असें ह्मटलें आहे. आणि मिसेस फेनी पार्क्स ह्या बाईनें, "बायजाबाईसारखी कृपाळू व सुस्वभावी स्त्री पाहिली नाहीं" असा स्तुतिपर उल्लेख आपल्या रोजनिशींत नमूद करून ठेविला आहे. त्या वेळच्या वर्तमानपत्रांतूनही बायजाबाईसाहेबांसंबंधानें प्रशंसापर लेख प्रसिद्ध झाले होते. 'मुंबई ग्याझेट' पत्रांत बायजाबाईसाहेबांचें मृत्युवृत्त आलें असून, त्यांत असें ह्मटलें आहे कीं, "बेगम सुमरू, नागपुरची राणी, झांशीची राणी, लाहोरची चंदाराणी, आणि भोपाळची बेगम ह्या सुप्रसिद्ध स्त्रियांप्रमाणें ही राजस्त्रीही, आपल्या परीनें, प्रख्यात असून, हिनें अनेक वेळां आपल्या देशाच्या शत्रूंशीं घोड्यावर बसून टक्कर दिली होती." अशाप्रकारें ह्या महाराणीच्या संबंधानें सर्वत्र स्तुतिपर उल्लेख दृष्टीस पडतात. ह्यावरून ह्या राजस्त्रीनें क़वि तुलसीदास ह्यांच्या

दोहा.

**सुरतसे कीरत बडी बिनपंख उड जाय ।**<br>
**सुरत तो जाती रही, कीरत कबहू न जाय ॥ १ ॥**

ह्या उक्तीप्रमाणें आपल्या पश्चात् आपली कीर्ति हिंदुस्थानांत दुमदुमत ठेविली आहे, असें ह्मणण्यास हरकत नाहीं. असें स्त्रीरत्न ज्या शिंदे कुलामध्यें प्रसिद्ध झालें, त्या कुलास व एकंदर राष्ट्रास तें ललामभूत होय, ह्यांत शंका नाहीं.

बायजाबाईसाहेबांनीं ज्या ग्वाल्हेर संस्थानचा राज्यकारभार चालविला, त्याची सांप्रत सर्वप्रकारें सुधारणा होऊन तें चांगल्या भरभराटीच्या स्थितीप्रत पोहोंचलें आहे. त्याचें क्षेत्रफळ २९,०४६ चौरस मैल असून त्याची लोकसंख्या ३०,३०,५४३ आहे. ह्या संस्थानचे अधिपति श्रीमंत महाराज अलिजाबहादुर माधवरावसाहेब शिंदे हे आहेत. हे बायजाबाईसाहेबांचे पणतू होत. ह्यांजवर ब्रिटिश सरकारची पूर्ण मेहेरबानी असून, त्यांस त्याजकडून के. सी. एस्. आय्. ही बहुमानाची पदवी मिळालेली आहे. ह्यांच्याजवळ ५५०४ स्वार, ११०४० पायदळ व ४८ तोफा इतकें सैन्य आहे. ह्यांनीं दक्षिण आफ्रिकेंतील व चीन देशांतील युद्धप्रसंगीं द्रव्यरूपानें व सैन्यरूपानें सार्वभौम सरकारास चांगलें साहाय्य केलें आहे. ह्यांच्या हातून उत्तमप्रकारें राज्यकारभार चालून प्रजा सदैव सुखानंदांत राहो, व शिंदे घराण्याचा लौकिक व उत्कर्ष शुक्लेंदुवत् वर्धमान होवो, अशी परमेश्वराजवळ अनन्यभावें प्रार्थना करून हा चरित्रग्रंथ संपवितों.



